आंतरभारतीय पुस्तकमाला

कथा भारती

# गुजराती लघुकथा


संपादक

**यशवंत शुक्ल**

**अनिरुद्ध ब्रह्मभट्ट**

अनुवाद

**दीपक कुमार**





**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

# भूमिका

कथा ही पर्वताइतकी प्राचीन आहे आणि बहुतेक सर्वांपाशी ती असते. पुराणकथा, दृष्टान्तकथा, नीतिकथा, लोककथा इत्यादी गुजराती साहित्यातही होत्या आणि आजही आहेत. पण गद्य साहित्याचा एक स्वतंत्र कलाप्रकार म्हणून आपण आज ज्या लघुकथेला ओळखतो, तिची सुरुवात मात्र विसाव्या शतकाच्या प्रारंभी गुजराती साहित्यात झालेली आढळते. कादंबरीसारख्या अन्य वाङ्मयप्रकाराप्रमाणेच लघुकथेचे बीजदेखील पाश्चात्य साहित्यातून इकडे येऊन रुजले. आपले शैलीगत वैशिष्ट्य फुलवताना गुजराती लघुकथेला ज्या ज्या वेळी जरुर भासली त्या त्या वेळी तिने पुराणकथा, लोककथा इत्यादींच्या वर्णनशैलीतील कित्येक तत्त्वांचा उपयोग केला आहे खरा (उदा. जयंती दलाल यांची ''मूकं करोति'' कथा), तरी पण तेवढ्यावरून काही आजच्या लघुकथेचा पुराणकथा, दंतकथा वगैरेंशी सरळ संबंध आहे असे म्हणता येणार नाही.

श्री. अंबालाल साकरलाल देसाई यांनी लिहिलेली ''शांतिदास'' (इ.स. 1900) ही गुजराती साहित्यातील पहिली लघुकथा समजली जाते. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे अंबालाल यांनी लघुकथा लिहिण्याच्या हेतूने ही कथा लिहिली नव्हती; तर स्वदेशी वस्तू वापरण्याविषयी आपल्या विचारांना मूर्तरूप देण्यासाठी अर्थशास्त्रज्ञाच्या दृष्टीने ही कथा लिहिली होती. अशा प्रकारच्या आणखीही काही बोधात्मक कथा त्या काळात लिहिल्या गेल्या होत्या. पण ''शांतिदास'' कथा त्या सर्वांमध्ये वेगळी उठून दिसते, त्याचे कारण म्हणजे या काळातील कथांचे विषयक्षेत्र मुख्यत्त्वे समाजातील वाईट चालीरीती आणि निर्जीव जातिवादामुळे होणाऱ्या प्रेमभंगाचे निदर्शन हेच होते. या काळातील लघुकथांचे आणखी एक उल्लेखनीय लक्षण म्हणजे त्यातून होणारी हास्यरसाची अभिव्यक्ती हे होय. रमणभाई नीलकंठ यांनी ''भोमियाने दीधेली भूलथाप'' नावाची एक विनोदी कथा मार्क-ट्वेनच्या एका कथेवरून स्फूर्ती घेऊन लिहिली होती. ती कथा प्रसिद्ध झाल्यावर गुजराती साहित्यात लघुकथांचे जणू पीकच आले. या काळातील प्रमुख लघुकथा लेखकांनी– धनसुखलाल मेहता, क. मा. मुन्शी, मलयानिल वगैरे सर्वांनी विनोदी लघुकथा लिहिल्या आहेत.

क. मा. मुन्शी यांच्या कथांतील विनोद मुख्यतः नर्म स्वरुपाचा पण मार्मिक आहे. मलयानिल यांच्या कथांमध्ये विनोदाला मुख्य स्थान नसेल तरी त्याचा संथ प्रवाह त्यांच्या सर्व कथांमधून वाहताना आढळतो. अशा तऱ्हेने लघुकथेच्या प्रारंभिक काळात उपदेश, समाज सुधारणा आणि विनोद ही तीन वैशिष्ट्ये डोळ्यांत भरण्याइतकी उठून दिसतात. त्यामुळे काही ठिकाणी कथा उपदेशाच्या ओझ्याखाली पिचून गेल्यासारखी दिसते तर काही ठिकाणी समाजसुधारणेचा डांगोरा पिटण्याच्या नादात कथेची मांडणी शिथिल पडल्याचे जाणवते. काही ठिकाणी कथेतून विनोदाची निर्मिती होत असल्याचे दृष्टोत्पत्तीस आले तरी मग त्या कथेला कथेचे स्वरुप राहात नसल्याचे दिसून येते. या परिस्थितीला काही सुखद अपवादही आहेत. त्यात मळयानिल यांची "गोवालणी" (इ.स. 1918) ही लघुकथा लक्ष वेधून घेते. कुठलाही साहित्यबाह्य हेतू नसलेली अशी ही कथा आहे. या कथेतून पहिल्यांदाच निर्भेळ ललित कलाकृतीचे दर्शन घडते. गौळणीविषयी कथानायकास वाटणारे आकर्षण आणि त्यापासून बचावण्याचा गौळणीने शोधून काढलेला सोपा मार्ग यांचे इतके सहजसुंदर वर्णन कथेत केलेला आहे की कुठेही ओढूनताणून प्रयत्नपूर्वक कथा लिहिली आहे असे वाटत नाही. कथा अतिशय मनोवेधक झाली आहे.

या प्रथम कालखंडातील कथांची एक प्रेरकशक्ती म्हणून "सुंदरी-सुबोध", "गुणसुंदरी", "वार्ता-वारिधि", "वीसमी सदी" इत्यादी तत्कालीन साहित्यांची नोंदही या ठिकाणी घ्यावयारा हवी.

धूमकेतूच्या आगमनाबरोबर गुजराती लघुकथेने एक महत्त्वाचे वळण घेतले. विषयक्षेत्राचा विस्तार झाला आणि ध्वनितत्त्वाचे लघुकथेतील महत्त्व मान्य केले गेले. धुमकेतू यांच्या कथांमध्ये त्यांच्या पूर्वसूरींपेक्षा निसर्ग आणि पात्रे यांच्यातील सुसंवादाकडे अधिक कलात्मक दृष्टीने विशेष लक्ष पुरविण्यात आले आहे.

धूमकेतूच्या कथांमध्ये वनजीवन, ग्रामीणजीवन आणि शहरीजीवन अशा विविध जीवनाची बहुढंगीपणा दाखविण्यात आलेला आहे. जीवनाचे अवलोकन, विवेचन करण्याची त्यांची दृष्टी मुख्यतः भावुक आहे. त्यांची बहुतेक पात्रे भावुक जीवन जगत असल्याने व्यवहारातील वास्तव जगताशी बहुधा त्यांचा मेळ बसत नाही. आणि त्यामुळे ती दुःखी होतात. कदाचित याच कारणामुळे त्यांची पात्रे अव्यवहारी वाटतात. स्वतःच्या स्वप्नसृष्टीत दंग असणाऱ्या अशा पात्रांची एक सृष्टीच धूमकेतू यांनी उभारली आहे.

यंत्रसंस्कृतीच्या परिणामी नागरी जीवनात शिरलेल्या यांत्रिकतेच्या तुलनेत निसर्गाच्या सान्निध्यातील ग्राम्यजीवनात आढळणारी सहजता धूमकेतू यांनी कित्येक कथांमधून दर्शविली आहे. नागरी जीवनापेक्षा ग्राम्यजीवनाप्रती त्यांना वाटणारे आकर्षण त्यांच्या कित्येक कथांमधून स्पष्टपणे दिसून येते. ग्राम्यजीवन, रोमँटिक वातावरणात रंगवून सांगायची त्यांना विशेष आवड असल्याचे आढळते. धूमकेतूंच्या कथांमध्ये परिस्थितीपेक्षा पात्रांना अधिक महत्त्व असते आणि त्यामुळे त्यांच्या बहुतेक कथा पात्र-प्रधान असतात.

धूमकेतूच्या आगमनाने गुजराती लघुकथेला पहिल्यांदा काव्यमय निसर्गवर्णने मिळाली, मुलायम गद्य मिळाले, तऱ्हेतऱ्हेची पात्रे मिळाली, मानवीजीवनात नागरी संस्कृतीने निर्माण केलेल्या कित्येक समस्यांचे समाधान मिळाले आणि मुख्य म्हणजे सप्तरंगी नजरेने पाहिलेले गाव मिळाले. प्रेमापायी सर्वस्व ओवाळून टाकण्याची वृत्ती धूमकेतूच्या कित्येक पात्रांमध्ये आढळते. हे प्रेम व्यक्तिप्रती, पशुपक्ष्यांप्रती, धरतीप्रती असते. त्यास बंधन असते. इतकेच नव्हे तर प्रसंगी ते व्यक्तिविशिष्ट आत्मनिष्ठेचे रुप धारण करीत असल्याचे आढळते.

रा. वि. पाठक– ''द्विरेफ'' च्या कथांमध्ये पात्रे, कथेतील शुद्ध वास्तवाच्या भूमीवर उभी असतात. वर्णनशैलीत भावुकता नसून तर्कशुद्ध संयम असतो आणि ते द्विरेफ यांच्या कथांचे एक खास वैशिष्ट्य आहे. पात्रांची मनःस्थिती आणि त्या मनःस्थितीमुळे अनिवार्यपणे निर्माण झालेली परिस्थिती यांच्यातील अकृत्रिम संबंध द्विरेफनी ओळखला आणि त्याद्वारे मानवजीवनाचे रहस्य उलगडून दाखविले. कथांमध्ये द्विरेफ प्रयोगशील राहिले आहेत. त्यामुळे त्यांच्या कथांमध्ये भिन्नभिन्न कथनशैली आढळते. मानवजीवनातील अंधशक्तींचे चित्रण द्विरेफ यांनी मोठ्या कौशल्याने केले आहे. मानवजीवनाची नियंत्रक शक्ती म्हणून भौतिक तत्त्वांचा प्रभाव या विषयावर द्विरेफ यांच्याकडून सर्वप्रथम कथा मिळाल्या.

द्विरेफ यांच्या कथालेखनाच्या काळातच प्रगतिवादाची लाट येऊन पोचली होती. पण द्विरेफच्या कथांवर त्याचा फारच थोडा परिणाम दिसून येतो. मेघाणींच्या कथा घडविणाऱ्या मुख्य प्रेरणा दोन आहेत– एक म्हणजे लोकसाहित्याशी असलेला त्यांचा निकटचा संबंध आणि दुसरी म्हणजे प्रगतिवादाचा परिणाम. मेघाणींच्या कादंबऱ्यांतून आढळणारी समाजाच्या खालच्या थरांतील पीडित, दलित लोकांविषयी वाटणारी सहानुभूती चटकन लक्ष वेधून घेते. साहस, समर्पण आणि शौर्याचे रेखांकन करण्याचे विलक्षण सामर्थ्य मेघाणींच्या लेखणीत आढळते. दंभ, दमन आणि

निष्ठुरतेविषयी त्यांना वाटणारा सात्त्विक कोप पण त्यांच्या साहित्यातून पाहावयास मिळतो. तत्कालीन लोकजीवनाच्या विविध छटा मेघाणींच्या कथालेखनातून दृष्टीस पडतात. मेघाणींच्या कथांतून तंत्राच्या सफलतेपेक्षा प्रसंगांची जडणघडण आणि चित्रात्मक निवेदनशैलीचे आकर्षण अधिक आढळते.

वाचकाला एक धक्का देऊन त्याला नव्या आणि न्याय्य समाजरचनेप्रती अभिमुख करणे हा प्रगतिवादाचा एक हेतू होता. बकुलेश, जयंत खत्री वगैरेंच्या कथांमधून याच विचारसरणीचे प्राबल्य आढळते. सुंदरमूच्या कथांमधून प्रगतिवादाचा परिणाम काही ठिकाणी स्थूल स्वरूपाचा तर काही ठिकाणी सूक्ष्म स्वरूपाचा दिसून येतो ''माजावेलानुं मृत्यु'' मध्ये पायपथावर राहाणाऱ्यांच्या संवेदना रेखांकित केलेल्या आहेत. त्यातील कारुण्य प्रसंगी भव्यतेची पातळी गाठू शकल्याचे दिसते. त्या मागचा धारदार कटाक्ष संपूर्ण कृतीमध्ये व्याप्त झालेला आहे. एक रचनाकार या दृष्टीने सुंदरम् यांचा ''खोलकी'' मधील संयम उल्लेखनीय आहे. सारी परिस्थिती व्यंगाच्या तिरकसपणाने वर्णित केलेली आहे. ''माने खोळे'' मध्ये कारुण्य दाटलेले आहे आणि कथेच्या शीर्षकापासून ते अखेरपर्यंत लेखकाचा वक्र दृष्टिकोन जाणवत राहातो.

श्री. उमाशंकर जोशी यांच्या कथा बाह्य सामाजिक परिस्थिती पार्श्वभूमीदाखल घेऊन पात्रांच्या मानसिक प्रतिक्रिया व्यक्त करतात. अतिशय सामान्य वा आकस्मिक घटना कथासूत्र म्हणून घेऊन त्यातून अनिवार्य गहन कारुण्य निष्पन्न करण्याची त्यांची हातोटी 'चक्कीनुं भूत' वा ''कलंकिनी'' सारख्या कलाकृतींमधून सहज दिसून येते. पात्रांच्या मनातील चित्रविचित्र भावांचे– कधी ते परस्परविरूद्धही असतात– चित्रण करण्याचे विलक्षण कौशल्य उमाशंकर यांनी दाखवले आहे. ''मारी चंपानो वर'' ही कथा या दृष्टीने नोंद घेण्यासारखी आहे. ''श्रावणी मेळो'' मध्ये ग्राम्यजीवनातील बहुरंगीपणाबरोबरच तेथील कटु 'वास्तविकताही' उमाशंकरांनी चित्रित केलेली आहे. लघुकथेमध्ये तंत्रविषयक विविध प्रयोग करण्याकडेही उमाशंकरांनी लक्ष पुरविल्याचे आढळते.

गुलाबदास ब्रोकर हे पात्रांच्या कित्येकदा विक्षिप्त अशा वाटणाऱ्या वर्तनाद्वारे त्यांच्या मनातील अंतःप्रवाहाकडे वाचकांना ओढून नेतात. जातीयतेचा प्रश्न ब्रोकरांनी गंभीरतापूर्वक हाताळला आहे. ''लता शुं बोले ?'' हे त्याचे उत्कृष्ट उदाहरण होय. मानवजीवनातील मांगल्यदर्शक भाव-भावना फुलवण्याचे कसब स्नेहरश्मी यांच्या कथांमधून विशेषत्त्वाने उठून दिसते. मुलांच्या वर्तनाविषयी त्यांना

किती जाण आहे त्याचे उदाहरण म्हणून ''हीरानां लटकणियां'' या कथेचा उल्लेख करता येईल.

गुजराती साहित्यात लघुकथेच्या प्रारंभाबरोबरच ग्रामीण कथेचाही जन्म झाला आणि तेव्हापासून आजवर ती लिहिली जात आहे. पण शहरात राहाणाऱ्या मान्यवर लेखकांनीच बहुधा या ग्रामीण कथा लिहिल्या होत्या. ग्रामीण प्रदेशाचा, तेथील जीवनाचा त्यांना थोडाफार अनुभव असला आणि त्या अनुभवांच्या शिदोरीवर एखाद्या सुंदरम्‌ने ''माने खोळे'' सारखी एखादी कथा लिहिली वा एखाद्या उमाशंकर जोशीने ''श्रावणो मेळो'' लिहिली आणि त्यातून ग्रामीण जीवनाची सुरसता व्यक्त होत असली तरी ग्रामीणजीवनाचे अनुभव आपल्या समस्त वैशिष्ट्यांसह पहिल्यांदा जर कुठे व्यक्त झाले असतील तर ते पन्नालाल पटेल यांच्या कथांमधून ! पन्नालाल यांनी शहरी जीवनावरील कथाही लिहिल्या आहेत. पण ग्रामीण कथांच्या बाबतीत त्यांचा हात धरणारा दुसरा कुणी नाही. पात्रांचे मनोभाव आणि गावचे वातावरण सारे कसे एकरूप होऊन समोर उभे राहाते. ''वात्रकने कांठे'' हे याचे सर्वोत्कृष्ट उदाहरण होय. पात्रांची द्विधा मनःस्थिती रेखाटण्याचे अपूर्व सामर्थ्य पन्नालाल पटेल यांच्यात आहे. लघुकथेत उत्तर गुजरातच्या बोलीभाषेचा उपयोग उमाशंकर जोशी यांनी पहिल्यांदा केला असला तरी त्या भाषेच्या लकबी आणि खाचाखोचा पाहावयाच्या असल्यास ते पन्नालाल यांच्याच कथांमध्ये सापडेल.

पेटलीकरांचे यशही मुख्यतः ग्रामीण कथांमध्येच आहे. पात्रांच्या वर्तणुकीचे सहज चित्रण पेटलीकरांच्या कथांमध्ये लक्ष वेधून घेते. ''लोहीनी सगाई'' मध्ये प्रेमाचे कसे कुठलीही धामधूम न उडवता रेखाटन केलेले आहे. या प्रवाहाच्या अन्य लेखकांमध्ये श्री. मोहनलाल पटेल यांचाही आवर्जून उल्लेख करायला हवा.

गुजराती लघुकथांमध्ये जयंत खत्री यांच्या कथा एक विशिष्ट उन्मेष करतात. त्यांच्या कथा वाचून, एक जागरुक कलाकाराचा हात त्यांच्या कथांवरून फिरला असल्याचे जाणवल्यावाचून राहात नाही. संपूर्ण कृती नजरेसमोर ठेवून ते बारीक सारीक तपशीलाची गुंफण करतात. कित्येक ठिकाणी तर प्रतीकरूप धारण करून कथांमधून वावरण्याची क्षमता घटनांमध्ये असल्याचे दिसते. या दृष्टीने ''खरा बपोर'', ''धाड'', ''नाग'' वगैरे लघुकथा वाचनीय आहेत. निसर्गाच्या गतिविधींचे एका सजीव तत्त्वरूपात ते लघुकथांतून चित्रण करतात.

सामाजिक दायित्त्व आणि प्रयोगशीलता बरोबर घेऊनच श्री. जयंती दलाल

लघुकथेच्या क्षेत्रात अवतरले. मार्दव हे जर लघुकथांचे एक वैशिष्ट्य मानले तर जयंती दलालच्या लघुकथांमध्ये ते चटकन डोळ्यांत भरण्याइतके भरलेले आहे. म्हणूनच कदाचित त्यांच्या कथांतील शब्दसृष्टी कित्येकदा वाचकांना भुरळ पाडण्यासारखी असते. त्यांच्या कथा कधी किस्स्यासारख्या, कधी वृत्तात्मक तर कधी काव्याच्या सीमारेखांना स्पर्श करणाऱ्या असतात. पात्रांच्या अंतर्मनातील हालचालींचे वर्णन करताना दलालांनी शब्दशक्ती पणास लावली आहे. उपहासाची झालर असणारे गद्य हे दलालांच्या रचनेचे एक वैशिष्ट्य आहे• द्विरेफांच्या नंतर कथनशैलीचे सर्वात अधिक प्रयोग दलालांच्या लेखनात पाहावयास मिळतात.

व्यावहारिक जीवनाची कटू वास्तविकता, मानवजीवनांचे उभे-आडवे धागे विणणाऱ्या नैसर्गिक आद्य शक्ती, त्या शक्तींच्या प्रवर्तनामुळे जीवनात निर्माण होणारी करुण परिस्थिती ही चुनीलाल मडिया यांच्या कथांची कठोर वास्तवभूमी आहे. 'कमाऊ दीकरो' आणि 'वानी मारी कोयल' या फक्त मडिया यांच्याच नव्हे तर गुजराती साहित्याच्या उल्लेखनीय लघुकथा आहेत. भावजगतातील कोमल हळुवारपणाच्या नव्हे तर धुसमुसळ्या आवेगाच्या चित्रणात मडिया यांना उल्लेखनीय यश मिळाले आहे. भरीव घटनांची गुंफण करून मडिया यांनी ते साधले आहे आणि त्यामुळेच कदाचित त्यांच्या कथांमध्ये कथातत्व (Story Element) भरपूर असते.

गुजराती लघुकथा-क्षेत्रात सुरेश जोशी यांचे पदार्पण हे एका नव्या परिवर्तनाचे निदर्शक आहे. लघुकथांमधून घटनांची पिछेहाट करण्याचा सर्वात अधिक प्रयत्न त्यांनी केला. घटनाप्राधान्य आणि ठळक घटनांच्या पकडीतून सुटून अतिकाल्पनिक (Fanstastic) चा जम बसवण्याचा प्रयत्न पण श्री. जोशी यांच्या कथांमधून दिसून येतो. लघुकथेत घटनेचा एक क्षीण तंतू घेऊन त्यांच्या अवतीभवती विश्वव्यापी संदर्भाची वीण घालायची आणि अवघ्या कथेलाच एक प्रतीक बनवून टाकायचे श्री. जोशी यांचे प्रयत्न उल्लेखनीय आहेत.

श्री. सुरेश जोशी हे एकीकडे घटनेचे लघुकथेतून उच्चाटण करण्याच्या प्रयत्नात गुंतले आहेत तर दुसरीकडे श्री. चंद्रकांत बक्षी घटनांवर उभारलेल्या कथांमधून नागरी जीवनाविषयीची जाणीव रेखाटण्याचा प्रयत्न करीत आहेत. नागरी जीवनांची एकविधता, त्यातून निष्पन्न होणारी कृत्रिमता, त्यामुळे प्रत्ययास येणारी दांभिकता, त्यातून निसटण्यातील असहाय्यता, परिणामी मनात उद्भवणारा उद्वेग आणि तज्जनित रुग्ण मनोवृत्ती– या सर्वांचे चित्रण श्री. बक्षी यांच्या कथांतून प्रामुख्याने पाहावयास मिळते.

आधुनिक गुजराती लघुकथेत एखाद्याच मनःस्थितीचे चित्रांकन करण्याचे वा एखाद्याच संवेदनेला शब्दबद्ध करू पाहण्याचे वळणही दृष्टीस पडते. श्री. मधु राय यांची 'हार्मोनिका' आणि श्री. ज्योतिष जानी व श्रीमती सरोज पाठक यांच्या अनेक कथा या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. श्री. किशोर जादव यांनी हे वळण जणू अखेरपर्यंत पोचवले आहे. मधु राय यांच्या कथांमध्ये अनुभूतिक्षेत्रापेक्षा प्रयोगक्षेत्र अधिक विस्तृत आहे. कथेस एखादा निश्चित शेवट असायला हवा यावर बऱ्याच आधुनिक कथाकारांचा विश्वास नाही. श्रीमती सरोज पाठक यांच्या 'न कोंसमाँ न कोंस बहार' या लघुकथेत एका स्त्रीच्या मनःस्थितीचे सुंदर चित्रण आलेले आहे. अंतर्मनातील परस्परविरुद्ध भावनांची ओढाताण अतिशय सहजतेने त्यात व्यक्त केलेली आहे आणि त्यातूनच भावनेचे सत्य साकार झाले आहे. धीरुबेन पटेल, ईवा डेव आणि सुधीर दलालांच्या लघुकथा नाजुक मनःस्थिती वा भावनांचे दिग्दर्शन करतात. ईवा डेवची नजर मानसिक प्रक्रियांकडे विशेष करून आहे. बोलचालीच्या, कित्येकदा तर पार खालच्या भाषेत ईवा डेव मानसिक क्रियाप्रक्रियांचे वा गुंतागुतीचे हुबेहूब चित्रण करतात. 'चोट्टी', 'बिचारी जमनी' इत्यादी कथा याचे उत्कृष्ट उदाहरण होत.

कथेतील मुख्य बिंदूच्या आजूबाजूला घटनांची मांडणी करण्याचा प्रयत्न आधुनिक कथेने जणू सोडून दिला आहे. कधी अंतःप्रवाहाचे सरळ आलेखन करून, कधी प्रतीकाद्वारे, तर कधी संवादातील सूक्ष्मतेद्वारे ती वाचकांना सरळ कथेच्या केंद्रबिंदूशी घेऊन जाते. श्री. राधेश्याम शर्मा यांची 'सळिया' कथा प्रतीकात्मक कथेचे सुंदर उदाहरण आहे. श्री. रघुवीर चौधरी संवादात तर्काचा मार्मिकपणा आणून कथा लिहिण्यात सिद्धहस्त आहेत. व्यक्त-अव्यक्ताच्या सीमारेषांवरून ते संवादाचा ओघ सहज पुढे नेऊ शकतात. दोन भिन्नभिन्न परिस्थिती जवळजवळ ठेवून त्यातून एखाद्या तिसऱ्याच मानसभूमीकडे ते वाचकाला घेऊन जाऊ शकतात. एक माध्यम म्हणून भाषेचे सारे बारकावे हाताळण्याकडेही या आधुनिक कथाकारांनी लक्ष पुरविलेले आहे. पुराण कथांना आधुनिक संदर्भात ताडून पाहण्याचा प्रयत्नही या आधुनिक कथाकारांच्या हातून झालेला आहे. आधुनिक कथाकारांमध्ये साहस आहे, शब्दशक्तीला राबवण्याचे ज्ञान आहे. प्रस्थापित मूल्यांना घासून पारखून घेण्याइतके धैर्यही कित्येकांनी दाखवले आहे. प्रयोग केला नि यश मिळाले या मुग्ध मनोदशेतून नवनवीन लेखक पुढे सरसावत आहेत. आगामी गुजराती लघुकथेचे भविष्य उज्ज्वल आहे असे म्हणावयास प्रत्यवाय नाही.

**— यशवंत शुक्ल**

**— अनिरुद्ध ब्रह्मभट्ट**

# अनुक्रमणिका

# गौळण

□ मलयानिल

ती अगदी तारुण्यानं मुसमुसलेली होती. चौदाव्या वर्षी काहींच्या अधरावर गुलाब फुलतात, तर काहींच्या डोळ्यांत सतराव्या-अठराव्या वर्षी स्वप्नं तरळताना दिसू लागतात. पण तिच्या गळ्यात मात्र पंधराव्या वर्षीच कोकिळा कूंजन करू लागली होती.

अबोधपणा रजा घेऊ लागला होता. बाल्यभाव यौवनाला वाट करून देण्यासाठी बाजूला सरत होता. मुग्धकाळी फुलत होती, बहरत होती.

ती शिकलेली नसली तरी चतुर होती, शहरातली नसली तरी सौजन्यपूर्ण होती. उच्चवर्णीय नसली तरी गोरीपान होती.

पितळेची चकाकणारी घागर डोक्यावर घेऊन झुंजूमुंजू व्हायच्या सुमारास गावात ती शिरली की लक्ष्मी आल्यासारखं वाटायचं. "दूध घ्या, दूऽध" अशी थांबून-थांबून येणारी तिची हाक ऐकू आली, की दातवण करीत बसलेले सर्वजण तिच्याकडे पाहू लागायचे. पुरुषांना शुभ शकुन झाल्यासारखं वाटायचं. स्त्रियांना मत्सर वाटायचा.

ती गुजराती गौळण होती. भल्या पहाटे ती तिच्या गावाहून निघायची. नुकतंच काढलेलं ताजं दूध घेऊन आमच्या गावी यायची. प्रत्येकालाच तिच्याकडून दूध घ्यावंसं वाटायचं. 'दूध घ्या दूऽध' ऐकताच, आळीतल्या बायका पटकन पांघरुणातून बाहेर पडायच्या.

ती नेहमी जाडीभरडी पण स्वच्छ आणि नेहमी नवी असणारी लाल रंगाची साडी नेसायची. तिला पिवळ्या रंगाचे काठ आणि काळ्या रंगाचा पदर असायचा. हातात चांदीचा पत्रा लावलेले ठसठशीत हस्तिदंती चुडे घालायची. पायात जडसर वाळे घालायची. नाकात नथ आणि कानात बुगडी, बोटात चांदीच्या आंगठ्या, गळ्यात मोहनमाळ आणि काचेची पोत हे तिचे अलंकार होते. कपाळावर थोडासा घुंगट ओढलेला असायचा. त्यामुळे तिचे केस कसे आहेत याची कुणाला काही कल्पना नव्हती. ते विंचरलेले असतील. भांगेत कुंकू लावलेलं असेल या नुसत्या कल्पनेनंच तिचं सौंदर्य वृद्धिंगत व्हायचं.

तिच्या यायच्या वेळेला नेमका मी बाहेरच्या ओट्यावर दातवण करायला बसायचो आणि ती दिसली की तिच्याकडे टक लावून बघायचो. ती बिचारी लाजून खाली बघू लागायची. पण अन्य युवतींच्या सारखी तिची चाल काही बदलत नसे, की तिला काही कापरं भरत नसे. हातही वेडेवाकडे होत नसत. शांत आणि गंभीरपणे ती नेहमीसारखी "दूध घ्या दूऽध" ची हाक द्यायची.

माझ्या बायकोला मी रोज विचारीत असे, "तू या गौळणीकडून दूध का नाही घेत ? 'तायबाय, दूध घेता का ?' विचारून विचारून तिचं बिचारीचं तोंड दुखायला लागत असेल. पण तुला त्याचं काहीच वाटत नाही ?"

का कुणास ठाऊक पण तिला पाहिलं तेव्हापासून मला तिच्याबद्दल एकप्रकारची विलक्षण ओढ वाटू लागली होती. आपल्या घरी तिचा रतीब लावावा, तिला आपल्या अंगणात थोडा वेळ बसायला लावावं, तिच्याकडं निरखून बघावं, असं मला वाटायचं. इतकी कोमलांगी असून गौळणीचा जन्म कसा घेतला ? तिच्या त्या नाजूक दिसणाऱ्या देहावर इतकं जाडभरडं वस्त्र कसं राहात असेल ? देव तरी कसा ! काही पाहिल्याशिवायच जन्माला घालतो.

त्याचं दिवशी मलाही वाटलं होतं की मलादेखील गवळ्याचा जन्म मिळाला असता तर किती बरं झालं असतं. तलावाकाठी बसून मला बासरी वाजवता आली असती तर किती छान झालं असतं. गावच्या वेशीबाहेर गुरं हाकत नेऊन हातातल्या काठीवर शरीर रेलून, डोक्याला भलंमोठं मुंडासं गुंडाळून गीतलहरी छेडता आल्या असत्या तर मला किती आनंद झाला असता. गावंढळ वाटलं तरी ते कृष्णाचं आयुष्य होतं. आणि वेड लावणारी गौळण पण राधेच्याच जातीची !

वारंवार तिचं सौंदर्य पाहिल्यानं माझ्या मनावर त्याचा खूपच परिणाम झाला होता. तिच्या गंभीर पण काळ्याभोर डोळ्यांवर माझं मन आसुसलं होतं. तिच्या पाठोपाठ भटकावं आणि ती कुठं जाते ते बघावं असा विचार मनात येऊ लागला होता.

एके दिवशी आठाचे टोले पडले तशी मी उठलो आणि कामावर जायचं सोडून गावच्या वेशीच्या दरवाजापाशी जाऊन उभा राहिलो. मनाशी विचार केला, दूध विकून घरी परत जायला ती इतक्यात आली म्हणजे गुपचूप तिच्या पाठोपाठ जावं. तिनं पाहिलंच तर लगेच तिला विचारावं. "तू कोण आहेस ? तुझ्या नजरेत काय जादू आहे ? तुझ्या गवळणींच्या जातीत अशा वेड लावणाऱ्या पऱ्या असतात ?"

मनातल्या मनात प्रश्नांची उजळणी करीत मी दरवाजापाशी उभा राहिलो. तेवढ्यात दोन्ही हातांनी पैसे मोजत, रिकामी दुधाची घागर डोक्यावर अलगद ठेवून,

ताठ मानेनं पण खालच्या नजरेनं चालत चालत ती दरवाजा बाहेर पडली. मी पाठोपाठ निघालो.

कच्च्या रस्त्यावर गाड्यांच्या चाकांच्या खुणा उमटलेल्या होत्या. उंचवट्यामधून वाट काढलेली असल्याने दोन्ही बाजूंना जणू मातीच्या भिंती उभ्या होत्या. त्यावर रानटी झाडंझुडपं उगवलेली होती. रस्त्यावरून धूळ उडवीत ती झपझप पावलं टाकीत चालली होती. सूर्य समोरच्या दिशेला असल्यानं तिनं एक हात उंचावून डोळ्यांसमोर धरला होता आणि दुसऱ्या हातानं घागर धरली होती. एखादवेळी अवचित मागं वळून पाहिलं असतां मी तिच्या नजरेस पडलो होतो. आणि मी तिचा पाठलाग तर करीत नाही ना अशी शंकाही तिच्या मनात येऊन गेली होती. म्हणूनच ती कधी सावकाश चालत होती तर कधी लगबगीनं. मीदेखील माझ्या चालण्याची गती तिच्याप्रमाणेच बदलत होतो. आपली शंका खरी की खोटी हे ती पडताळून बघत असल्याचं मला ठाऊक नव्हतं. अर्थात तिच्या पावित्र्याला वा चारित्र्याला कलंक लावायचा माझा मुळीच हेतू नव्हता. तिच्या सौंदर्यानं माझे डोळे दिपले होते. मनानं माझा अधःपात झाला होता. पण अगदीच पागल बनून वाटेल तसं वर्तन करण्याइतका मी वेडावलो नव्हतो, बुद्धी अजूनही शाबूत होती.

असं आम्ही अर्धा-एक मैल गेलो असू. तेवढ्यात ती थबकली. तेथे वडाच्या झाडाची सावली होती. वाटसरूच्या विसाव्यासाठी झोपडी होती. वर झाडावर कोकिळा गात होत्या. खाली गायी, म्हशी, शेळ्यामेंढ्या चरत होत्या. मोठं रमणीय स्थान होतं.

झोपडीबाहेर तिने घागर खाली ठेवली आणि रस्त्यालगतच्या हिरवळीवर गौळणी बसतात तशी उकडवी बसून ''हाश हुश्श'' करू लागली.

माझी स्थिती मोठी चमत्कारिक झाली. निघून जावं की थांबावं ? तिच्याशी बोलायचा विचार मनात येताच छाती धडधडू लागली. चेहरा लालेलाल झाला. साहस करून मी इथवर आलो होतो. पण आता या गोऱ्या गवळणीने माझी ताकदच हिरावून घेतली होती.

विचार करून मी त्याच रस्त्यानं चालू लागलो. तिला ओलांडून दोन पावलं पुढं गेलो तोच, ''संदनभाई, कुठं निघालात ?'' तिनं विचारलं. आमच्याकडे रोज येत असल्यानं ती मला चांगली ओळखत होती. पण ती अशी एकदम माझ्याशी बोलायला सुरुवात करील असं वाटलं नव्हतं. मी तिच्याच मागं येत असल्याचं तिनं ओळखलं तर नाही ? माझ्याबद्दल तिला काय वाटलं असेल ? मनात असे नाही नाही ते विचार

येऊ लागले. पण तिच्या प्रश्नाचं उत्तर तर द्यायलाच हवं. काय सांगू ? घाबरून माझ्या तोंडून बाहेर पडलं, "तुझं गाव बघायला." बोलल्यानंतर चरकलो. हे काय तोंडून निघून गेलं ? तिचं गाव बघायचं मला काय कारण ? माझ्या मनाचा कमकुवतपणा तिनं नक्कीच ओळखला असेल. किंवा तिच्या मनात दुसराच काही हेतू असेल आणि ती कुणाला तरी सांगेल, "संदनभाई माझा गाव बघायला आले होते." पण तेवढ्यात तिनं विचारलं, "त्यात काय बघायचं आहे ? तुमच्या गावासारखं थोडंच आहे ? जरा इकडं या, दूध घ्या, चांगल्या दुभत्या म्हशीचं आहे. तुम्हाला आवडेल."

माझ्या मनातली उलघाल संपायला आली. माझ्या असल्या वागणुकीचं तिला काही गैर वाटल्याचं दिसलं नाही. उलट तीच आपणहून मला बोलावतेय. मला संकोच वाटण्याचं काही कारण नाही. गुलाबच जर बुलबुलास बोलवायला लागला तर त्यात बुलबुलाचा काय दोष ? नाग स्वतःच जर मोरापाशी आला तर त्याला मोर काय करणार ? आता जे व्हायचं असेल ते होऊ देत. माझी अभिलाषा जे रूप घेणार असेल ते घेऊ देत.

"नको, नको. असं थोडंच दूध घ्यायचं असतं ? उद्या घरी आणून दे म्हणजे झालं." दूध प्यावंसं मनातून खूप वाटत होतं. पण तिनं सांगताक्षणी लगेच असं दूध घेणं वाईट, असभ्यपणाचं नाही का दिसणार ?

"घरी घ्यायचं ते घ्याल हो. पण इथं तर घ्या. घरी ही वडाची रम्य सावली, पक्ष्यांचं मधुर गुंजन थोडंच असणार आहे ? शिवाय माझ्या हातून थोडंच घरी दूध मिळणार आहे ? तिथं ताईबाईंना कळलं तर एक घेतील आणि दोन ठेवून देतील."

हिला का अशिक्षित म्हणता येईल ? हिला अक्षरज्ञान नाही इतकाच त्याचा अर्थ. हिला नीट बोलता येत नाही. असं जर कुणी म्हणालं तर त्याचा अर्थ इतकाच, की शहरातल्या लोकांसारखं हिला वरवर तोंडदेखलं बोलता येत नाही. नैसर्गिक वातावरणात ती वावरत असते. दैवी गोडी तिला ओळखता येत होती आणि स्वतःच्या ग्राम्य पण गोड आवाजात मला त्याची जाणीव करून देता येत होती. अशा वेळी अशा एकान्तात सरळ हृदयाने स्वतःच्या मनीच्या भावना मजपर्यंत पोचवण्याची शक्ती तिच्यात होती. मी हळूहळू पुढे सरकत होतो.

"ठीक आहे. मी दूध घेईन. पण पैसे घ्यावे लागतील."

"वेड लागलं की काय तुम्हाला ? असे पैसे घेत असतात वाटतं ? माझी शपथ आहे. तुम्ही अगोदर दूध तर घ्या." इतकं बोलून माझ्यापाशी येऊन तिनं दुधाचा

पेला माझ्यासमोर धरला. मी विचार केला, फार हुज्जत घालण्यात अर्थ नाही, उगाच घोळ घालत बसलं तर जमून आलेल्या सर्व गोष्टी विस्कटून जातील. मी तिच्या हातून पेला–दूध मापायचा– घेतला आणि दूध पिऊन टाकलं. दुधात साखर नव्हती. गरम केलेलं नव्हतं तरी मला ते चवदार लागलं. दुधाला सहजजात एक गोडी असतेच. जे ताजं निरसं दूध पितात त्यांना त्याची गोडी चांगली माहीत असते. त्यातून हे दूध तर एका सुंदर स्त्रीने, आग्रह करून दिलेलं– तेही माझ्यासारख्या वेड्याला !

"गौळणी, तुझी जात कोणती ?" दूध पिता-पिता मी बोलणं सुरू केलं.

"अग बाई, तुम्ही धर्मभ्रष्ट तर नाही ना झालात ?"

"छे, छे, तसं नाही. तेवढ्यासाठी नाही काही मी विचारीत. सहज आपली चौकशी करीत होतो. सांग ना, तू कोणत्या जातीची ?"

"मी ना ? आम्ही गुरं चारणारे 'रबारी' लोक."

"तुझं लग्न झालंय की अजून कुमारीच आहेस ?" माझा पागलपणा आता वाढू लागला होता.

थोडं लाजून तिनं हळूच उत्तर दिलं, "लग्न झालंय."

"कुणाशी ?"

"इश्श्य संदनभाई, असं नाव घ्यायचं असतं वाटतं ? आमच्यासारखाच 'रबारी' आहे झालं."

"ए, तुझं तुझ्या नवऱ्यावर प्रेम आहे ?" मी स्वतःला विसरून गेलो होतो. काय विचारावं अन् काय नाही याचं भानच उरलं नव्हतं. मी काय विचारलं ते काही तिला कळलंच नाही.

"काय ?"

"नाही आपलं. तुझं तुझ्या नवऱ्याशी कितपत पटतं ? तुझा नवरा तुझ्यावर प्रेम करतो का ?"

"संदनभाई, वेड तर नाही लागलं तुम्हाला ?"

"मुळीच नाही. पण आज तुला सांगावंच लागेल. ते ऐकण्यासाठी तर मी तुझ्या पाठोपाठ इतक्या लांब आलोय. गावात बोलायची भीती वाटत होती, आता जर तू बोलली नाहीस तर तुला माझी शपथ." इतकं बोलून मी तिच्यासमोर बसलो. आम्हा दोघांच्या मध्ये दुधाची घागर फक्त होती.

अचानक, "अरे देवा, ..... माझं गाठोडं विसरलेच की ..... आता काय करू ....." ऐकून मी दचकलो. ती उभी राहिली. "संदनभाई माझी घागर जरा बघता

का ? माझं भुशाचं गाठोडं मी कुठंतरी विसरून आले बघा. ही आता जाऊन घेऊन येते.''

''जरूर, जरूर, न बघायला काय झालं ?'' तिनं मला अख्खा दिवस उन्हात उभं राहायला जरी सांगितलं असतं तरी मी ते आनंदानं मान्य केलं असतं. हे तर थोडाच वेळ लक्ष ठेवायचं काम होतं. त्यात काय होतं मोठंसं ?

''ही उभ्या-उभ्या आलेच. तुम्ही तोवर या खोपटात बसा.''

मला रस्त्यावर बसलेलं कुणी पाहिलं तर का बसलात म्हणून चौकशी करील, म्हणून घागर घेऊन मी खोपटात जाऊन बसलो. आत कुणीतरी गवत पसरून अंथरूण तयार केलंलं होतं. वर सरकांडीचं छप्पर घातलेलं होतं. बाभळीच्या फांद्यांचे खांब टेकू म्हणून लावलेले होते. भिंतीला मागच्या बाजूला खिडकी होती. भिंतीला टेकून, पाय पसरून मी बसलो. वा रे गौरी गौळण ! तुझ्या ग्रामीण भाषेत किती माधुर्य आहे. बस्स. ठरलं आज तिला जाऊच द्यायचं नाही. बोलण्यात असं गुंतवून टाकायचं की तिला तिच्या घराचा विसर पडला पाहिजे. पाहू या. मला ती गुरं वळायला शिकवते का ?

झिरझिरीत साडी, तंग चोळी, आणि रेशमी घागरा जर ती नेसली तर कशी दिसेल ? अंबाड्यावर गुलाब खोवून, गळ्यात मोत्यांचा सर घालून याच मंदगतीने ती चालू लागली तर तिला पाहून कोण वेडावून जाणार नाही ? कल्पनांनी मी तिच्या रूपाला आणखी उजाळा देत होतो आणि त्याच कल्पनांमुळे अधिकाधिक तिच्याकडे आकर्षिला जात होतो. तिच्या घागरीवर काही नाव लिहिलेलं होतं. मी ते वाचायचा प्रयत्न करू लागलो. अपष्ट अक्षरातलं ''दली'' एवढंच वाचता आलं. त्यावरून मी अंदाज लावला की ''दली'' हे तिचं नाव असावं पण असलं कसलं नाव ? ही घागर कदाचित् तिच्या आईवडिलांनी तिला सासरी पाठवणीच्या वेळी दिली असेल. तिनं ही आतून बाहेरून किती स्वच्छ ठेवली आहे. त्यामुळं दूधही चांगलं राहातं आणि दिसायलाही छान दिसतं हे वैशिष्ट्य. या घागरीतलं दूध घ्यायला कुणालाही आवडेल. पण डोक्यावर ठेवायची चुंबळ ती कशी काय बरोबर घेऊन गेली नाही ?

डोक्यावर घागर अलगद ठेवून ती गावात शिरते त्यावेळचा काय तो तिचा आवाज ! पहाटेच्या वेळी भूपाळीचे स्वर गोड लागावेत तसा तिचा तो आवाज गोड लागतो. त्यामुळे अर्धजागृतावस्थेत सकाळचं शुभ शकुनाचं स्वप्न पडतं आणि सारा दिवस आनंदात जातो. सगळ्या गावासाठी जणू ती आशीर्वाद देणाऱ्या देवीसारखी होती.

असा विचार करता करता वीसेक मिनिटं गेली असतील. तेवढ्यात ती आली आणि विचारू लागली ''बसला आहात ?''

''काय, मिळालं का गाठोडं ?''

''नाही हो दादा. चार-पाच घरी चौकशी केली. पण काही पत्ता लागला नाही. कुणास ठाऊक कुणाच्या घरी विसरले. आज झाली इतकी भटकंती खूप झाली.'' इतकं बोलून निराश झाल्यासारखी ती खाली बसली.

''दली.''

''दली'' ऐकताच ती जरा चमकली. ''गावात लोक मला दूधवाली म्हणतात.''

''पण तुझ्या घागरीवर हे नाव लिहिलंय ना, ही तुझ्या माहेराहून तुला मिळालेली दिसते. खरं ना ? तुझ्या लग्नाच्या वेळी ?''

मी तर तिच्या चिंतनात तन्मय झालो होतो. त्यामुळे तिच्याबाबतीत मी भिन्नभिन्न अनुमानं केली त्यात नवल ते काय !

''तुझा नवरा बिजवर आहे का ग ?'' तिच्या गळ्यातला 'सवत माळ' अलंकार पाहून मी विचारलं. तिच्या गोऱ्या अंगाकडे माझी नजर वळली. तिने माझ्याकडे पाहिलं आणि पदर ओढून अंगाभोवती घट्ट लपेटून घेतला.

''तू आणि तुझा नवरा दिवसभर काय करता ग ?''

''इश्श्य ! काहीतरीच काय ?'' लाजून मान वळवून ती हसली. कुंदकळ्यांसारखे दात लकाकले.

''ए, सांग ना. सकाळपासून संध्याकाळपर्यंत तुम्ही काय काम करता ? सांगावं लागेल हं.''

''पण कशासाठी विचारताय ? ढोरांचं काम. दिवस उजाडायच्या आत आम्ही उठतो. तोंड धुणं आटपून वासरं सोडतो. ते गाईचं दूध काढतात नि मी म्हशीचं दूध काढून गुरांना चाराबिरा घालून आम्ही दोघं बाहेर पडतो. ते त्या बाजूला जातात आणि मी तुमच्या बाजूला येते. दूध घालून, मी या सुमारास इथे येऊन बसते. ते येईपर्यंत इथंच वाट बघत बसते.''

अचानक माझ्या मनात विचार आला. तिचा नवरा कदाचित् येत असेल. मला तिच्याशी बोलताना पाहिलं तर ? अब्रू जाईल, लोकांसमोर तोंड दाखवायला जागा राहाणार नाही आणि शिवाय मार खावा लागेल ते वेगळंच. विचार येताच मला काळजी आणि भीती वाटू लागली. आणि निघून जाण्यासाठी मी टोपी हातात घेतली.

''तुम्हाला भ्यायचं कारण नाही. आज मी एकटीच आलेय. ते तर आज तूप

विकायला गेले आहेत.''

मी निश्चिंत होऊन गप्पा मारायला सुरुवात केली.

''तुझा नवरा बासरीत असं काय वाजवतो की तुम्ही सर्वजणी तिथं उभ्या राहाता? मी जर तलावाकाठी उभं राहून बासरी वाजवली तर मला वाजवता येईल?''

''हो तर. का नाही येणार ? पण तुम्हाला आमच्यासारखं व्हावंसं का वाटू लागलंय''

''तुझ्याचसाठी बरं दली. तू जे खाशील ते मी खावं, तुझी जाडीभरडी भाकरीही खावी; तुझ्या गाई चरायला घेऊन जावं, असं मला खूप-खूप वाटतंय. तुझं गाव अजून किती दूर आहे ?''

''ही चारपाच शेतं ओलांडली की आलंच. ती सुपारीची झाडं दिसताहेत ना तिथंच. तुम्ही खरंच माझ्या घरी याल ? आम्ही फाटक्या-तुटक्या गोधडीवर निजतो. आमच्या खाटा बाहेर उघड्यावर टाकतो. जवळच गुरं बांधलेली असतात. ती रात्रीबेरात्री हंबरतात. तुमच्यासारख्यांना तिथं आवडणार नाही.''

''मला तर ते सारं फारच आवडतं. त्यातून तुझ्यासारखं जर कुणी माझ्याबरोबर असेल तर मी घरी जायचं नावसुद्धा घेणार नाही.''

तिच्या बोलण्यावरून तिला माझ्याविषयी प्रेम वाटू लागलं आहे असंच मला वाटत होतं. मला तिचं मन वळवता येईल. मग ती हळूच तिच्या हृदयातील भावना माझ्यासमोर उघडी करून दाखवायला सुरुवात करील. फूल हळूहळू उमलावं तसं माझं हृदय आशेनं फुलत होतं. झऱ्यासारखी माझी कल्पना झुळूझुळू वाहात होती. वाऱ्यानं केतकी डुलते तसं माझं मन तिच्या अवतीभवती डुलत होतं. हातात काटकी घेऊन ती जमिनीवर रेघोट्या ओढत होती. बाकदार कमान करीत होती. मग तिचे तुकडे करीत होती. असा तिचा खेळ चालला होता. आणि मनात घबराट, धास्ती वा संकोच ठेवल्याखेरीज ती माझ्याशी निकट परिचयाच्या व्यक्तीशी बोलावं तशा गप्पा मारीत होती.

घडीभर आम्ही दोघं मूक झालो. तेवढ्यात वीज चमकून लहान मुलाच्या उरात धडकी भरावी, अघोरघंटला पाहून मालतीच्या जिवाचा थरकाप उडावा, आनंदाच्या जागी शोकाने प्रवेश करावा त्याप्रमाणे खोपटाच्या उघड्या खिडकीतून एकाएकी माझ्या पत्नीचा चेहरा दिसू लागला. आणि रागाने लालपिवळ्या झालेल्या चेहेऱ्याने ती माझ्याकडे एकटक बघू लागली.

तिला बघताच माझ्या शरीराला कंप सुटला. रागाने तिच्या डोळ्यांत पाणी तरळू लागलं होतं. काय बोलावं आणि काय नाही याचा तिच्या मनात गोंधळ उडाला होता. मला चांगलं फैलावर घ्यावंसं तिला वाटत होतं. पण तोंडून मात्र शब्दही उमटत नव्हता. ती फक्त माझ्याकडे बघत राहिली. माझी नजर खाली वळली आणि दली– हात् तुझी ! दली पदरात तोंड लपवून हसत होती.

चित्रकाराला या ठिकाणी तीन छानदार चित्रं काढता आली असती. एक चंडिकेचं, दुसरं जादुगारणीचं आणि तिसरं मूर्खाचं !

# रजपुतानी

□ धूमकेतू

पावसाळ्यात रूपेण नदी अक्राळ-विक्राळ रूप धारण करून दुथडी भरून वाहू लागली, की मी मी म्हणणाऱ्यांच्या उरात धडकी भरते. तिच्या तडाख्यात सापडणारा गरगरून कोसळतो आणि बघता-बघता अदृश्य होऊन जातो. एका पावसाळ्यातील गोष्ट आहे. रूपेणला पूर आला होता. शेतं पाण्याखाली गेली होती. संततधार वर्षणारे ढग एकत्र जमून आकाशपाताळ एक करून टाकण्याचा आवेश दाखवीत होते. त्या अवेळी एक जहागिरदार आपल्या घोड्यावर स्वार होऊन तेथून जात होता.

त्याने आपला घोडा पाण्यात घातला. घोडा जातिवंत होता, चपळ होता. पण पाण्याला जबरदस्त ओढ होती. थोड्याच वेळात घोडा आणि स्वार दोघेही भोवऱ्यात सापडून गटांगळ्या खाऊ लागले.

जहागिरदाराने बाहेर निघायचा खूप प्रयत्न केला. पण त्याला यश आलं नाही. आणि थोड्याच वेळात ते शौर्य व धाडस निष्प्राण झालं.

ज्यावेळी पूर आलेला नसतो त्यावेळी रूपेणकडचा हा रस्ता फारच रमणीय आणि हिरव्यागार वृक्षराजीने आच्छादिलेला असतो. त्या तिकडे वडाचं एक डेरेदार झाड आहे. वाटसरूंनी गाड्या सोडून त्याच्या थंडगार सावलीत विसावा घ्यावा म्हणूनच जणू तो तिथं ठाण मांडून बसला आहे. या विशाल झाडाखाली आजवर किती वाटसरूंनी विश्रांती घेतली आहे त्याला गणतीच नाही. संथपणे वाहणारी रूपेण नदी– वडाचं सुंदर झाड. स्वच्छ जमीन, छोटंसं पण आकर्षक आणि भीतिदायक नसलेलं रान... या सर्व कारणांमुळे अगदी भित्री भागुबाई असलेल्या माणसालादेखील इथे दोन घटका विसावण्याचा मोह आवरत नसे.

पण त्या जहागिरदाराच्या मृत्युनंतर हा सुंदर मार्ग ओस पडत गेला. वाटेल तितका त्रास सहन करूनही लोक लांबच्या वाटेने जाऊ लागले आणि हा रमणीय रस्ता निर्जन झाला. आजूबाजूच्या पंचक्रोशीत अफवा पसरली, की या रस्त्याने जाणारा कोणीही सहीसलामत राहात नाही. म्हणून लोकांनी या रस्त्याने जायचं थांबवलं. ते वळसा घालून दूरच्या रस्त्याने जाऊ लागले. परिणामी हा परित्यक्त मार्ग हळूहळू निर्जन आणि

भीतिदायक होत गेला.

एकदा भर दुपारच्या रणरणत्या उन्हाच्या वेळी एक चारण जवळच्या गावातून या रस्त्याने जायला निघाला. गावातून बाहेर पडताना त्याने रस्ता विचारला तेव्हा अनेकांनी अनाहूतपणे त्याला सल्ला दिला. ''बाबा रे, या वाटेनं जाण्यासारखं नाही. इथनं जाणाऱ्याचं शिर काही धडावर राहात नाही.''

''का ते ? असं का होतं ?''

''पाच वर्षापूर्वी एक जहागिरदार या नदीत बुडला. तेव्हापासून हा रस्ता वैराण झाला आहे. जहागिरदाराने पावसाळ्यात नदी ओलांडण्याचं धाडस केलं. पण त्याची इच्छा पुरी झाली नाही. त्याला नदी ओलांडून आपल्या सासुरवाडीला जायचं होतं. त्याची बायको तिथे होती. तिला घेऊन यायचं होतं. पण वाटेतच बिचारा बुडून मेला. तेव्हापासून या रस्त्याने कुणीच जात नाही.''

''बघू या.'' एवढं बोलून चारणाने घोड्याला टाच मारली. जाणून-बुजून मृत्युच्या तोंडात शिरणाऱ्या त्या मूर्खाकडे पाहून गावचे लोक हसले. चारण मात्र त्याच रस्त्याने निघाला.

उन्हं जरा कलली होती. उन्हाने त्रस्त झालेले पशुपक्षी थोडा वेळ विसावा घेण्यासाठी सावलीत बसले होते. चहूकडे एक प्रकारची स्तब्धता पसरलेली होती. रूपेणचं पांढरंशुभ्र पात्र पाहून वितळलेली चांदी वाहात असल्यासारखं वाटत होतं. हे सर्व पाहून चारणच्या मनात असंख्य भावतरंग उसळू लागले. तो वेडावून गेला. काय सुरेख दृश्य आहे. इकडे वटवृक्ष आपले बाहू पसरून उभा आहे, तिकडे पळसाचं सुरम्य रान आहे, दाट सावलीत कबुतरं, तित्तिरं आणि मोरांची बैठक भरली आहे. ते निसर्गरम्य स्थान पाहून चारणच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडले– ''वा रूपेण ! वा !'' आणि तो पुढे चालू लागला. पण वडाच्या जवळ गेल्यावर त्याला जे दृश्य दिसलं ते पाहून तर तो अगदी चक्रावून गेला...

झाडाखाली सुमारे पंचवीस राजबिंड्या रजपुतांची जणू सभा भरलेली होती. सुंदर जाजमावर गाद्या घातलेल्या होत्या. त्यांना पांढरे खोळ चढवलेले होते. मधोमध अंथरलेल्या मखमली गालिच्यावर एक तरुण रजपूत बसला होता. सभोवताली बसलेल्या मंडळींशी तो काही बोलत होता. झाडाजवळच कच्छ आणि काठियावाडचे जातिवंत घोडे उभे होते. चांदीचा हुक्का इकडून तिकडे सरकवला जात होता. एकीकडे कुसुंभा (एक प्रकारचे मादक पेय) तयार केला जात होता तर दुसरीकडे मिठाईची ताटं ठेवलेली होती. असं वाटत होत, जणू बारा गावचा जहागिरदार प्रवास करताना घडीभर सुस्तावण्यासाठी इथं थांबला असावा. शौर्य, समृद्धी आणि परंपरा

यांचं ते चालतं-बोलतं प्रतीक पाहून चारणदेखील घोड्यावरून खाली उतरला आणि त्या मंडळींकडे निघाला.

त्याला येताना बघून त्या तरुण रजपुताच्या तोंडावर स्मित झळकलं. त्यानं अर्थपूर्ण नजरेनं सभोवतालच्या मंडळींकडे पाहिलं आणि सर्वांनी एकसुरात म्हटलं "यावं, यावं. अगदी वेळेवर आलात. कुठून आलात ?"

चारण तिथं बसला. पण कुणाच्याही चेहऱ्यावर त्याला मानवी तेज दिसेना म्हणून लगेच उत्तर न देता तो थबकला. पण झाडाखाली खिंकाळणारे उमदे घोडे पाहून तो स्वस्थ चित्ताने समोर बसला. मंडळींमध्ये फिरवल्या जाणाऱ्या हुक्क्याचे दोन-चार झुरके घेतले, कुसुंभादेखील पोटभर प्यायला. मग काय विचारता ? तो जणू स्वप्ननगरीत विहरू लागला. आणि मनमोकळेपणाने गप्पा मारू लागला.

"आपण देवीपुत्र (चारण लोकांना देवीचे पुत्र समजतात) आहात ना ?" एका तरुण रजपुताने अचानक मध्येच विचारलं, "एका प्रश्नाचं उत्तर द्या."

चारण प्रश्नार्थक मुद्रेनं त्याच्याकडे बघू लागला.

"त्याचं असं आहे की देवाने इतके तऱ्हेतऱ्हेचे दिवस आणि ऋतू निर्माण केले आहेत की एका ऋतूचा आनंद दुसऱ्या ऋतूतील आनंदापेक्षा वेगळा असतो. तरीदेखील सर्वांत उत्तम आणि आनंददायी ऋतू कोणता ?"

चारण गुडघ्यांवर बसला, जणू सारं काही त्याला उमजलं.

"सरकार, सर्वच ऋतू तसे पाहिले तर चांगले असतात. पण देवाने तरुण स्त्री-पुरुषांसाठी शीतकाळ निर्माण करून त्या सर्वांवर जणू कळस चढविला आहे. शीतकाल, अबब ! काय सांगावं त्याचं ? थंडीचे दिवस येतात, तऱ्हेतऱ्हेची पक्वान्नं खाण्यात येतात, शेकोटीभोवती शेकून सारं अंग खुलतं. जोडीला हुरडा आणि गोरीगोमटी बाई. काय सांगू आणि किती सांगू ? शंकर-पार्वतीची तपश्चर्या भंग करण्यासाठीच देवाने शीतकाळ निर्माण केला आहे."

रजपुताच्या डोळ्यांत तेज दिसू लागलं.

"पण मानवजातीला जीवन देणाऱ्या वर्षाऋतूचं काय ?" त्याने पुन्हा चारणाला विचारलं. चारणानं मान हलविली. "छे, छे, मायबाप. पावसाळ्यात पाहावं तिकडे पाणीच पाणी आणि चिखल. त्यात पुन्हा विजा कडाडतात. ढग गडगडतात. प्राणी काय, माणूस काय साऱ्यांनाच वैताग...'

रजपूत जरा ताठरला. त्याच्या डोळ्यांत दाट वेदना आणि निराशा दिसू लागली, चारण बघतच राहिला. मग म्हणाला, "महाराज, असा हा पावसाळा नेहमी त्रासदायकच असतो. या ऋतूत प्रियकर-प्रेयसी प्रसन्नचित्ताने प्रेमालाप थोडेच करू

शकतात ? स्वामी, सर्व ऋतूंत शीत ऋतूच सर्वश्रेष्ठ आहे. त्याच्या खालोखाल येतो ग्रीष्म ऋतू. वर्षाऋतूला काही अर्थ आहे का ? सर्वांत वाईट ऋतू !''

''शाबास चारण. शाबास ! खरोखरच तुम्ही देवीपुत्र आहात.'' इतकं बोलून रजपूत उठून उभा राहिला, आणि चारणापाशी येऊन त्याचा हात धरून त्याने त्यास उठवलं.

''देवीपुत्र, मी जहागिरदार आहे.'' रजपुताने सांगायला सुरुवात केली. चारणाने विव्हल होऊन आजूबाजूला पाहिलं. सभेतील मंडळी अदृश्य झाल्याचं आणि घोड्यांचं खिंकाळणे बंद झाल्याचं त्याला जाणवलं. वडाच्या झाडाखाली आता फक्त तो आणि जहागिरदार असे दोघेच उभे होते. ''पाहा, भिऊबिऊ नका हं...''

चारण हसला, ''मी आणि भिणार ? सांग रजपुता सांग. तुझ्या मनात जे काय असेल ते सांगून टाक.''

तरुण रजपुताच्या चेहेऱ्यावर आशेचे किरण झळाळू लागले. त्याने प्रेमभराने चारणाचा हात किंचित् दाबला आणि म्हटले, ''पाच वर्षांपूर्वी मुसळधार पावसात मी बायकोला भेटायला निघालो होतो. रूपेणला पूर आलेला होता आणि तो भोवरा...'' त्याने हाताने तो भोवरा दाखवीत अतिशय व्यथित नजरेने तिकडे पाहिले, ''मी त्या भोवऱ्यात बुडलो. बायकोला भेटायची माझी इच्छा अतृप्तच राहिली.''

रजपूत थोडावेळ स्तब्ध राहिला. जणू निराशेचा पहाड लपवण्याचा प्रयत्न तो करीत होता. मग म्हणाला, ''देवीपुत्रा, दोन प्रेमिकांच्या विरहासारखं विपरीत जगात आणखी काय असणार आहे ?''

''काही नाही मालक. पण तुम्ही तुमची सारी कथा मला सांगा.''

''जन्मजन्मांतरीचा फेरा माझ्याभोवती आवळला जातोय. तुम्ही माझं एक काम केलं तर माझ्या अतृप्त आत्म्याचा उद्धार होईल. तुम्हाला ठाऊकच असेल की आगीच्या ज्वाळांमध्येही दग्ध न होणाऱ्या आत्म्याला निराकार वासना गिळून टाकते.''

''हं.''

तुम्ही रूपेण ओलांडून पश्चिमेकडे जा. पाच गावांनंतर दातासर गाव आहे. तिथे माझी बायको राहाते. इतकी सुंदर जणू सिंदुरानेच घडविलेली आहे ती ! एकदाच फत एकदाच येऊन मला भेटून गेली तर माझ्या आत्म्याला शांती मिळेल. हे काम तुमच्याखेरीज आणखी कोण करू शकणार ?''

रजपुताचा विनंती करणारा व्यथित स्वर बंद होताच चारणाने उत्तर दिले, ''ठाकूर

मी प्रतिज्ञा करतो की, सच्चा देवीपुत्र असेन तर ठाकुराणीला एकदा नक्कीच इथे आणीन. पण तुम्हीदेखील सच्चे रजपूत असाल तर एक वचन द्या की, या राजमार्गावर पुन्हा कधी येणार नाही.''

''जा. मी वचन देतो, की मी हा मार्ग सोडून जाईन. आणि चारणा, मी पावसाळ्यात बुडलो म्हणून मला पावसाळा अजिबात आवडत नाही. मी वाटसरूंना फक्त इतकंच विचारतो, की कोणता ऋतू सर्वांत चांगला आहे आणि ते घाबरल्याने दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशी मरण पावतात. आता ते असे मरतात त्यात माझा काय दोष ?''

''बरं तर मालक, आजपासून आठव्या दिवशी ठाकुराणी इथं येईल.''

चारणाने मान फिरवली आणि घोड्याचा लगाम धरण्यासाठी मागे नजर टाकली, मग वळून पाहातो तो काय ? तेथे फक्त वडाची पाने सळसळत होती. जणू तीव्र वेदना सहन करण्यासाठी तो एकटाच उभा राहून पानं हलवीत होता.

रजपुताने दाखवलेल्या मार्गाने मजल करून चारण दातासर गावी पोचला. एरवीदेखील युद्धात शूर रजपुतांना चारणाबद्दल आदर व प्रेम असते. शिवाय अंतःपुरात गेल्यास राजदरबारातील कुणावरही किटाळ येण्याची शक्यता असते, पण राजकवी मात्र नेहमी निर्दोष समजला जातो म्हणून ठाकुराणीची एकान्तात भेट घेण्यास चारणाला कसलीही अडचण नव्हती. तो रजपुताच्या सासरी गेला आणि रजपुतानीला एकान्तात भेटला.

''ठाकुराणी, मी एका कामासाठी आलो आहे. नाही म्हणू नका.''

काठियावाडी भाषा थोडी कर्कश असते. पण ठाकुराणी जितकी लावण्यवती होती तितकाच तिचा आवाज गोड होता. बोलताना तिच्या कानांतले लहानलहान सुंदर डूल झुलत होते आणि तिची सोनेरी दंतपक्ती दिसली की, असं वाटत होतं जणू शब्दांत साखरच पेरलेली आहे.

ठाकुराणीने उत्तर दिले, ''बोला, कसलं एवढं काम काढलंय माझ्याकडे ?''

''मालकीणबाई, जिवात जीव असेपर्यंत सारेचजण प्रेम करतात. पण मी मृत्यूनंतरही प्रेम करण्याविषयी सांगायला आलो आहे.'' ठाकुराणी चमकली. चारणाचं बोलणं अधिक लक्षपूर्वक ऐकू लागली. चारणाने विचारलं, ''ठाकुरांना जाऊन किती वर्ष झाली ?''

''पाच वर्ष.''

''खरंय. आता अगदी खरं सांगा हं, तुम्ही त्यांना कधी स्वप्नात पाहिलंय ?''

''नाही. कधीच नाही. असं वाटतं ते गेले आणि प्रेमही विसरले.''

''नाही बाईसाहेब, तसं अजिबात नाही. सच्चा कुलीन रजपूत काय कधी सतीला विसरू शकतो ? शंकर-पार्वतीच्या प्रेमात् का कधी कसली कमतरता राहाणे शक्य आहे ? ते तुम्हाला अजून विसरलेले नाहीत. आणि मालकीणबाई विचारू, रागावणार तर नाही ना, तुम्हीदेखील खऱ्या रजपुतानी आहात ना ?''

रजपुतानीची मान ताठ झाली. चारणाला थरारून टाकणाऱ्या दृढ स्वरात ती म्हणाली, ''परीक्षा घेताय का ? ठाकुरांनी भूत होऊन माझी विचारपूस केली आहे ना ?''

चारण चकित झाला, ''कमाल आहे तुमची. तुम्हाला कसं कळलं हे ?''

''कसं कळलं ज्या रजपुताला रणांगणावर वीर मरण येत नाही तो मेल्यानंतर भूतच होतो आणि मी सती गेले नाही त्यास कारण हेच, की मला त्या भुताला त्याच्या वासनांसह मुळापासून नाहीसं करायचं आहे. बोला, आता तुम्हाला काय म्हणायचं आहे ?''

''तुम्हाला भेटायला येत असता ठाकूर रूपेण नदीत बुडाले. हे काय सामान्य प्रेम आहे ?''

''छे, छे, सामान्य कुठंय ?'' ठाकुराणी कठोर स्वरात म्हणाली, ''म्हणूनच तर सोन्यासारखा राजमार्ग ठाकुराने ओसाड करून टाकला नाही का ?''

''खरंय मालकीणबाई. तुमचं म्हणणं खरं आहे. पण मेलेल्या माणसाशी कसलं वैर आलंय ? भूतपिशाच्चासमोर कुणाचा टिकाव लागलाय ? ती त्यांची वासना असते. तुकडाबिकडा टाकला की, पळून जातात. ऐका, तुम्हाला बघण्याची ठाकुराची वासना आहे. दोन दिवसांपूर्वी ते मला वडाच्या झाडाखाली भेटले होते. भर दिवसा केसरीसिंहासारखा दरबार भरवून बसले होते. समस्त ''देवांशी'' रजपूत हजर होते. जणू सर्वच्या सर्व मृत्युलोकात अवतीर्ण झाले होते. तुमचं दर्शन घडवून देण्याचं वचन ठाकुरांनी माझ्यापासून घेतलं आहे. आणि बाईसाहेब, मी त्यांना वचन दिलं आहे. माझं वचन पुरं करणं आता तुमच्या हातात आहे. तुम्ही ते केलं, तरच माझी सुटका होईल. मीदेखील त्यांच्यापासून वचन घेतलं आहे. की त्यानंतर पुन्हा कधी ते या रस्त्याकडे फिरकणार नाहीत.''

''वचनाचं पालन मी करीन. एकदा नाही हजारदा करीन. पण मी इथली ठाकुराणी आहे. त्याने वाटसरूंना ठार मारलं आहे आणि मारल्यानंतरदेखील कुणास ठाऊक कशी वर्तणूक केली आहे ! रूपेणचा डेरेदार वड निर्जन करून टाकला आहे आणि

सुवर्णरेखेसारखा राजमार्ग काळाकुट्ट करून टाकला आहे. असला रजपूत माझा पती का असेना मी त्याचा जीव घेईन. मी येईन. जरूर भेटायला येईन. पण चारण, त्यांना सांगा की ठाकुराणी येत आहे. आणि पुन्हा एकदा तलवारीच्या पात्यावर विवाहसोहळा साजरा होऊ देत.''

''पण बाईसाहेब, त्यांना शरीर कुठंय ? त्यांच्याशी कसे तलवारीचे दोन हात करणार ? हाती लागायला तो मानवी देह थोडाच आहे ? धुळीच्या लोटासारखा तर उडून जाईल...''

ठाकुराणी केवड्याच्या कणसासारखी ताठ झाली. नागिणीसारखा फूत्कार करीत ती तन्वंगी उठून उभी राहिली. चारणासारख्या मर्दाच्या हाडांनादेखील कंप सुटावा इतक्या भेदक नजरेने तिने त्याच्याकड पाहिले– ''तुम्ही देवीपुत्र आहात ना ? तुम्ही रजपुतानीशी बोलायला आला आहात की सावकारणीशी ?''

आणि डोळ्यांचं पातं लवतं न लवतं तेवढ्यात झटकन उडी मारून तिनं खुंटीवरची काळ्या नागिणीसारखी तलवार काढली. म्यान फेकून नागवी तलवाार हाती घेऊन ती दृढ स्वरात म्हणाली, ''चला देवीपुत्र. पुढे व्हा. आज तो मार्ग निर्धोक करायचा आहे.''

चारण मुकाट्याने चालू लागला. ठाकुराणी त्याच्या पाठोपाठ चालू लागली. जणू महिषासुराचा वध करायला निघालेली रणचंडीच !

दुपारची बाराची वेळ साधून चारण आणि ठाकुराणी वडाच्या झाडाखाली येऊन ठेपली. वडाची पान इतकी जोरजोरात सळसळत होती, की भेकड माणूस तर गळितच झाला असता. आजूबाजूला दृष्टीच्या टप्प्यापर्यंत कुणीही दिसत नव्हतं. वडाच्या झाडाखाली एकही प्रवासी नव्हता. अशा या भयाण शांततेत चारण आणि ठाकुराणी दोघेच काय ते उभे होते.

''कुठे आहे रजपूत ?'' ठाकुराणीने विचारले. तिच्या आवाजाने जणू तो वड थरारला आणि पानांची जास्तच सळसळ करीत म्हणाला, ''इथं कुणीही नाही.''

''थांबा, येईलच इतक्यात.''

दोघेही थोडा वेळ गप्प उभे राहिले. त्यांच्या मौनामुळे ती जागा अधिकच भयाण झाल्यासारखी वाटू लागली.

अचानक एक घोडेस्वार येताना दिसू लागला. जणू रजपूतच आपल्या उमद्या घोड्यावर बसून येत होता. त्याचे डोळे रूपेणवर खिळलेले होते.

चारणने विव्हल होऊन ठाकुराणीकडे पाहिलं. तिच्या चेहेऱ्यावर भीतीचा लवलेशही नव्हता. तिने आपली तलवार आणखीनच घट्ट पकडली. आणि चारणला

आव्हान दिलं, "पहा बरं. मर्दासारखे रहा."

थोड्याच वेळात तो घोडेस्वार दृष्टिपथात येऊ ठेपला. अठ्ठावीस-एकोणतीस वर्षाचा तो एक सुंदर तरुण रजपूत होता.

"हेच आहेत ! येऊ देत त्यांना."

"बघ माय, वार करू नकोस."

रजपूत अगदी जवळ आला. त्याचा देखणा चेहरा दिसू लागला. ती ठाकुराणीकडे बघू लागला. ठाकुराणी त्याच्याकडे बघू लागली.

"ओळखलं ?"

"हो." ठाकुराणीने उत्तर दिलं, "का नाही ओळखणार आपल्या बायकोला भेटण्यासाठी ज्याने निष्पाप वाटसरूंचा बळी घेतला, राजमार्ग अपवित्र करून टाकला. आणि भिकाऱ्यांसारखी चारणापाशी याचना केली त्या..."

"छे, छे, बाईसाहेब" चारणाने मध्येच रजपुतानीला अडवलं. रजपूत ओशाळला घोड्याचा लगाम त्याच्या हातून ओघळल्यासारखा वाटला. अतिशय विषादपूर्ण नजरेनं त्यानं ठाकुराणीकडं पाहिलं– "ठाकुराणी..."

"माझ्या गावच्या, माझ्या आसऱ्याला राहणाऱ्या लोकांना तुम्ही का मारलंत ?"

"मी ? मी नाही मारलं ठाकुराणी."

"सच्चा कुलीन रजपूत असशील तर हो तयार."

जहागिरदाराची आकृती एकदम पालटली. चारण थरथरू लागला. पण विजेचा लोळ कोसळावा तशी जहागिरदारणीच्यां हातातील तलवार लखलखली आणि तिने इतक्या जोरात प्रहार केला जणू एका घावात धडाचे दोन तुकडेच करायचे होते.

"मारून टाकलंत. पुरे झालं बाईसाहेब." ओरडत चारण मध्ये पडला. पण जहागिरदार अदृश्य झालेला होता आणि वार रिकामा गेल्याने जहागिरदारीण ओणवली होती. तलवारीच्या सपकाऱ्याने थोडीशी धूळ उडालेली दिसली.

"खूप झालं मालकीण."

"काही हरकत नाही देवीपुत्र. तुम्ही तुमचं वचन पुरं केलं." हवेतून फक्त शब्द ऐकू आले.

ठाकुराणाने ताडदिशी आवाजाच्या रोखाने पाहिलं. जहागिरदार घोड्यावर स्वार होऊन नदीकडे जाताना दिसला. तलवार उगारून तिने त्याच्याकडे झेप घेतली. तिच्या पाठोपाठ चारण धावला.

रूपेणचं स्वच्छ निर्मळ पाणी संथपणे वाहात होतं. जहागिरदाराने घोडा पाण्यात घातला. ठाकुराणीदेखील त्याच्या मागोमाग नदीत उतरली.

"जहागिरदार असशील तर थांब, तिथेच थांब." ठाकुराणी कडाडली.

जहागिरदार थबकला. ठाकुराणी त्याच्यापाशी पोचली तोच तो पुन्हा अदृश्य झाला. पण ठाकुराणीला वाटलं जणू कुणीतरी तिची वस्त्रं धरून तिला पाण्यात खेचत आहे. तिचा घागरा भिजला होता आणि त्यातून पाणी ठिबकत होतं. ठाकुराणीने खाली पाहिलं. पाण्यात रजपुताचा चेहरा दिसल्यासारखं तिला वाटलं. अत्यंत कातर चेहरा. तिला भास झाला की रजपूत दोन्ही अतृप्त हातांच्या ओंजळीत तिच्या घागऱ्यातून ओघळणारे थेंब गोळा करीत आहे आणि अतिशय व्याकुळपणे त्या पाण्याचे घोट घेत आहे. घुटुक...घुटुक... घुटुक...

ठाकुराणी पाहातच राहिली. रजपुतानेदेखील तिच्याकडे पाहिलं. किती वेदना, किती दुःख, किती निराशा, किती अवर्णनीय तृष्णा भरली होती त्या डोळ्यांत ! "रजपुता !" ठाकुराणी मायेने भिजल्या स्वरात उद्गारली, "रजपुता, हे काय ?"

"बस. माझी तहान भागली. पुरती भागली. ठाकुराणी घाल आता तलवारीचा घाव. या दुसऱ्या मरणात पहिल्यापेक्षाही जास्त आनंद वाटेल."

रजपुतानीच्या हाताची तलवारीवरील पकड ढिली पडली. तलवार हातून सुटता-सुटता राहिली. खाली वाकून तिने रजपुताचा हात हातात धरला.

रजपुताने हल्केच हात सोडवून घेतला. रजपुताणीने पुन्हा हात धरला आणि सद्गदित कंठाने विचारले, "तुम्ही कुठं बुडाला होता ? आणि आता कुठं जाताय ?"

रजपुताने रूपेणमध्ये दूरवर पाहिलं. एके ठिकाणी पाणी खूप खोल होतं. त्या जागी त्याची दृष्टी स्थिरावली.

"आता मी तुम्हाला जाऊ देणार नाही." रजपुतानीने तलवार दूर पाण्यात फेकून दिली आणि रजपुताचा दुसरा हातही धरला.

पण तिच्या हाती पाण्याचे बुडबुडेच आले. रजपुताचा चेहरा पाण्याच्या लाटांवर थोड्या अंतरावर दिसला. रजपुतानी पुढे झाली. हाताने तिला जवळ येण्यासाठी खुणावत रजपूत आणखी पुढे गेलेला तिला दिसला. ती आणखी पुढे झाली. रजपूत आता आणखी दूर गेलेला दिसला.

चारण काठावरून ओरडला, "बाईसाहेब, परत या. पुढे पाणी खोल आहे. तो तर निघून गेला. या परत या."

मधुर स्मित करीत रजपुतानी म्हणाली, "जा, देवीपुत्रा, जा. सुखाने आता तुम्ही' घरी जा. मला तर या दुःखी रजपुताचा संसार पुन्हा उभारायचा आहे."

# खेमी

□ द्विरेफ

"अरे, किती काड्या उगाच वाया घालवल्यास. एक आगपेटी निदान दोन दिवस तरी पुरवीत जा." खेमीने म्हटलं. कारण विडी शिलगावण्यासाठी धनियाने एका पाठोपाठ एक पाच काड्या पेटवल्या होत्या.

"पण वारा कसा सुटलाय ते तर बघ. काडी पेटतच नाही." धनियाने पुन्हा आगपेटी उघडीत म्हटले.

"थांब. मी पदराचा आडोसा करते." खेमीने डोक्यावरचा पदर ओढला. आणि धनियापाशी जाऊन त्यांच्यासमोरचा वारा अडवू लागली. धनियाची काडी पेटली. त्याच्या श्वासाबरोबर काडीचा प्रकाशदेखील लकाकू लागला. धनिया बायकोचा तारुण्यानं रसरसलेला चेहरा पाहातच राहिला. सतेज गव्हाळ वर्ण, मोठमोठे काळेभोर डोळे, नाकात मोठी चमकी. विडीचे झुरके घ्यायचं विसरून तो देहभान हरपून नवतीचं सौंदर्यपान करण्यात दंग झाला. विडी पेटली होती म्हणून खेमी तिथून बाजूला होऊ बघत होती. पण धनिया म्हणाला, "जाऊ नकोस. तुला माझी शपथ."

"वेड लागलं की काय ?" म्हणत खेमी आपल्या जागेवर जाऊन बसली.

"तुझी शपथ खेमी, तू मला खूपच आवडतेस."

"आता काय सांगावं– अरे आजूबाजूला किती माणसं आहेत त्याचा तरी विचार कर जरा."

"ते सगळे खाण्यापिण्यात दंग आहेत. आपल्याकडे बघायला कुणाला वेळ आहे ?" नवीन लग्न झालेल्या सर्व जोडप्यांना असंच वाटतं, नाही का ?

धनिया ज्यांच्या घरी काम करायचा त्यांच्यापैकी एका वाण्याकडे आज गावजेवण होतं. म्हणून चमचमीत खायला मिळायच्या आशेनं संडासाच्या पायऱ्यावर बसून दोघंजण गुजगोष्टी करीत होते. खालच्या जातीच्या लोकांना बाहेरच रोखण्यासाठी म्हणून शेठने त्यांना तिथं बसायला सांगितलं होतं.

धनियाने खांद्यावर पंचा, त्याखाली रेशमी बंडी आणि पायात मोजे घातले होते. खेमीसुद्धा रेशमी वस्त्र नेसली होती. अहेवपणी मरण पावलेल्या एका शेठाणीवरून

स्मशानात ते काढून फेकून देण्यात आलेलं होतं. काही दिवसांपूर्वी त्या दोघांचं लग्न झालं त्या वेळीदेखील त्यांनी हेच कपडे घातले होते.

धनिया विडीचा एक झुरका घेऊन म्हणाला, "खेमी, तुझ्या आईनं काय वाटेल ते मागितलं असतं तरी मी दिलं असतं. पण तुझ्याशीच लग्न केलं असतं."

"पण माझ्या आईनं एक पै तरी तुझ्याकडून घेतली का सांग. उलट मीच माझ्याबरोबर थोडंफार घेऊन तुझ्या घरी आले आहे. माझ्या आईनं तर बामणांसारखं माझं लग्न करून दिलंय."

"तुझी आई खरंच फार चांगली आहे. पण तू इतकी वाईट कशी काय ग ?"

"आता बघा– मी काय रे तुझं वाईट केलंय ?"

"सांगू ? लग्नाच्या वेळी तू काय पण नखरे केलेस, म्हणे दारू पिणार नाही, शिव्या देणार नाही, मारणार नाही असं वचन देत असलास तरच लग्न लावीन आणि कधी अट मोडली तर त्याच दिवशी सोडून जाईन. आता तूच सांग. असं कधी होतं का ?"

"का नाही होत ? नवऱ्यानं दारू पिऊन यावं, दंगामस्ती करावी आणि तोंडाला येईल ते बोलावं हे सर्व सहन करणं मला शक्य नाही. असा मार खाणाऱ्या बायका निराळ्याच असतात."

खेमीच्या खरेपणापुढे आणि तेजापुढे धनिया हतप्रभ झाला. "खरं आहे. पण मी दारूला हात तरी लावतो का ? का तू अशी कावून बोलतेस ? काय वाटेल ते झालं असतं तरी मी तुझ्याशीच लग्न लावलं असतं. तू लहान होतीस आणि 'गाती' * बांधून तुझ्या आईबरोबर जायची-यायचीस तेव्हापासूनच तू मला अतिशय आवडतेस. तू 'गाती' बांधायला कुठून शिकलीस ग खेमी ?" धनियाने खेमीच्या चोळीच्या गाठीला स्पर्श करीत विचारले.

"पडधरीत. तिथं सर्व पोरी काम करताना अशाच गाती बांधायच्या." खेमीची आई मुळात काठियावाडमधील पडधरी गावची होती. तिथं दुष्काळ पडला तेव्हा ती खेमीला घेऊन इथं राहायला आली होती.

"पण धनिया, तुम्ही लोक ही दारू का रे पिता ? दारूत असं काय मोठंसं असतं ? तू तर सांगत होतास की दारू कडू असते म्हणून ?"

"खेमी, कधीकधी दुःख झालं की माणसं पितात. खूप दमलेली असली आणि मनही दुःखी असलं तर प्यायल्यानं जरा बरं वाटतं."

खेमी थोडा वेळ गप्प बसली. मग आपला अहंकार आणि भाग्य कुरवाळावंसं

---

* एक फडकं. हे अंगाभोवती गुंडाळून गळ्याशी याची गाठ बांधतात.

तिच्या मनात आलं. तिनं विचारलं, "धनिया, माझं दुसऱ्या कुणाशी लग्न झालं असतं तर रे ?"

"तुझ्याशी लग्न करायला दुसऱ्या कुणाची माय व्याली होती ? तू कुठंही असतीस तरी मीच तुला पळवून आणली असती."

खेमीने म्हटलं, "पुरे झालं. इतकी काही घमेंड नको. जगात शेराला सव्वाशेर असतो बरं."

त्याच वेळी पंगतीत गोंधळ उडाला. एक कुत्रं आत शिरलं होतं आणि त्याने एका भांड्याला तोंड लावलं होतं. त्याला बाहेर पिटाळून लावण्यात येत होतं. शेठ रागावला. तो गड्यावर ओरडला. गड्याने भंग्याची चूक दाखवली. शेठचा सारा राग भंग्यावर निघाला– "मोठा गव्हर्नरच लागून गेलाय नाही का ? बसलाय आपला विड्या फुंकीत. साधं कुत्रंदेखील हाकलता येत नाही. उठा मेल्यांनो इथून..." फक्त मारायचं तेवढंच काय ते बाकी राहिलं होतं.

धनिया-खेमीला खूप वाईट वाटलं. त्यांच्या रंगाचा बेरंग झाला होता. सारा उल्हास मावळला होता. काही एक न बोलता दोघेही उठून चालू लागले. कुठे जायचे ते काहीच ठरवलेलं नव्हतं. पण अगदी सहज, नकळत रिची रोडच्या दिशेने खेमीची पावले वळली. तिथे कदाचित काही मनोरंजक दृश्यं पाहायला मिळतील. खेमीपेक्षाही धनियाला जास्त वाईट वाटलं. खेमी त्याला समजावू लागली. ज्या गोष्टी धनिया त्या वेळी तिथे बोलू शकत नव्हता त्या तो इतक्या वेळानंतर आता सांगू लागला– "कुत्र्याला पिटाळून लावायचं काम खरं तर गड्याचंच होतं. उगाच माझ्यावर का इतका राग काढला ?" खेमीने पुन्हा त्याला दिलासा दिला. धनियाने मनातली मळमळ सांगून टाकली. "त्याचं काही नाही ग. तुझ्यासमोर तो मला इतकं बोलला हे मला नाही आवडलं."

खेमी विचारात पडली. आपणच धनियाला बोलण्यात गुंतवलं म्हणून त्याला इतका अपमान सहन करावा लागला या गोष्टीचं तिला वाईट वाटू लागलं. व्यथित मनाने धनिया गुपचूप चालत होता म्हणून खेमीचं मन आतल्याआत रडत होतं. जाता-जाता रायखडच्या गुत्त्याची वाट आली. खेमीला आठवलं की, धनियाला दुःख झालं म्हणजे दारू घेतल्यानं त्याला बरं वाटतं. स्त्रीसुलभ कोमलपणे तिने पदरात बांधलेली अधेली काढून धनियाला देत म्हटलं, "कुठवर असा मुक्यासारखा चालत राहाणार आहेस ? जा, तिकडं जाऊन थोडी दारू पिऊन ये. लवकर ये हं. मी इथंच थांबते." धनिया खूष होऊन लगेच निघून गेला.

खेमी वाट पाहात उभी राहिली. आपण केलं ते योग्य नाही याची रुखरुख तिच्या मनाला लागली. स्वतःच दारूला हात नाही लावण्याचं वचन त्याच्याकडून घेतलं आणि आता स्वतःच दारूसाठी पैसे काढून दिले. तेवढ्यात धनिया मोठ्या आनंदाने परत आला आणि सांगू लागला, "बघ खेमी आता सारं ठीक झालं. दारू प्यायल्यानं मी ठीक होतो म्हणून म्हटलं नव्हतं मी तुला ?"

खेमी म्हणाली, "ते राहू दे आता. पण पुन्हा कधी घेतलीस तर मात्र याद राख. घरातून हाकलून देईन."

"नाही खेमी. मी पुन्हा कधीही नाही पिणार. तू मला फार-फार आवडतेस. त्या शेठची मेजवाणी गेली चुलीत. मी दारू पितो खरा. पण मला त्याची नशा फारशी चढत नाही. तूच बघ. माझ्या बोलण्यात काही फरक वाटतोय तुला ? तू उगाच मला घाबरतेस. मी कितीही प्यायलो ना तरी तुझ्या अंगावर कधीही हात टाकणार नाही. माझं तुझ्यावर खूप-खूप प्रेम आहे..."

अशीच वायफळ बडबड करीत धनिया चालू लागला. खेमी पण झाल्या घटनांचा विचार करीत मुकाट्याने घराकडे चालत राहिली.

(2)

संध्याकाळची वेळ आहे. अहमदाबादेत असताना धनियाला ज्या 'गाती'चा मोह पडला होता तीच गाती नेसून खेमी अंगणातला केर काढीत आहे. पण यावेळी ती अहमदाबादेत नाही. सहा महिन्यांपेक्षा जास्त झालेत, तिने दोघांनाही सोडलं आहे.

खरं तर, लग्नाच्या वेळी दारू न पिण्याची प्रतिज्ञा धनियाने केली होती. पण उपरोक्त घटनेनंतर तो दारू पिऊ लागला होता. त्यामागे कैक कारणे होती. प्रतिज्ञापालन हे त्याला शत्रूसमोर उणं पडण्यासारखं वाटत होतं. आपल्याला दारू चढत नाही हा दारूड्यांचा मिथ्याभिमानदेखील त्यामागे होता. शिवाय त्याची संगतही चांगली नव्हती. खेमी कितींदा त्याला बोलली, त्याच्यावर रागावली, त्याला सोडून जायची धमकीदेखील दिली पण ती निव्वळ धमकी समजून धनियाने तिकडे लक्षच दिलं नाही. अखेर एक दिवस त्याला जादाच चढली आणि त्याने खेमीला मारायला सुरुवात केली. कदाचित याच घमेंडीत की खेमी कसली त्याला सोडून जातेय ?

पण खेमी दुसऱ्याच दिवशी तिथून निघाली. तिची आई वारली होती. म्हणून ती नडियाडला आली आणि नोकरी करू लागली. नगरपालिकेत परसोत्तम नावाच्या

भंग्यांचा मुकादम होता. त्याला पगारातून लाच द्यायचं कबूल करून खेमीने नोकरी मिळविली. नडियाडमध्ये सर्वांचा तिच्याविषयी हाच समज होता, की ती एक स्वच्छंदी बाई आहे. सर्वजण तिच्याशी थट्टामस्करी करायचे. पण खेमीच्या मनात मात्र धनियाला सोडल्याचं शल्य खोलवर रुतलेलं होतं. अहमदाबादहून येणाऱ्या प्रत्येक भंग्याला ती मोठ्या आतुरतेने धनियाच्या खुशालीविषयी विचारायची. धनियापाशी गेल्यास तो पुन्हा प्रेमाने घरात घेईल याची तिला खात्री होती. पण तिने ठाम निश्चय केला होता, की धनियाने बोलावल्याशिवाय परत जायचं नाही.

धनियाने परत बोलावून घ्यावं म्हणून खेमीने देवीदेवतांना तऱ्हेतऱ्हेचे नवस केले होते. तरीसुद्धा अजूनपर्यंत काही धनियाकडून बोलावणं आलं नव्हतं. खेमी मनातून खचू लागली होती. याच निराशेपोटी येणारा सारा राग ती लाचखाऊ परसोत्तमवर काढायची. परसोत्तमला चिडवण्यासाठी तिने काही गाणीदेखील रचली होती.

खेमीच्या जवळच झाडू लावीत असलेल्या मंगीने केर काढता-काढता म्हटलं, ''खेमली अग, ते गाणं म्हण बघू जरा.''

खेमी धनियाचा विचार करीत होती. विमनस्कपणे म्हणाली, ''तूच म्हण ना.''

मंगीला खेमीसारखं गाता येत नव्हतं. म्हणाली, ''त्याची चौथी ओळ मला नीटशी जमत नाही.''

''तुला गाता येत नसेल.''

''तूच गाऊन दाखव बघू.''

खेमी सावध झाली आणि गाऊ लागली–

ओरो आव्यने केशला, तारो ओशलो कुटूं
ओरो आव्यने केशला, तने पाटुए पीटूं
ओरो आव्यने केशला, तने धोकणे ढीबूं
ओरो आव्यने केशला, तारे पूंछडे लींबू *

''आता यात काय येत नाही तुला ?''

''हे तर आपलं ट ला फ जुळवलेलं दिसतंय. शेपटीवर का कुठं लिंबू ठेवता येतं ?''

''मिशीवर ठेवतात ग. पण त्याला मिशा असतील तर ना ! म्हणून तो आपल्या शेपटीवरच लिंबू ठेवतो.'' मंगी खदखदून हसली. परसोत्तमच्या अरुंद कपाळ

---

* गुजराती लोकगीत ''चकली तारा खेतरमां में झींझवो वाव्यो''च्या चालीवर गीताचा अर्थ आहे– इकडे ये मेल्या, तुझी छाती कुटते, तुला लाथांनी मारते, तुला कपडे धुवायच्या दांडक्याने बदडते. चौथ्या ओळीचा अर्थ आहे– तुझ्या शेपटीवर लिंबू.

असलेल्या गोऱ्या आणि उभट चेहऱ्यावर त्याच्या बारीक भुऱ्या रंगाच्या मिशा असून नसल्यासारख्याच वाटायच्या.

दोघी उत्साहाने गाऊ लागल्या. तेवढ्यात परसोत्तम आला. डोक्यावर केसाळ टोपी, खालून दिसणाऱ्या शर्टावर हाफ कोट, हातात एक बारीक छाडी जी स्वतःच्याच धोतरावर फलकावीत तो चालला होता. ते गाणं त्यानेही ऐकलं. गाण्यात त्याचं नाव नव्हतं. स्पष्टपणे त्याच्याविषयी काही सांगितलेलं नव्हतं. तरीदेखील काव्यशास्त्राच्या कोणत्या तरी गूढ नियमांनी त्याला कळून चुकलं होतं की गाणं त्यालाच उद्देशून रचलेलं आहे. 'अंतःकरणाच्या साक्षी'' चं सूत्र जीवनाच्या अन्य क्षेत्रांपेक्षा उपहासाच्या क्षेत्रात सर्वात अधिक सत्य सिद्ध होतं. परसोत्तम ओरडला, ''ए भवान्यांनो, काम करा काम. गाणी कसली गात बसलाय ?''

मंगी गडबडली. पण खेमीने मात्र धिटाईनं उत्तर दिलं, ''गातोय तर काय झालं, हातांनी काम पण करतोय. दिसत नाही का ?''

''हरामखोर, उलट उत्तरं देतेस ? आपल्यापेक्षा मोठ्यांचा अपमान करतेस ?''

''पण मी तुमच्यासाठी थोडीच गातेय ?''

''तू सारखी इकडे-तिकडे गात फिरतेस आणि माझा अपमान करतेस. मला सगळं ठाऊक आहे बरं !''

मंगीकडे अर्थपूर्ण नजरेनं पाहून खेमीने म्हटले, ''बघ बाई, मी काय म्हणून यांच्यासाठी गायला लागले ? मी तर भंग्यांचा पैसा खाणाऱ्या अहमदाबादवाल्या त्या मुकादमासाठी गातेय.'' ''हरामखोर, मला सगळं ठाऊक आहे. मोठ्यांचा अपमान करतेस. आपल्यापेक्षा मोठ्यांशी आदरानं वागायचं माहीत नाही वाटतं ? वर उलट उत्तरं देतेस.''

''पण दादा...''

''बस बस. खूप झालं. तोंड आवर आता. आम्हांला आणखी खूप कामं आहेत. चल लाव यावर आंगठा आणि घेऊन जा तुझा पगार.'' परसोत्तमने जवळच्या एका चुबतऱ्यावर रजिस्टर आदळलं. अगोदर मंगीने आंगठा लावला. मग परसोत्तमने खेमीला आंगठा लावायला सांगितलं.

''अगोदर पगार द्या. मग आंगठा लावीन.'

''का ? तू तेवढी साव आणि सरकार चोर आहे वाटतं ? सरकारी कायद्याने काम होईल. अगोदर आंगठा लाव मग पगार मिळेल.''

''घ्या तर हा आंगठा'' इतकं बोलून खेमीने अगोदर परसोत्तमला आंगठ्याने

वेडावून दाखविले आणि मग रजिस्ट्ररवर आंगठ्याचा छाप उठवला. परसोत्तमने बघितलं. पण यावेळी चिडत बसायला त्याच्यापाशी वेळ नव्हता. दोघींच्या पगारातून आठ-आठ आणे कापून घेऊन उरलेले साडे-नऊ रुपये त्याने खाली फेकले. मंगीने आपले पैसे उचलले. खेमी मात्र म्हणाली, ''पुरे पैसे दिले तरच घेईन. नाहीतर घेणार नाही.''

''नसतील घ्यायचे तर नको घेऊस. मी चाललो.'' तो जाऊ लागला तशी खेमीने आपला लांब झाडू समोरच्या भिंतीला लावून त्याची वाट अडवली. ''असे कसे जाल ?''

तेवढ्यात आजूबाजूच्या विभागातले भंगीदेखील तिथे आले. खेमीपुढे आता आपली मात्रा चालणार नाही. इतकंच नव्हे तर भंग्यासमोरही नाचक्की होईल म्हणून तंटा मिटविण्यासाठी परसोत्तम म्हणाला. ''घे तुझे पैसे. ती अधेली परत दे.''

''आधी रुपाया द्या.''

परसोत्तमने रुपाया खाली फेकला. खेमीने झाडू बाजूला केला आणि खाली वाकून पैसे उचलू लागली. परसोत्तमने खाली पडलेली अधेली पुन्हा मागितली. ''जरा थांबा हो. अगोदर मोजून बघू द्या.'' दुसऱ्याच्याकडे पाहात ती पैसे मोजू लागली. परसोत्तमाने पुन्हा अधेली मागितली.

''मला नाही सापडत.'' इतके बोलून खेमी निघून गेली. परसोत्तमला खाली वाकून धुळीतून अधेली उचलावी लागली.

आज भंग्यांना खेमीच्या वागणुकीचं आश्चर्य तर वाटलंच पण तिच्याविषयी आदरही वाटू लागला. खेमीने गायला सुरुवात केली, आणि सारे भंगी गाऊ लागले–

ओरो आव्यने केशला, तारो ओशलो कुटूं
ओरो आव्यने केशला, तने पाटुए पीटूं
ओरो आव्यने केशला, तने धोकणे ढीबूं
ओरो आव्यने केशला, तारे पूंछडे लींबू

येणारे-जाणारे लोक आणि स्टेशनवरून येणारे प्रवासी ते विचित्र गाणं ऐकायला थांबत होते. तेवढ्यात एक हाक ऐकू आली, ''अग ए खेमी, इकडे ये बघू.''

खेमीचे शब्द ओठातच अडखळले. गाणं थांबलं. ती उभी राहिली. ज्या दिशेने हाक आली, तिकडे पाहिलं आणि त्याच बाजूला चालू लागली.

तिची सासू तिला बोलवायला आली होती.

(3)

धनिया आणि खेमीचे पहिले तीन दिवस अवर्णनीय आनंदात आणि खाण्यापिण्यात, मजेत गेले. चौथ्या दिवशी रात्री धनिया आणि खेमी बोलत बसले होते. खेमीने नडियाडमध्ये ती कशी राहायची, कशी गाणी गायची, कशी इतर भंग्यांशी थट्टामस्करी करायची ते सर्व धनियाला सांगितलं. ते सर्व ऐकून धनिया म्हणाला, ''खेमी, किती उलट्या काळजाची आहेस ग तू. तुझ्याखेरीज मला इथं अजिबात करमत नव्हतं आणि तू मात्र तिकडे मजेत होतीस.''

''तसं तर मलाही करमत नव्हतं रे. पण तू बोलावल्याशिवाय मी आपणहून कशी येणार ?''

''मी कसा तुला बोलावणार ? चूक माझीच होती ना ? माझी छातीच होईना. आईला सांगत होतो. पण ती म्हणायची, ''गेली तशी येईल एक-दोन दिवसांत. कुठवर अशी राहील ?'' पण तू मात्र अशी रुसून गेलीस की काही विचारायला नको.''

''तुझी चूक होती तर तू नको होतंस का मला बोलवायला ?''

''पण भद्रकालीदेवी फार जागृत आहे हं.''

''ती कशी ?''

''बघ अगोदर मी रामदेपीरला नवस बोलली. पण तू काही आली नाहीस. त्यानंतर मी हरखशादेवीला आणि झांपडीदेवीला नवस केला. तरीसुद्धा तू आली नाहीस. सरतेशेवटी मी भद्रकालीदेवीला नवस केला आणि घरात पाय ठेवताच आई म्हणाली, ''ए, धनिया तू फार सुकत चालला आहेस, तुझं दुसऱ्या एखाद्या मुलीशी लग्न लावून देते.'' मी नकार दिला. साफ सांगून टाकलं की मला दुसरं लग्न करायचं नाही. खेमी आली तर ठीक नाहीतर मला कुणीसुद्धा नको. तेव्हा कुठं माझी आई तुला बोलवायला गेली.''

''मी देखील कितीतरी नवससायास केले, तेव्हा कुठं तुझी आई मला बोलवायला आली.''

''तू कोणकोणत्या देवाला नवस बोललीस ?''

''अगोदर मी रामदेपीरला नवस बोलले. मग विचार केली की नडियाडमध्ये संतराम महाराजांना प्रसाद वाहीन. त्यानंतर महाकालीची 'जात'* बोलले.''

---

* जात - देवदर्शनार्थ यात्रा. जात बोलणे म्हणजे त्या यात्रेचा संकल्प सोडणे.

''अरेरे खेमी'' धनियावर जणू वज्राघात झाला. म्हणाला, ''हे तू चांगलं नाही केलंस. आता तुझ्या नवसाचे साठ रुपये आणि माझ्या नवसाचे पन्नास रुपये लागतील. दोन-अडीचशेचं लग्नाच्या वेळचं कर्ज अजून डोक्यावर आहेच. तो पटेल (पैसे उधार देणारा) सारखा चकरा मारीत असतो. कुठवर कर्ज फेडीत राहाणार ?''

कोणता देव नवसाला पावला त्याची खात्री नव्हती. म्हणून सर्व देवांचे नवस फेडल्याखेरीज गत्यंतर नव्हतं.

''त्यात इतकं घाबरण्यासारखं काय आहे ? चारशे रुपये तर मी हां हां म्हणता जमवून देईन. माझे दागिने विकून कर्ज फेडून टाकू.''

''आणि हो तुला सांगायचं राहिलंच की, पंचांना दंडदेखील द्यायचा आहे.''

असंख्य उच्चनीच जाती असलेल्या या आपल्या समाजात प्रत्येक जातीला आपल्यापेक्षा खालच्या जातीचं कुणी हवं असतं. अहमदाबादचे भंगी काठियावाडहून आलेल्या भंग्यांना हेय दृष्टीने बघायचे. लग्नाच्या वेळी धनियाला अहमदाबादी आणि काठियावाडी दोन्ही पंचांना जेवण घालावं लागलं होतं. खेमी निघून गेली तेव्हा धनियाला दंड ठोठावण्यासाठी काठियावाडी पंच एकत्र जमले. त्यांनी अगोदर आपसात विचारविनिमय केला. मग अहमदाबादी पंचांशी बोलणी केली. अहमदाबादी पंचदेखील त्यांना सामील झाले. तेवढ्यात खेमी परत आली. म्हणून दंड करायचा प्रश्न तर निकालात निघाला. पण इतक्या दिवसांच्या जेवण्याखाण्याचा जो खर्च झाला तो दोघा पंचांनी धनियाच्या माथी लादला होता. आपल्या समाजात सामाजिक बंधने ही नैसर्गिक घटनांसारखीच अनिवार्य आणि अप्रतिबंधक समजली जातात.

हे सर्व ऐकून खेमीदेखील घाबरली. तरीसुद्धा तिने धनियाला धीर दिला. पुरुषाला हतोत्साह होताना पाहून स्त्रीमध्ये काही एक वेगळंच धैर्य निर्माण होत असतं.

पण धनियाचं समाधान झालं नाही. हताश होऊन तो खेमीच्या मांडीवर डोके ठेवून झोपी गेला. चिंतातुर खेमीदेखील झोपी गेली. तीन दिवस सुखोपभोग घेतल्यावर दोघेही पुन्हा दुःखी संसारसागरात बुडून गेले.

दुसऱ्या दिवशी खेमीने दागिने काढून दिले आणि विकून टाकायला धनियाला सांगितलं. पण खेमीचे उपकार [illegible] धनियाच्या मानी स्वभावाला अजूनही सहन होत नव्हतं. शत्रूसमोर खाली पाहायची वेळ यावी तसं त्याला ते वाटतं होतं. म्हणून दागिने विकून टाकायच्याऐवजी त्याने ते गहाण ठेवले. विकून टाकले असते तर हाती चांगली रक्कम आली असती. गहाण ठेवल्याने पैसे पण कमी मिळाले आणि अखेरीस

व्याजापायी दागिने जायचे ते गेलेच. पण ही गोष्ट धनियाच्या वा खेमीच्या कुणाच्याच लक्षात आली नाही. दोघांनी शक्य तितके पैसे वाचवायला सुरुवात केली.

तेवढ्यात धनियाची आई वारली. तिच्या अंत्येष्टीसाठी सुमारे शंभर-एक रुपये खर्च झाले. तीन महिन्यानंतर खेमीला दिवस गेले म्हणून तिची कमाई बंद झाली. गरोदरपणामुळेच खेमी पूर्वीसारखी धनियाला दिलासा देईनाशी झाली आणि आपल्या काळज्यांचा विसर पडण्यासाठी धनियाने पुन्हा दारू प्यायला सुरुवात केली.

प्रसूतीनंतर खेमीला दिसलं की धनिया पुन्हा दारूच्या आहारी गेला आहे. ती धनियावर रागावली, ओरडली. पण आता तिच्या रागात तिरस्कार नव्हता तर दया होती. तरीदेखील एक दिवस अतिशय कठोरपणे ती धनियाला खूप बोलली. धनिया अवाक्षर बोलला नाही. पण त्या रात्री तो घरी आला नाही. खेमी त्याला रिची रोडच्या फूटपाथवरून शोधून घेऊन आली. खेमी समजावू लागली, की धनिया काही न बोलता नुसते उसासे सोडायचा. मग खेमीचं मन द्रवित होऊन जायचं. धनियाला ताळ्यावर आणण्याइतका खंबीरपणा तिच्यात उरला नव्हता.

एकदा काय झालं. हिवाळ्याची रात्र होती. कडाक्याची थंडी पडली होती. पण धनिया काही घरी नाही. दोन वर्षांच्या पोराला घरी रडत टाकून खेमी त्याला शोधायला बाहेर पडली. दोन तासांनंतर तिला धनिया नदीकाठच्या वाळूत पडलेला आढळला. खेमी त्याला कशीबशी घेऊन आली. दुसऱ्या दिवशी धनियाला न्युमोनिया झाला. खेमीने पुन्हा नवस केले. मांत्रिकाला बोलावलं, तर त्याने आणखी नवस सांगितले. पण खेमीचा धनिया काही बरा झाला नाही. खेमी विधवा झाली.

(4)

वैधव्याच्या दुःखानं खेमीचं अवघं आयुष्यच काळवंडून टाकलं. इतर सोडलं तरी धनिया नवस न फेडताच गेला या गोष्टीचं तिला मनस्वी दुःख होतं. आता धनियाच्या आत्याला काय-काय सहन करावं लागेल याचीच तिला भयंकर काळजी वाटत होती. आणि या काळजीतून मुक्त होण्याचा मार्ग तिला सुचत नव्हता.

एक दिवस खेमी रिची रोडवर झाडू लावीत होती. आता तिने गाती बांधायचं सोडून दिलं होतं. केर काढता-काढता तिला धनियाच्या नवसांची आठवण झाली. त्याच वेळी चबुतऱ्यावर बसलेला एक ब्राह्मण तिला दिसला. कपाळावर लांबरुंद त्रिपुंड्र आणि त्याच्यामध्ये टिळा लावलेला– नाकावर बारीकशी काळी रेघ. गळ्यात आणि

मनगटावर रुद्राक्षाच्या माळा. ब्राह्मणमहाराज चबुतरा स्वच्छ करून त्यावर आसन अंथरून समोर पाटी, लेखणी, हस्तरेखांची चित्रे, पंचांग आणि त्यावर खेळाचे फासे मांडीत होते. खेमी त्यांच्याकडे निघाली. ब्राह्मणाने तिला आपल्याकडे येताना पाहिलं आणि तिनं दूर राहावं म्हणून शतकानुशतकांच्या सनातन तिरस्काराने ते तिच्यावर ओरडले.

खेमी म्हणाली, ''महाराज, मला आपल्याला काही विचारायचंय.''

''तर मग चार आणे काढून खालच्या पायरीवर ठेव.'' ब्राह्मणासाठी खेमीची सावली अपवित्र होती, तिचे पैसे नव्हे. खेमीने एक चवली समोर ठेवली तशी त्यावर पाण्याचे शिंतोडे मारून ब्राह्मणाने ती उचलून घेतली आणि म्हटले, ''विचार बघू.''

''महाराज, एखादीचा पती बोललेले नवस न फेडताच वारला आणि त्याच्या बायकोने त्याचे नवस फेडले तर त्याचे पुण्य त्या माणसाला लागेल की नाही ? नीट बघून सांगा बरं.''

बोटं मोजून ब्राह्मणाने उत्तर दिलं, ''हो.''

''ठीक आहे महाराज,'' इतकं बोलून खेमी जाऊ लागली.

ब्राह्मणाने तिला पुन्हा बोलावून म्हटलं, ''पण त्या बाईने जर कुणाशी पाट लावला तर मात्र नाही हो लागायचं.''

खेमीने ब्राह्मणाला नमस्कार केला आणि निघून गेली.

आता खेमीने नवस फेडण्यासाठी पैन, पै साठवायला सुरुवात केली. खेमीचे वय उताराला लागलं होतं. पण तिचं सौंदर्य अजिबात उणं झालं नव्हतं. कित्येक भंग्यांनी तिच्याशी पाट लावायची इच्छा बोलून दाखवली. खेमीने सर्वांना एकच उत्तर दिलं, की धनियाचे नवस फेडून झाल्याखेरीज ती कुणाशीही पाट लावणार नाही. एका भंग्याने नवसाचा सर्व खर्च द्यायची तयारी दर्शविली. पण स्वतःच्याच पैशांनी नवस पुरे करायचा निश्चय खेमीने त्याला बोलून दाखविला.

सात वर्षांनी ती धनियाचे सर्व नवस पुरे करू शकली. एका भंग्याने पुन्हा तिच्याशी पाट लावायची इच्छा व्यक्त केली. खेमीने उत्तर दिलं– ''छे, छे, आता इतक्या वर्षांनंतर माझ्या आयुष्याला ठिगळ नाही लागणार.''

# बदमाश

☐ झवेरचंद मेघाणी

आगगाडी चाकांनी पहिले वर्तुळ पुरं केलं. सर्वांत अखेरच्या डब्यात रामलालने बायकोला ढकललं, तोवर चाकं आवाज करू लागली. तिघा मुलांना आणि बाडबिछान्यालादेखील त्यानं तसंच खिडकीतूनच आत फेकलं. सर्वांत अखेरीला आत टाकलेल्या पेटीला आणि कडेवरच्या मुलाला रुक्मिणी सांभाळून घेते न घेते तोच गाडी फलाटाच्या बाहेर पडलीसुद्धा.

हे दृश्य पाहिलेले जे लोक रिकाम्या प्लॅटफॉर्मवर उभे होते त्यांनी खोचून बोलून रामलालवर तोंडसुख घ्यायला सुरुवात केली– ''सर्वजण साहेबांचे बच्चे झाले आहेत. पंक्चुअल टाइमावरच येतात.''

''शिवाय बायकोची देखरेख कुणावर सोपवताहेत याचंही भान राहात नाही.''

हे ऐकून रामलाल चपापला. डब्यात कोण होतं ? बायकामुलांवर लक्ष ठेवायला त्यानं कुणाला सांगितलं होतं ? स्मरणशक्तीला खूप ताण दिल्यावर रामलालच्या नाकांना देशी विडीच्या धुरांचा दुर्गंध जाणवला. कानांवर कर्कश स्वरात बोललेली आठदहा अश्लील वाक्ये आदळली. डोळ्यांसमोर एकही चेहरा स्पष्टपणे आला नाही. पण ज्या अस्पष्ट आकृत्या डोळ्यांसमोर तरळल्या त्यांतील काळी टोपी, काळी दाढी, काळी लुंगी इत्यादींची दाट काजळी त्याच्या मनावर चिंतेचं सावट धरू लागली फाटकातून बाहेर पडताना एका ओळखीच्या माणसाने रामलालला विचारले, ''पोराबाळांबरोबर कोण होतं रामलालभाई ?''

''सोबतीला कुणी मिळालंच नाही.''

''तर मग त्यांचं लक्ष ठेवायला तुम्ही कुणाला सांगत होता ?''

''मी तसं म्हटलं खरं पण कुणाला म्हटलं ते आठवत नाही.''

''इतकी घाई करायला नको होती. पोरांना उद्या पाठवायचं होतं.''

''आता पश्चात्ताप होतोय.''

''का कुणास ठाऊक. आगगाडी पाहिली की आपल्या लोकांना भानच राहात

नाही. आपण भुर्राट* होऊन जातो.''

काठियावाडी बोलीतला, गोफणीतून सुटल्यासारखं वाटणारा हा 'भुर्राट'' शब्द रामलालची छाती वेधून गेला. रामलालच्या वागणुकीचं हुबेहुब चित्रच त्या शब्दानं रेखाटून टाकलं. लाल ओढणी बघून जसा बैल बुजतो, उंट बघून जशी म्हैस बिथरते, मिल-मालकांना बघून मजूर पुढारी जसे हल्ली भडकतात तसाच रामलाल गार्डच्या डब्याचा कंदील हलताना पाहून बावचळून गेला होता. इतका वेडावून गेला होता, की बायकापोरांना सजीव नातेवाइकांच्या ऐवजी तो निर्जीव गाठोडीच समजला होता. अरे देवा ! निर्जीव गाठोड्यांनादेखील माणूस एखादा ओळखीचा, विश्वासू माणूस बघून त्याच्या हवाली करतो. एकदा रामलालला आपल्या गावी कच्च्या हापूस आंब्याची एक पेटी पाठवायची होती. आपल्या नातेवाईकावर त्याचा विश्वास नव्हता. कारण त्याला शंका वाटत होती, की तो वाटेत एखादा आंबा चोरून खाईल. त्या वेळी त्याने इतकी काळजी घेतली होती आणि आज हे काय करून बसला ?

एका माणसाने जवळ येऊन रामलालच्या कानात काहीतरी सांगितले. सांगताना तो इतका सावधपणे चहूकडे बघत होता, जणू स्टेशनच्या भिंतीतून नाहीतर जमिनीतून अचानक एखादा सुरेबाज तर बाहेर येणार नाही ना ?

त्या माणसाने जे सांगितलं ते असं होतं–

''शेठ त्या डब्यात अहमदाबादच्या गुंडांचा म्होरक्या अल्लारक्खा आणि त्याचे आठदहा दारुडे खुनी बसले होते. मी तिथंच उभा होतो. त्यांच्याबरोबर एक वेश्यादेखील होती. सर्वजण मिळून त्या वेश्येची थट्टामस्करी करीत होते. तिला सारखी त्या अल्लारक्खावर ढकलीत होते. मी माझ्या डोळ्यांनी हे सारं बघितलं आहे. तीस माणसांचा डबा होता. पण त्या दहाजणांखेरीज अकरावा माणूस काही त्या डब्यात नव्हता. त्यांचे भयंकर चेहरे बघूनच लोक पुढच्या डब्यात जाऊन बसत होते. शेठ, तुम्ही जाणूनबुजून तुमच्या बायकापोरांना त्या लांडग्याच्या तावडीत काहो टाकलं ?''

रामलालचं रक्त गोठून गेलं. त्या माणसानं पुन्हा एकदा चहूकडे नजर टाकली आणि तोंडासमोर हात धरून हलक्या आवाजात आपलं बोलणं पुरं केलं. शेठ आठदहा दिवसांनी अल्लारक्खा इथं फेरी मारतो. तो आल्यापासून आगगाडीच्या डब्यातून पाच खून पडले आहेत आणि शहरात निदान सात वेळा तरी लुटमार झाली आहे. अल्लारक्खाची गुंडगिरी सर्वांना चांगलीच ठाऊक आहे. तुम्ही म्हणाल हे पोलिसांना ठाऊक नाही का ? मी म्हणतो, त्यांना ठाऊक आहे. अगदी चांगलं ठाऊक

* भुर्राट होणे– वेडावून जाणे.

आहे. पण अल्लारक्खाने पोलिसांना आपल्या बाजूला वळवून घेतलं आहे. आता बोला साहेब, काय म्हणणं आहे तुमचं ? तो तर साऱ्या गुजरातला आपल्या बापजाद्यांची इस्टेट समजतो. राहिलं सरकारी कारभाराचं. त्याचं काय सांगावं ! त्याचा तर, 'मांग देतो धक्का, देव गेले पर्वतावर, आणि पीर गेले मक्केला' असा खाक्या असतो. जातपात सर्व भ्रष्ट झाली. गांधींनी सारं धुळीला मिळवलं. अशानं काय डोंबलाचं स्वराज्य मिळणार आहे ? इंग्रजांच्या राज्याचाच प्रताप समजा–''

असा तत्त्वज्ञानाचा बराचसा डोस देऊन मनातली मळमळ ओकून टाकायला तो माणूस अधीर होता. पण त्याने जेव्हा पाहिलं, की रामलालचं त्याच्या बोलण्याकडे लक्ष नसून तो दुसऱ्याच कसल्यातरी विचारात दंग आहे तेव्हा तो मुकाट्याने तिथून निघून गेला आणि थोडं दूर जाऊन दुसऱ्या एका माणसाशी बोलू लागला. दोघं हसू लागले. ते दोघे रामलालकडे हात दाखवून अशा काही खुणा करीत होते, की रामलाल किती मूर्ख आहे हेच ते सांगत असल्याचे दुरून बघणाऱ्यांच्याही चटकन लक्षात यावे.

रामलालला तार करायला जायचं होतं. तारेचं ऑफिस समोरच होतं. त्यावर निऑन प्रकाशात लिहिलेलं, 'तार घर' इतकं चकाकत होतं की, आंधळ्यालासुद्धा ते वाचता यावं. पण रामलाल इतका हतबुद्ध झाला होता, की जवळून जाणाऱ्या एका माणसाला त्याला विचारावं लागलं.

तारेचा कागद घेऊन तो त्यावर मजकूर लिहू लागला. गाडी या वेळी कुठवर पोचली असेल याचीदेखील त्याने चौकशी करून टाकली. तिथल्या स्टेशन-मास्तरसाठी त्याने निरोप लिहिला. अगदी कमीत कमी शब्दांत मजकूर लिहून त्याने हिशेब लावला की नऊ आण्यात काम भागेल. स्वतःच्या हुशारीबद्दल मनातल्या मनात त्याने आपलीच पाठ थोपटून घेतली आणि तारेचा फॉर्म खिडकीत ठेवून एक रुपया आत सरकवला.

''दोन रुपये आणखी'' तार मास्तराने डोकं थोडं वर करून म्हटलं आणि तो काहीतरी लिहू लागला.

''कशाचे ?'' रामलालने जरा गरम होऊन विचारलं, ''अडाणी समजून.''

''एक्सेस चार्ज'' तार-मास्तरने उत्तर दिले.

''का म्हणून ?''

''लेट फी. प्लस सनडे.''

झोपेतून कुणी गदागदा हलवून जागं केल्यासारखं रामलालला वाटलं. तीन रुपये ? खाजगी तारेसाठी तीन रुपये खर्च करणे या जन्मी तरी त्याला शक्य नव्हते. तीन

रुपये खर्च करण्याइतकं संकट खरोखरच आलं आहे का ? माझी बायको काय अक्कलहुशारीने डबा बदलून घ्यायची नाही ? माझ्याबरोबर इतकी वर्षं राहून तिच्या बुद्धीचा इतकासुद्धा विकास झाला नसेल का ? कुणास ठाऊक ! बाईमाणूस आहे. बायकांची अक्कल असते चुलीपुरती. चूक करून बसायची. पण तशीच काही वेळ आली तर तिला साखळी नाही का ओढता यायची ? साखळी तिच्या बसायच्या जागेजवळच तर असेल. पण साखळी बिघडलेली असली तर ? अरे देवा ! या पावसाळ्याच्या दिवसांत साखळी जाम झालेली असली तर ? साखळी नीट ठेवण्याकडे हे रेल्वेवाले लोक कसले लक्ष देताहेत ? पण माझ्या बायकोला किंचाळता नाही का यायचं ? पोरं नाही का ओरडायची ? पण समजा त्या डाकू अल्लारक्खाने तिचे तोंडच दाबून धरलं तर–

रामलालच्या या विचार-शृंखलेला तार-मास्तरने खिडकीतून तारेचा फॉर्म व रुपया बाहेर सरकावून तोडले. वरून लेकाचा म्हणतो कसा– 'शेठजी, नीट विचार करून सकाळी या, तोवर सोमवारही उजाडेल.''

रामलालला स्वतःचीच लाज वाटू लागली. कल्पनेत त्याला दिसलं, की त्याच्या बायकोवर रानातल्या अंधारात असा काही अत्याचार होतोय की तिच्या तोंडून किंकाळीच फुटत नाहीय. आणि त्याचा धाकटा मुलगा तर केव्हाच तडफडून मरण पावला आहे.

''हे देवा ! त्रिभुवन स्वामी–'' एका दीर्घ निश्वासासरशी त्याच्या तोंडून प्रार्थना बाहेर पडली. तारेचा कागद त्याने पुन्हा खिडकीत सरकावला आणि पाच रुपयांची नोट फेकली.

''रिप्लाय प्री-पेड ?'' तार-मास्तरने आपल्या भाषेत संक्षिप्त प्रश्न विचारला. प्रत्येक माणसाला आपल्याच व्यवसायाची भाषा अधिक महत्त्वपूर्ण वाटते आणि बाकीच्या सर्वांना त्याची भाषा समजत असल्याचे तो गृहीत धरूनच चालतो.

''अं काय ?... ते–नको–हो, हो, रिप्लाय मागवून घ्या.'' रामलाल कसाबसा म्हणाला.

रामलालच्या हृदयात जणू एक चाळण बसवलेली होती. ही चाळण होती चातुर्याची आणि व्यावहारिकतेची. प्रत्येक विचार या चाळणीतून चाळूनच तो अमलात आणायचा.

तार-मास्तरने आठ आणे आपल्या खिशात टाकून काही पैसे परत दिले. त्यानंतर अनेक विधी केल्यावर अखेरीस जेव्हा रामलालचा निरोप यंत्रावर कडकट होऊ

लागला तेव्हा कुठं रामलालला हायसं वाटलं. प्रत्येक कडकटमधून त्याच्या कल्पनेच्या कानांना पोलिसांच्या पावलांची चाहूल ऐकू येऊ लागली, हातकड्यांचा खणकार कानांत घुमू लागला, बदमाश अल्लारक्खाच्या हातांत घातलेल्या बेड्यांमध्ये फिरवल्या जाणाऱ्या चावीचा आवाज ऐकू येऊ लागला.

तारवाल्याने उत्तराचा कागद पाकिटात घालून रामलालच्या हाती दिला, तेव्हा क्षणभर रामलालला मणाचं ओझं उरावरून दूर झाल्यासारखं वाटलं. त्याचा जीव भांड्यात पडला. पाकिट फोडून त्याने कागद वाचला. त्यावर इतकंच लिहिलेलं होतं–

"गाडी पाच मिनिटांपूर्वीच इथून निघून गेली आहे."

आणखी पैसे खर्च करायची हिंमत रामलालमध्ये नव्हती. म्हणून त्याने ईश्वराच्या चरणी धाव घेतली. तो जुन्या जमान्याचा माणूस असता तर अशा प्रसंगी कुलदेवतेला एखादा नवस बोलला असता आणि जर आधुनिक काळातला असता तर स्वतःच्या पुरुषार्थाचा दृढ विश्वास बाळगला असता. पण मधल्या स्थितीचा असल्याकारणाने घरी जाऊन त्याने बिछान्यात अंग टाकले. त्याच्या चारीबाजूंना तऱ्हेतऱ्हेच्या भयंकर आकृत्या वेडेवाकडे हातवारे करू लागल्या.

झोप येत नव्हती. पण मस्तक जणू दमूनभागून प्रेतवत झालं होतं. ज्ञानतंतू उत्तेजित झाले होते आणि अशाच एका भयानक कथेनं रामलालला घाम फुटला. ती धड स्मृती नव्हती की धड स्वप्नही नव्हती. उलट या दोहोंच्या संमिश्रणाने बनलेली विक्षिप्त गोष्ट होती.

ज्या माणसाला त्यानं बायकापोराचं लक्ष ठेवायला बजावलं त्याला पूर्वी कुठंतरी पाहिल्यासारखं त्याला वाटू लागलं.

कुठं बरं पाहिलं आहे ?

हो. हो. आठवलं. आगगाडीतच एकदा पाहिलं होतं. त्या रात्री तो अचानक आमच्या छोट्याश्या डब्यात चढला होता. त्याचा चेहेरा उग्र होता. तरीदेखील त्याने हात जोडून मला विनंती केली होती– "दादा, थोडा वेळ मला लपवून घ्या. माझ्यापाशी अफूचे चार गोळे असल्याचं कबूल करतो. पोलीस माझ्या मागावर आहेत."

त्या काळ्या माणसाच्या विनंतीला मी उत्तर दिलं होतं– छे, छे, बदमाश कुठला ! इथं नाही. चालता हो इथून."

मग तो माझ्या बायकोला रुक्मिणीला काकुळतीने म्हणाला होता, "तू माझी माय आहेस. मला लपव." बायकोनं म्हटलं होतं– "बस." मी बायकोला रागावला होतो,

आणि "पोलीस, पोलीस" म्हणून हाका मारल्या होत्या. पोलिसांनी येऊन त्याला पकडलं होतं. न्यायालयात मला शाबासकी मिळाली होती आणि त्या बदमाशाला तीन वर्षांची कैद झाली होती. त्या वेळी त्याने माझ्याकडे बघून शपथ घेतली होती, "रामलाल, सुटल्यावर बघून घेईन तुला."

तोच तो. तोच माणूस आहे तो. तो माझ्या बायकोपाशी विचारपूस करतोय– सूड घेतोय– बायकोचं रक्त पितोय– हाय ! ओय !

आपल्याच हाय, ओयच्या आवाजानं रामलाल जागा झाला.

दिवस अखेर उजाडणार होताच. तो उजाडला. दहाच्या सुमारास रामलालला त्याच्या मेहुण्याची सर्वजण सुखरुप पोचल्याची तार मिळाली. तिसऱ्या दिवशी बायकोचं लांबलचक पत्र आलेलं पाहून रामलाल आश्चर्यचकित झाला. यापूर्वी रुक्मिणीनं आपण पोचल्याचं पत्र इतक्या लवकर कधीच पाठविलं नव्हतं.

पत्र एका कमी शिकलेल्या साध्यासुध्या बाईच्या भाषेत होतं. पत्राच्या सुरुवातीला 'प्रिय', 'प्रियतम' किंवा 'प्राणप्रिय स्वामीनाथ' इत्यादी काहीसुद्धा नव्हतं. व्यापारी शैलीत सरळ मुद्द्यालाच हात घातलेला होता. म्हणून ते पत्र इंजिनमुळे सुशोभित दिसणाऱ्या जुन्या आगगाडीसारखं न वाटता इंजिनखेरीज असलेल्या इलेक्ट्रिक ट्रेनसारखं ओकंबोकं आणि बेडौल वाटत होतं. ते पत्र असं होतं (यात विरामचिन्हं फक्त आम्ही घातली आहेत.)

"तुमचं डोकं ताळ्यावर असतं का ? मी किती सांगितलं होतं की पाण्याची सुरई घेऊन द्या म्हणून. पितळेची नाही तर निदान मातीची तरी. पण तुम्ही ऐकलं असेल तर शपथ. नुसतं सांगत बसलात की "प्रत्येक स्टेशनवर पाणी मिळतं. तेव्हा तांब्या पुरे आहे. त्याने काम भागेल." ठीक आहे चला, तुम्ही तुमचंच म्हणणं खरं केलंत. वाटेत पाण्याचा इतका त्रास झाला की सांगता सोय नाही. लहानलहान पोरं, रडू लागली. खायचं-प्यायचं सामान बरोबर होतं ते सारं देऊन झालं. पण पोरं पाणी-पाणी करू लागली. तेव्हा एका भल्या माणसानं पाणी आणून दिलं. मुलं पाण्यासाठी ओरडू लागली की भाऊ झटकन धावत जाऊन पाणी आणून द्यायचा. मला तर तो काही म्हणाला नाही. पण आपल्या बरोबरीच्या लोकांना तो सांगत होता, "हिच्या धन्यानं आम्हाला सांगितलं आहे की हिचं लक्ष ठेवा."

कमीत कमी पन्नास वेळा तरी त्याने हीच गोष्ट पुनः पुन्हा उच्चारली असेल. "हिच्या धन्यानं सांगितलं आहे की हिचं लक्ष ठेवा." सांगताना तो खूष होता.

आता विस्तारानं सारं लिहिते. गाडी सुरू झाल्याबरोबर त्याने त्या बाईला––सांगताना मला लाज वाटते– आपल्या मांडीवरून दूर सारलं आणि दुसरीकडे जाऊन बसायला सांगितलं. बरोबरीच्या सर्व लोकांना हुकूम सोडला की, "हे खिदळणं बंद करा आणि बिडीचा धूर इकडच्या बाजुला येऊ देऊ नका. कारण हिच्या धन्यानं आम्हाला सांगितलं आहे हिचं लक्ष ठेवा."

त्यानंतर थोड्या वेळात सर्वजण हळूहळू गप्पा मारत झोपी गेले. पण तो भाऊ म्हणाला, "मी नाही झोपणार. हिच्या धन्यानं आम्हाला सांगितलं आहे की हिचं लक्ष ठेवा."

तो बसूनच राहिला. माझी छाती धडधडू लागली. वाटू लागलं की काहीतरी काळंबेरं आहे. कसली तरी गडबड आहे. हा का जागत बसला आहे कुणास ठाऊक ? आणि मला मात्र तो सांगतोय की, 'माई, तुम्ही झोपा.' पण मी कशी झोपणार ? आडवी होऊन उगाच डोळे मिटून घेतले. मग बबलीनं रडायला सुरुवात केली. सारखा रडायला लागला. त्याचं रडं थांबेनाच. धाकट्याने पण सूर लावला. तो भाऊ उठला आणि मला म्हणाला, "माई, एखादं कापड दे." मला वाटलं हा आता मला लुटणार. मी हात जोडून रडत-रडत त्याला म्हटलं, "दादा, वाटल्यास सारं घे. पण मला आणि माझ्या मुलांना सोडून दे." आणि मी सारं सामानसुमान काढायला सुरुवात केली. मी त्याच्याकडे पाहिलं तर तो हसत उभा होता. पाळण्याची झोळी त्याला बोचक्यात दिसली तशी त्यानं स्वतःच ती ओढून घेतली. दोरी त्याच्यापाशी होतीच. डब्यातल्या वरच्या सीटांमध्ये दोरी बांधून त्याने पाळणा लटकावून दिला आणि बबलीला त्यात निजवून टाकलं. मग दूर बसल्या-बसल्या तो पाळण्याला झोके देऊ लागला आणि आपल्या पठाणी भाषेत कोणकोणती कुणास ठाऊक अंगाईगीतं गाऊ लागला. मी माझ्या मनात म्हटलं, "बघ तर खरं. कसा तालासुरात गातोय. हसू आणि आसू ! हा सात हातांचा दाढीमिशावाला राक्षसासारखा दिसणारा माणूस बायकांसारखा आवाज काढून कसा काय गातोय कुणास ठाऊक ?" आणि गाता-गाता तो चक्क रडू लागला. त्याच्या डोळ्यांतून झरझर अश्रू वाहू लागले. मनसोक्त रडून घेतल्यावर तो स्वतःशीच पुटपुटला, "बायकापोरं कुठं ! तू कुठं ! मी कुठं !"

आणि त्या बबलीला तर बघा, रोज मी तिला मारून मुटकून झोपवते. पण तिथं मात्र एका झोक्यातच झोपली. आणि हो तुम्ही कधी माझ्या बबलीला झोपवलंय ?

अंगाईगीतांचा शब्द तरी कधी तोंडून काढला आहे ? मी कितीही खुशामत केली. तरी हे माझं काम नाही, मी बाप्या आहे म्हणून तुम्ही-नेहमी टाळत आलात. पण कधी बघितले नसतील तर आता बघून घ्या, असेही पुरुष असतात.

जाऊ दे. हे सर्व करता-करता रात्रीचे तीन वाजले असतील. गाडी एका जंक्शनवर थांबली. आमच्या डब्याच्या समोर खाकी पोशाख घातलेली सुमारे वीसेक माणसं येऊन उभी राहिली. बरोबर सामानांचा हा भलामोठा ढीग होता. आधी ज्या बाजुला तो भाऊ बसला होता त्या बाजूला ते लोक गेले. मग घाईघाईने परत येऊन म्हणाले "बाई, हा डबा तुम्हाला रिकामा करावा लागेल."

मी विचारलं, "का ?"

ते म्हणाले, "तुम्हाला ठाऊक नाही ? लोकसेवकाची स्वारी जाणार आहे."

मला काही समजेना. मी पुन्हा विचारलं, "तुम्ही सरकारी माणसं आहात ?"

ते सर्व हसू लागले. म्हणाले, "हो हो. आजच्या सरकारचे नाही. पण उद्याच्या सरकारचे नक्कीच आहोत. चला उतरा. तुम्हाला शेजारच्या डब्यात बसवून देतो."

मी दीनपणे म्हटले, "दादा, माझी लहान-लहान मुलं झोपली आहेत. आणि माझ्याबरोबर सामानदेखील खूप आहे."

यावर त्यांच्यातलाच एकजण उद्धटपणे म्हणतो कसा, "बाई, तुम्हाला काही वाटतं का ? दुसऱ्या बायका लोकसेवकाच्या चरणी कायकाय वाहातात, अगदी हिऱ्यामोत्यांचे हारसुद्धा वाहतात आणि तुमच्यानं फक्त एक डबा रिकामा करवत नाही ? लोकसेवकाने तिसऱ्या वर्गाच्या डब्यातूनच प्रवास करायचं व्रत घेतल्याचंही तुम्हाला ठाऊक नाही वाटतं ? तुम्हाला ती "श्रेष्ठ भिक्षा" गोष्ट माहीत आहे ना ?"

मला काहीसुद्धा समजलं नाही. माझ्या तोंडून बाहेर पडलं, "मरो तुमचा तो लोकसेवक. माझ्या जिवाला उगाच ताप लावलाय ?"

माझ्या तोंडून हे शब्द अगदी सहज बाहेर पडले. पण त्या लोकांच्या कानावर हे पडताच त्यांना राग आला. त्यांच्यातला एकजण ओरडला, "उतरशील नाही तर काय करशील ?" आणि तो डब्यात घुसला. माझ्याजवळून वर चढून माझं सामान बाहेर फेकण्यासाठी उचलू लागला. मी दादापुता करीतच राहिले. इतक्यात दुसऱ्या बाजूला बसलेला तो भाऊ उठला आणि त्याने वर चढलेल्या त्या खाकी पोशाखवाल्याची मानगूट पकडली. घट्ट पकडली आणि इतकंच म्हणाला, "हिच्या धन्यानं आम्हाला हिचं लक्ष ठेवायला सांगितलं आहे, समजलं ?"

हे सर्व बघून बाहेर उभ्या असलेल्या लोकांचे डोळे विस्फारित झाले. ज्याची मानगूट

त्या भाऊने पकडली होती त्याची स्थिती तर जणू गारुड्याच्या तावडीत सापडलेल्या चंदनगोह* सारखी झाली होती. तो अतिशय गयावया करीत होता. झालं. मग आमच्या डब्यात चढायची कुणाची हिंमत होती ? आणि तो जो मला उतरायला सांगत होता आणि लोकसेवक लोकसेवक करत होता, लगेच म्हणू लागला, "चला बाबांनो दुसऱ्या डब्यात चला. राष्ट्रीय एकता भंग करणे ठीक नव्हे. आपलं काय ? आपण कुठंही हातपाय आखडून बसून घेऊ. पठाणलोक तर आपले सच्चे भाई आहेत."

मग कुणाचा तरी जयजयकार करून आणि 'अल्ला हो अकबर'ची घोषणा करून ते सर्व निघून गेले.

तो भाऊ एकटा राहिला तेव्हा स्वतःशीच म्हणाला, "आम्हाला सांगितलं, 'हिचं लक्ष ठेवा.' आँ ? आम्हाला सांगितलं ? आम्हाला ? शाबास ! आम्हाला सांगितलं की 'हिचं लक्ष ठेवा.' शाबास !" असं बडबडत तो कधी आपली छाती तर कधी आपली पाठ थोपटत होता. त्याला इतका आनंद झाला होता जणू वेडच लागलं होतं.

सकाळी मी गाडीतून उतरले. त्याने बबलीला, जयंतियाला आणि टपुआला कडेवर घेऊन छातीशी कवटाळून कुरवाळलं. मग डोक्याला हात लावून म्हणाला, "सलाम मालेकुम."

मी म्हटलं, "दादा, आज तुम्ही माझी अब्रू वाचवलीत. कधी मुंबईला आलात तर आमच्या घरी नक्की या. आमचं घर अमुक-तमुक गल्लीत आहे. आणि जयंतियाच्या बाबांच्या नावाचं पहिलं अक्षर 'र' आहे." मग मी स्टेशनवर मला घ्यायला आलेल्या माझ्या भावाला म्हटलं, "भाऊ, यांना तुझ्या मेहुण्याचं संपूर्ण नाव सांग बघू." भावानं सांगितलं, "रामलाल चुनीलाल माहेश्वरी." ऐकताच तो माणूस दचकला. थोडा वेळ तो 'आ' वासून नुसता बघतच राहिला. मग हसला.

भावाने आमचा पत्ता एका कागदावर लिहिला आणि तो कागद त्याला देऊ केला. पण त्याने हसून तो कागद घ्यायला नकार दिला आणि वर आकाशाकडे बोट दाखवले. इति.

लिहिणारी– रुक्मिणी.

पत्र वाचताच रामलालने उलटटपाली एक पत्र पाठवून बायकोला आणि मेहुण्याला विचारलं, "माझा पत्ता लिहिलेला कागद तुम्ही त्याला दिला नाही याची खात्री आहे ना ? तो कागद दिला नसल्यास फाडून टाकावा. आणि दिला असला तर देवाशपथ

---

* चंदनगोह– एक प्रकारची लहान गोम, घोण.

मला खरं काय ते सांगा म्हणजे मला आपल्या घरावर पोलिसबंदोबस्त ठेवायची व्यवस्था करता येईल."

उत्तरादाखल मेहुण्याने त्याच्या नोटबुकात चुकून राहिलेला तो कागदाचा कपटा पाठवून दिला.

पण रामलाल एवढ्याने निश्चिंत होणाऱ्यापैकी नव्हता. त्याने पोलिसांना या सर्व घटनेची माहिती दिली. पोलिसांनीदेखील प्रकरण गंभीर आहे म्हणून रामलालच्याच खर्चाने त्याच्या घरावर एक खास पहारेकरी तैनात करून टाकला.

रुक्मिणी माहेराहून परत आली तशी आल्या-आल्याच रामलालने तिला दोष दिला, "त्या बदमाशाला आपल्या घराचा पत्ता द्यायची अक्कल तुला कुणी शिकवली होती ?"

रुक्मिणीचे अश्रुभरले नेत्र जणू अल्लारक्खादादाच्या काल्पनिक मूर्तीवर आसवांचा अभिषेक करीत होते.

# आईच्या मांडीवर

□ सुन्दरम्

नदीकाठी उंच दरडीवर बसलेल्या एका गावच्या मागच्या बाजूने तिघेजण बाहेर पडले– दोन पुरुष आणि एक स्त्री. पुरुष जरा पुढे चालत होते.

स्त्रीला निरोप देताना आळीतल्या बायका म्हणत होत्या, "बरंय् शबू– लवकर परत ये हो– सांभाळून जा– आपल्या तब्येतीकडे लक्ष ठेव–"

शबूचा पती आणि सासरा तिला बोलवायला आले होते. ती त्यांच्याबरोबर सासरी निघाली होती. माहेरचा निरोप घेताना तिचे पाऊल जणू पुढे पडत नव्हते. माहेरच्या बायका, आळीतले लोक आणि मैत्रिणींचा निरोप घेता-घेता ती जरा मागे राहिली होती. पती आणि सासरे रस्त्याच्या वळणावर पोचून दृष्टिआड झाले होते. त्यांना गाठण्यासाठी ती झपझप पावलं टाकू लागली.

शबूची एक मैत्रीण वळणापर्यंत तिच्याबरोबर आली होती. आणि वळणापाशी तिचा निरोप घेऊन जाणाऱ्या शबूला पाहात हात हलवीत उभी होती. थोड्याच वेळात तिच्या तोंडून एक अस्फुटशी किंकाळी बाहेर पडली, "अग आई ग !"

आळीतल्या लोकांनी चमकून विचारलं, "काय झालं ? झालं तरी काय ?"

"मांजर शबूला आडवं गेलं."

पण आता शबूला परत बोलावणं शक्य नव्हतं. तिला थोडा वेळ थांबायला सांगणंही शक्य नव्हतं. "अंबाबाई सर्वांचं भलं करील," इतकं बोलून सर्वजण आपापल्या कामाला लागले.

शबू झरझर चालू लागली. गावच्या मागच्या बाजूनेच रस्ता एका घाटात उतरत होता. बापलेक खाली उभे होते आणि चिलीम ओढीत होते. त्याचा धूर त्यांच्या तोंडातून बाहेर पडताना दिसत होता. त्यांना बघून शबू सावकाश चालू लागली.

दुपार झाली होती. कुरणाच्या वरच्या बाजूने नदीचे पाणी खळाळत वाहाताना दिसत होते. नदीला आलेला पूर या दिवसांत ओसरू लागला होता. आणि पाणी उतरल्याने काठावरचा चिखल दिसू लागला होता. चिखल आरशासारखा चकाकत होता. कुणातरी माणसाच्या पावलांच्या खुणा त्यामध्ये भेगा पाडीत गेल्या होत्या,

शबूने डोळ्यांपुढे हाताची सावली धरून पाहिलं. उन्हाने दिपलेल्या डोळ्यांनी ती पलीकडच्या गावाची गहिरी हिरवी सीमा बघू लागली.

सासर ! तिला थोडं कापरं भरलं. तिने डोळ्यांची उघडझाप केली. मग खाली उभ्या असलेल्या सासऱ्यांकडे लक्ष जाताच तिने फुलाफुलांच्या चुंदडीवर घुंघट चेहऱ्यावर ओढला. तिची नजर खाली झुकून पायांपाशी घोटाळू लागली. रस्त्याच्या काठाकाठाने कुंपण लावलेलं होतं. कुंपणात कंथारी, बोरडी, अनुरीची रानटी काटेरी झुडुपं लावलेली होती. अनुरी अजून कच्ची होती. कंथारवर लालसर काळी फळं लागली होती. शबूने मनाशी विचार केला– ''घरी गेल्यावर पिकतील.'' आणि अनुरी तोडण्यासाठी तिने हात पुढे केला. त्याच वेळी खालून तिच्या नवऱ्याची हाक ऐकू आली, ''अग ए चल ना.''

ती दचकली. कंथारीचा काटा तिच्या कोपराला लागला. तिने हळूच हात मागे घेतला.

थोडे पुढं गेल्यावर तिला गुंजेच्या शेंगा मंद-मंद हसत असल्यासारख्या दिसल्या.

''ओरडले तर ओरडू देत. गुंजा घेतल्याखेरीज मी काही जायची नाही.'' इतकं बोलून तिनं कुंपणाच्या झाडीला हात घातला. गुंजा आपल्या नैसर्गिक आवरणात शिंपल्यातल्या मोत्यांसारख्या सजल्या होत्या. दोन-तिन शेंगा तोडून तिने आपल्या चुंदडीत बांधून घेतल्या. खालून पुन्हा हाकारा ऐकू आला.

''हे काय येतेय की ! उगाच कशाला वरडताय.'' तिने उत्तर दिलं आणि भराभरा चालू लागली. पायात घातलेल्या वहाणा धूळ उडवू लागल्या. पायातले जड भरीव वाळे क्षीणस्वरात झणकारू लागले. नव्या कोऱ्या घेरदार घागऱ्याचा आणि चुंदडीचा फरफर आवाज होऊ लागला. चुंदडीचा पदर सावरायला म्हणून तिने हात वर केला तर हस्तिदंती चुडे काचेच्या बांगड्यांसह किणकिणले. चोळीच्या रेशमीवस्त्राची सळसळ झाली आणि चोळीच्या बाहीची किनार उन्हात लकाकली. तिचे काजळाने नटलेले काळेभोर डोळे इकडे-तिकडे बघू लागले. ती थांबली.

वाटेत शेणाचा एक पोह पडलेला होता. खूप मोठा, धान्याचा ढिगासारखा. मनातल्या मनात शबू म्हणाली, ''कुणाच्या तरी एकट्याच चरणाऱ्या म्हशीने केलेला दिसतो. नाहीतर माझ्या सवतींनी हा झाकल्याखेरीज सोडला असता होय '' शेण उचलून घरी टाकून यावंसं तिला वाटलं. या वाटेवरून तिने किती शेण गोळा केलं असेल त्याला गणतीच नाही. आजदेखील तो पोह झाकल्याखेरीज तिला राहवलं नाही. वहाणा घातलेल्या पायानंच तिनं तो पोह थोडा थापल्यासारखा केला आणि त्यावर

धूळ पसरून दिली. अशातऱ्हेनं झाकलेला तिचा पोह कुणी घेऊन जाणार नाही याची तिला खात्री होती. थोडं दूर गेल्यावर तिला वाटलं, तिनं-उगाचच तो पोह झाकला. त्यापेक्षा तो दुसऱ्या कुणाच्या तरी कामी आला असता.

खालून पुन्हा हाक ऐकू आली. तिनं आपली चालण्याची गती वाढवली आणि घाटातून खाली जाणाऱ्या रस्त्यावरून धूळ उडवीत ती चालू लागली. तिच्या पायांनी उडवलेली धूळ वर हवेत उडून अशी तरंगू लागली. जणू ती म्हणत होती की, "शबू गेली, शबू गेली."

घाट उतरल्यावर रस्ता सपाट होतो. नदीकडून येणारा ओलसरपणा धूळ उडू देत नाही. डोक्यावर बांधलेल्या फेट्याचा शेमला जरा पुढे ओढून त्याचा छत्रीसारखा उपयोग करीत पितापुत्र दोघे चालले होते. शबूच्या वहाणा कर्रकर्र आवाज करीत होत्या. शबूने आजूबाजूला दृष्टी टाकली. दोहोबाजूंना लहानमोठ्या दरडी होत्या. खडकावर अधूनमधून एखादी बकरी चरताना दिसत होती. उंच खडकांमधून निघून दुसरा एखादा घाट समोर यायचा आणि हिरव्यागार गवतातली एखादी वेडीवाकडी पाऊवाट दूरवर जाताजात नजरेसमोरून अदृश्य व्हायची. या उंच कातळांवर शबूने कितीदातरी आपली ढोरं चरायला आणली होती. ती मनातल्या मनात म्हणाली, 'एखाद्या झाडाच्या सावलीत बसून झुडुपांमधून वेचलेली बोरं खाण्यात काय मजा यायची. सासरी जावं लागलं नसतं तर किती छान झालं असतं. घागरा-चोळी नेसून अख्ख्या दिवसभर भटकले असते."

अचानक शबूला आपल्या नव्या कपड्यांचं आणि चांदीच्या भारी दागिन्यांचं ओझं वाटू लागलं. "जरा हळू चाला ना." तिने म्हटलं. पितापुत्र न ऐकल्यासारखं करून पुढे चालत राहिले.

एक-दोन शेतांइतकी ती गाळाची जमीन ओलांडल्यावर नदीचा पाट लागला. अचानक रेती आल्याने शबूची चाल मंदावली. तिने चेहऱ्यावरचा घुंघट जरा वर केला. नदीवरून येणारा गार वारा तिच्या चेहऱ्यावरचा घाम सुकवू लागला. चेहऱ्यावर प्रसन्नता विलसली. शबू हसू लागली आणि तिच्या नाकातल्या चमकीत बसवलेल्या खड्यात सूर्य आपलं प्रतिबिंब न्याहाळू लागला.

तिने आसपास नजर फिरवली. घाटीतून बाहेर पडल्यावर दोन्ही बाजूंना दृष्टीच्या टप्प्यापर्यंत रेतीच-रेती दिसत होती. माणसांच्या आणि जनावरांच्या पाऊल खुणांनी लहान-लहान खळग्यांच्या रूपात रेतीमध्ये छोट्या-छोट्या तरंगाची दुनिया निर्माण केली होती. ती रेती ! चांदण्यारात्री सर्वजण इथं येऊन शिवाशिवीचा खेळ-खेळायचे

आणि धूम पळायचे. कसे पळायचे !

तिचे डोळे अश्रूंनी डबडबले. आज मेलं हे सर्व कशाला आठवतंय ? तिचं मन व्याकुळ झालं. याचाच अर्थ आहे, सासरी जाणं पसंत नाहीय. किती वर्षांनी तर सासरी निघालेय !

रेतीत तिच्या पायांतलं त्राण नाहीसं होऊ लागलं. पायांचे सर्व सांधे निखळून पडल्यासारखं तिला वाटू लागलं. यापूर्वी कधीच असं झालं नव्हतं. वीतवीतभर रेतीतदेखील ती घोडीसारखी उड्या मारीत हुंदडायची. तिने पायातल्या वहाणा काढून बोचक्यात बांधल्या आणि बोचके डोक्यावर घेतले.

रेती गरम होती. पायांचा हळूहळू दाह होऊ लागला. पण तिचं मन तर त्याहून अधिक दग्ध होत होतं. ते काय पाणी आलं. आता पायांना गारवा लाभेल. पण या वेड्या मनाला ?

रेती तुडवीत ती पुढे निघाली.

ते आहे पाणी ! ते आहे पाणी ! तिचं आतुर मन पुनः पुन्हा म्हणत होतं, पण इतक्याजवळ दिसूनसुद्धा अजून कसं पाणी जवळ येत नाही हेच तिला उमजेना लहानपणी तर आम्ही जरासं धावल्याबरोबर एकदम पाण्यात शिरत असू.

पितापुत्र नदीकाठी जाऊन उभे राहिले आणि शबूकडे बघू लागले. ती येताना दिसताच पुढे चालू लागले. पुढे चिखल होता. चिखलातून जाताना ते गारा मळणाऱ्या कुंभारासारखे हिंदकाळत होते.

घुंघट न घेता येणाऱ्या शबूने जेव्हा सासऱ्याला आपल्याकडे बघताना पाहिले तेव्हा पट्दिशी चेहऱ्यावर घुंघट ओढला. डोळ्यांची दुनिया जणू थोड्या वेळासाठी बंद झाली. चिखलाची काळी लकाकी आणि पाण्याची झिळमिळ थोड्या वेळासाठी लुप्त झाली. अहा ! तिच्या पायांना गारवा मिळाला. पायाखालची जमीन निसटल्यासारखी वाटली. चिखल सुरू झाला होता.

शबूने डोळे उघडले. पाय घसरला तर ?

गुळगुळीत चिखलाखाली आठ-दहा बोटं खोलवर असलेल्या घट्ट जमिनीवर पाय रोवून चालायचं होतं. हो. लहानपणी गावची पोरं इथं घसरायची. त्यांच्याबरोबर शबूसुद्धा घसरायची. आणि पूर ओसरल्यावर चिखलात पहिल्यांदा कोण पाय ठेवतं म्हणून गावच्या मुलांमध्ये अहमहमिका लागायची. आजसुद्धा जो सर्वांत अगोदर इथून गेला असेल त्याला किती गंमत वाटली असेल. आणि आता– पुढे-पुढे जाणाऱ्या पितापुत्रांचा तिला राग आला– त्यांनी दणादणा पाय आपटून सारा चिखल विस्कटून

टाकला. माझा चिखल बिघडून टाकला. त्या घरची माणसं आहेतच तशी– 'कटहे' * कुठचे !'

"आणि मेले महीसागरचं पाणी डोळ्यांना लावल्याशिवायच पाण्यात घुसले की !"

गुडघ्यापर्यंत पाणी खळखळवीत पितापुत्र दोघांनी जवळजवळ निम्मी नदी ओलांडली होती. शबू पाण्यापाशी येऊन थबकली. खाली वाकून तिने ओंजळीत पाणी घेऊन स्वतःवर शिंपडले आणि, "महीसागर माय ! भले कर माझे आई !" बोलून पाण्यात पाय ठेवला.

खळाळखळ ! खळाळखळ ! पाणी तिच्या पायांशी खेळत वाहू लागलं. किती शीतल स्पर्श ! कशी गुदगुली ! महीसागर माय, मरण यायचं असेल तर तुझ्याच मांडीवर येऊ देत. एखाददिवशी अशीच तुझ्या कुशीत येईन, येईन ! मला तुझ्या घरी घेऊन जा. अरे पण आज असले विचार का मनात येत आहेत ? शबूची छाती धडधडू लागली.

खळखळलेल्या पाण्यात तिचं अंधुकसं प्रतिबिंब पडत होतं. नदी जणू दुःखी होऊन वाहत होती. कारण शबूचा काचा, बाह्यांची चोळी, तिची चुंदडी आणि काळ्या रेशमासारख्या चमकणाऱ्या तिच्या कायेला ती स्पष्टपणे पाहू शकत नव्हती.– हो, पाणी जेव्हा संथ आणि निर्मळ असायचं तेव्हा मैत्रिणींबरोबर मी आपला चेहरा कसा या पाण्यात पाहायची !

शबूला बालपणच्या मैत्रिणी आठवू लागल्या. मन फुलून आलं. एका मैत्रिणीचं तर माझ्या सासरच्या आळीतच लग्न झालेलं आहे. आणि आता तर तिला मुलगादेखील झाला आहे. बस्. गेल्याबरोबर तिथं जाऊन त्याला खेळवायचं.

हा विचार मनात येताच तिला आपल्या पोटात कसली तरी जाणीव झाली. आपल्या उंचावलेल्या पोटावर हात ठेवून ती थोडा वेळ पाण्यात तशीच उभी राहिली. त्याच वेळी तिला कुठूनतरी एका लहान मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. ती कान देऊन ऐकू लागली. चहूकडे निर्जन स्तब्धता होती. पाच कोसांच्या विस्तारात फैलावलेल्या नदीच्या पात्रात एकाही झाडाझुडुपाचं वा घराचं, झोपडीचं कसलंही नावनिशाण नव्हतं. तरीसुद्धा मुलाच्या रडण्याचा आवाज येतच राहिला.

"हे काय ? आई अंबाबाई ! रक्षण कर !" इतकं बोलून ती पुढे झाली.

पाणी खोल होऊ लागलं. पाण्याचा प्रवाहदेखील जोरदार होऊ लागला. शबूने

---

* कटहे– अकराव्याचे श्राद्ध करणारे महाब्राम्हण.

घागरा वर उचलला आणि जपून पावलं टाकू लागली. पायाखाली काही आल्यानं तिचा पाय घसरला. "अगबाई, पडले, गेले– .आणि हे दोघे मेले दुसऱ्या काठावर जाऊन उभे आहेत. अशा लोकांच्या घरी जाण्यापेक्षा या महीसागरात बुडून मेलेलं काय वाईट ! आता जर पाण्याचा एक लोंढा वाहात आला तर ?"

शबूच मन व्यथित झालं. पण मनापेक्षा तिच्या पायांना अधिक सराव होता. तिचे पाय जलचरांसारखे दृढपणे चालू लागले. एकाएकी तिला तहान लागली. नकळत तिने महीसागराच्या पाण्याचा घोट घेतला. पण लगेच थू थू करून थुंकून टाकलं. एकदम खारट पाणी ! पण पाणी तर प्यायला हवं आहे... अरे देवा ! नदीच्या मध्यावर तहान ! ही तहान जीव घेईल. पाण्याने दुथडी भरून वाहणारी नदी, पण कुणाच्याच उपयोगाची नाही. आणि पाच-कोसांपर्यंत गोड्यापाण्याचा थेंबसुद्धा मिळत नाही. तहानेने नदीच्या पात्रातसुद्धा कित्येक लोक मरतात–

पण हल्ली पाणपोई घातल्याचं ऐकलं आहे. म्हणून तर कुणी बरोबर पाणी घेऊ दिलं नाही. आईनं तर पाण्याची बादली भरून दिली होती. पण सर्वजण म्हणू लागले, की पायी जायचं आहे, उगाच पाण्याचं ओझं कशाला ? आणि हे काय बघता-बघता घरी पोचशील.

नदी पार करून ती काठावर उभी राहिली आणि मागच्या बाजूला बघू लागली.

नदीचं पात्र, पलीकडचा चिखल, चिखलानंतरची रेती, रेतीनंतर घाट, घाटानंतर गावची सीमा, मग गाव आणि मग घर ! तिला असं वाटलं जणू एकाच पावलात ती आपला देश सोडून परदेशात येऊन ठेपली आहे. तिचा गळा दाटून आला.

"ही तर परकी धरणी आहे. माझं माहेर तर त्या तिथं राहिलं !" जोवर ती नदीतून चालत होती तोवर तिला माहेरी असल्यासारखं, माहेरच्या थंडगार सावलीत असल्यासारखं समाधान वाटत होतं. पण नदीच्या या किनाऱ्यावर येऊन उभं रांहिल्यानं मात्र तिला सर्वस्वी परक्या लोकांच्या तावडीत सापडल्यासारख वाटू लागं. हा तट अनोळखी आहे, ही रेती अपरिचित आहे आणि हे पितापुत्र ? .हे तर यमदूतासारखे भासताहेत ?

शबूच्या पायांतलं त्राण नाहीसं होऊ लागलं.

किती वर्षांनंतर या काठावर पाय ठेवला आहे ! लहानशी होती तेव्हाच तिचं लग्न झालं होतं आणि लग्नानंतर लगेच ही मंडळी तिला गाडीत घालून घेऊन गेली होती. त्या वेळी या रेतीत खेळावंसं खूप वाटलं होतं. पण गाडीतून कुणी उतरूच दिलं नव्हतं. ते सर्व आता गेल्या जन्मीच्या गोष्टीसारखं वाटत आहे.

बापू हयात असते तर शबूसाठी दुसरं एखादं स्थळ शोधून दिलं असतं. पण आई बिचारी विधवा ! ती कुठवर लेकीला आपल्यापाशी ठेवणार ? ते तर बाबांच्याच आवाक्याचं होतं, की त्यांनी आपला निश्चय दृढ ठेवला आणि लेकीला सासरच्या छळापासून वाचवीत राहिले.

आणि हा सासरा ! हा तर एकदम राक्षस आहे ! माणसाला मारून टाकायला याला वेळ लागत नाही. म्हणतात– याचा थोरला मुलगा मेला तर त्याच्यानंतर त्याच्या बायकोला– मेली लोकं तरी कुठकुठल्या बातम्या काढून आणतात ! त्या वेळी या सर्व गोष्टी समजण्याचं माझं वय नव्हतं– हं तर त्याच्या बायकोला याच्यापासून दिवस गेले आणि मग याने सुनेला मारून टाकून, ती नदीत बुडून मेल्याची आवई उठवली. जाऊ दे झालं. पण या राक्षसाचं मला काय ? अशांना घाबरू लागले तर मी अस्सल अवलाद नाही. आपलाच दाम खोटा असला तर कुठवर तग धरणार ? हा माझा नवरा... जाऊ दे.

बाबा, तुमच्या आत्म्याला शांती मिळो. तुम्ही इतकी वर्ष माझं रक्षण केलं. जिवंत राहाता तर कदाचित माझ्यासाठी दुसरं एखादं स्थळ शोधून दिलं असतं... पण बाबा बिचारे दरोड्यात मारले गेले. ज्या दिवशी ते दरोडा घालायला निघाले होते याच दिवशी हा माझा मुर्दाड नवरा मला घेऊन जायला आला होता. आणि बाबांनी कशी त्याची कानउघाडणी केली होती. "बापापुढं तर काही चालत नाही आणि माझ्या लेकीपुढे मर्दुमकी दाखवतोय. चल हिंमत असेल तर माझ्याबरोबर डाका घालायला चल. दाखव तुझी बहादुरी. माझी दुसरी लेक पण तुला देईन." पण हा बिचारा खरोखरच अगदी नेभळट आहे. म्हणू लागला, "मला तर बाबांनी हिला घेऊन यायला धाडलं आहे." आणि असा काही चेहरा टाकून बसला जणू अंगठा चोखायची सवय अजून गेली नसावी. आणि बाबांनी कसं त्याला फैलावर घेतलं होतं– "बापानं धाडलं आहे. म्हणजे तू स्वतः काही बायकोला घेऊन जायला आला नाहीस. नाही का ? जा. गुरं वळायचं काम करीत बैस. माझी लेक तुमच्यासारख्या थातुरमातुर लोकांच्या घरी नाही जायची. मला नव्हतं ठाऊक तुम्ही लोक असे..." आणि हा बिचारा कसा थरथरत होता. बाबांनी याला दरोड्यासाठी चलायला सांगितलं. पण हा जाता तर मग भित्रा कसा असता ? त्यासाठीदेखील बापाची परवानगी घ्यायला हवी ना !

त्या रात्री बाबा डाका घालायला गेले आणि हा भित्रा सारी रात्र पडून राहिला.

कित्येक वर्षांनंतरची रात्र ! मी पण सारे काही विसरले. अग वेडे, हा नेभळट असला तरी अखेर पुरुष आहे ना ! आणि मी... बाई ती बाईच ! ती हत्येची रात्र...

दुसऱ्या दिवशी बाबांच्या मृत्युची बातमी लागायच्या अगोदरच या भ्याड्यानं कधी कुणास ठाऊक तोंड काळं केलं. अरे भल्या माणसा, जायच्या अगोदर थोडा वेळ मला बाहेर बोलावून माझ्याशी बोलायचं तर होतंस. पण तेवढं साहस असतं तर मला केव्हाच घेऊन नसता का गेला ?

आणि वाघासारखे बाबा गेले तेव्हा या शेळपटांचं बळ वाढणार होतंच ! मुलीची देखरेख कोण करणार ? अयाई, माझ्या बाबतीत लोक कसकशा अफवा पसरू लागले. मग बिचारी आई तरी काय करणार. लेक घरात आहे आणि तिला दिवस गेलेले आहेत. येणाऱ्या-जाणाऱ्या लोकांहाती सांगावा धाडला की तुमच्या सुनेला घेऊन जा. आम्ही तिला पाठवू.

आणि हे बापलेक असे धावून आले, जसे "ईडर गड" जिंकायलाच आले असावेत. आणि यांचे चेहरे ! आणि हा कायर ! आईने माझ्या गळ्याला नख का नाही लावलं ? आणि मीदेखील शांत बसून राहिले. वाटलं होतं कधीतरी या माणसात जीव येईल आणि मग सारे ठीक होऊन जाईल. पण हा तर दहा वर्षांनंतरदेखील जसाच्या तसाच आहे. बापाचं बोट धरून चालणारा ! नाहीतर मी काय इतके दिवस अशीच माहेरी पडून राहिले असते ? मला काय दुसरा कोणी भेटला नसता ? आणि त्यातही मी तर महीसागरचं पाणी प्यालेय. माय महीसागर...

तिच्या पोटातल्या बाळानं पुन्हा वळवळ केली. अंबाबाईचं नाव घेत ती पुढे झाली. पितापुत्र दोघे थोड्या अंतरावर स्वच्छ रेतीत उभे होते. त्यांच्या तोंडून धूर बाहेर पडताना दिसत होता. अरेच्या, बापलेकाच्या धुरातदेखील किती फरक आहे.

शबूला येताना बघून दोघे चालू लागले. ती जरा थबकली. तिच्या डोळ्यांना अंधेरी आली. डोळे उघडून पाहिलं तर दूरदूरपर्यंत मृगजळ पसरलेलं दिसलं. पितापुत्र दोघे त्या मृगजळात अदृश्य होत चालले होते, शबूने हाक मारायचा प्रयत्न केला– "मला तहान लागली आहे." पण तोंडून शब्द फुटला नाही.

पायात सारं बळ एकवटून ती चालू लागली. अधूनमधून मागं वळून पाहात पितापुत्र दोघे पुढेच चालले होते.

शबूने मागे नजर टाकली. आपल्याला मागून कुणीतरी ओढत असल्यासारखं तिला वाटलं. "बाळ, माघारी ये. बाळ, माघारी ये." माहेरची झाडंझुडपं, नदीचा काठ, नदीची रेती आणि फार काय नदीचं पाणीदेखील निरंतर दूर होत चाललं होतं. पावलागणिक तिच्या पायांतली ताकद कुणी हिरावून घेत होतं.

आणि ते दोघे तर जणू सुसाट धावत होते.

"ऐका, जरा थांबा... मला तहान लागली आहे." शबूने हाक मारली. पण समोरून येणाऱ्या वाऱ्याने तिची हाक माहेरच्याच दिशेला वाहून नेली.

तिचा घसा कोरडा पडू लागला. तिनं वहाणा पायात घातल्या. वहाणांत वाळू भरायला लागली. ती थांबली. रणरणत्या उन्हात तिचे डोळे क्षणभर मिटले गेले. डोळे उघडून पाहिलं तर मृगजळच मृगजळ. नदीदेखील मृगजळात हरवली होती. आजूबाजूला नजर पोचत होती तिथवर कुठेही झाडं-झुडपं, माणूस वा पशू काहीसुद्धा दिसत नव्हतं. उष्ण हवा सू सू करीत रेती उधळीत वाहात होती. एकीकडे माहेर, दुसरीकडे सासर दोन्ही गावच्या काळ्या सीमा दिसताहेत आणि शबू जणू दोहोंच्या मधोमध उभी आहे. अगदी एकाकी. ते दोघेही आहेत. पण ते तर पुढेच धावत जाताहेत. मागे वळूनसुद्धा पाहात नाही येत. या ओसाड वैराण जागी मी मेले तरी कोण बघणार आहे ?

तिच्या पोटातल्या बाळानं पुन्हा हालचाल केली. जणू विचारीत होता– "तू काय एकटीच मरणार आहेस ?" आणि शबूला पुन्हा मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. अरे, या वाळवंटात मूल कुठून आलं ? तिला काळजी वाटू लागली. तिला आपल्या मैत्रिणीचा मुलगा आठवला... जणू तोच रडतोय... मी जाऊन त्याला खेळवीन. आणि दोन-चार महिन्यांनी तर माझा मुलगा देखील... हो मुलगाच ! दोघे मिळून खेळू. तिचं मन बहरलं. तिच्या छातीत दूध भरून आलं. हलक्या हातांनी तिनं आपले भरलेले स्तन दाबले. धड धड ! हे वेड मनदेखील कसं आहे ! तिचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. ते न टिपताच ती पुढे चालू लागली.

अचानक तिला पितापुत्र उभे राहिलेले दिसले. तिच्या जिवाचा थरकाप झाला. दोघे उभे राहून विड्या फुंकीत होते. एकाएकी कुणीतरी आपला पाठलाग करीत असल्याचा भास तिला झाला. तिने मागे वळून पाहिले. सासऱ्याच्या पावलांच्या खुणा दिसल्या. अरे देवा ! हे काय ? पण मागं कुणी दिसत नव्हतं. ती चालू लागली. मागून पुन्हा पावलांची चाहूल कानांवर आली. भीतीनं तिचं हृदय थरारलं.

ती पितापुत्राच्या जवळ येऊन उभी राहिली. पतीने क्षणभर तिच्याकडे पाहिले. सासरा तोंड फिरवून उभा होता. पतीला काहीतरी बोलायचं होतं. पण बोलू शकला नाही. शबूने म्हटलं, "तहान लागली आहे. गळ्यात काचेसारखं काही बोचतंय."

"इथं कुठली पाणपोई ?" पती बडबडला.

त्याचवेळी पुन्हा मुलाच्या रडण्याचा आवाज आला. शबूचा सासरा खाकरून म्हणाला, "हो, हो, पाणपोई आहे. माझ्याबरोबर चला."

शबूला आपल्या पतीच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा व्याकुळपणा दिसला. पण त्याचं कारण तिला उमजलं नाही. ते चालू लागले. सर्वांत पुढे सासरा, त्यानंतर पती आणि पतीच्या मागे शबू.

चालता चालता थोड्याच वेळात शबूला जाणवलं की मुलाच्या रडण्याचा आवाज येत होता त्याच्या विपरीत दिशेला ते चालले आहेत. मुलाच्या रडण्याचा आवाज सतत दूर जात आहे.

''इकडं कुठं जाताय ? इकडं कुठं ? पाणपोई तर त्या बाजूला आहे.'' शबूने म्हटलं.

''तुझा समज खोटा आहे सूनबाई. पाणपोई तर त्याच बाजूला आहे.'' ज्या दिशेला ते चालले होते त्या बाजूला हात दाखवून सासऱ्याने म्हटले.

आणि ते चालत राहिले. मुलाच्या रडण्याचा आवाज अगदी अस्पष्ट झाला.

पाणी ! पाणी ! पाणी ! शबूचा श्वास कोंडू लागला. ''माझ्यानं आता चालवत नाही. मला पाणी आणून द्या.'' शबूने बसकण मारली.

पुढे चालणारे पितापुत्र थांबले. पित्याने चहूकडे पाहिलं. सर्वत्र निःस्तब्धता होती. फक्त वारा रेती उडवीत वाहात होता.

''चालवत नाही ?'' सासऱ्याचा आवाज आला. ''ए, बघत काय बसला आहेस ?'' तो मुलाला चेतवीत असल्यासारखं वाटलं.

पती तिच्या जवळ आला. ती घुंगट काढून, डोक्याला हात लावून बसली होती. पतीची सावली आपल्यावर पडत असल्याचं तिला जाणवलं. तिनं घुंगट बाजूला सारून पतीकडे पाहिलं तोच पतीनं झडप घालून तिची मानगूट पकडली.

ती दचकली. आणि असहाय्य होऊन कोसळली. पण तत्काळ तिने पतीच्या पोटात लाथ हाणली. पती दूर कोलमडला. ती हळूहळू उठू लागली तोच तिला सासऱ्याचे निखाऱ्यासारखे डोळे आपल्या चेहऱ्यावर रोखलेले दिसले. सासऱ्याच्या लांडग्याच्या पंजासारख्या दणकट हातांनी तिचा गळा पकडला. दात ओठ खाऊन शबूचा गळा दाबत तो म्हणाला, ''चालवत नाही काय ? चालवत नाही ? इतकी वर्ष चालली नाहीस तर आता कसं चालवेल ? मी तुला कच्चा खाऊन टाकीन समजलीस ! तू माझ्या घरी जाणार ? छिनाल ! तू तर आता इथंच... अरे ए हिजड्या ! बघतोस काय ? धर, धर हिचे पाय !''

शबूच्या गळ्याभोवतीची पकड घट्ट होऊ लागली. तिचे पाय तडफडू लागले. तिचा पती तिचे पाय धरायचा प्रयत्न करू लागला. शबूच्या घशाची कोरड आणखी वाढली.

क्षणभर तिला आपण महीसागराच्या पाण्यात बुडत असल्यासारखं वाटलं. तिचे डोळे मिटू लागले होते तोच क्षणासाठी अचानक उघडले. तिच्या चेहऱ्याजवळ तिच्या सासऱ्याचा भरघोस मिशांचा लांडग्यासारखा चेहरा जणू लटकत होता. त्याला विडीचा वास येत होता. त्या चेहऱ्याच्या मागे आकाशाचा जो थोडासा तुकडा दिसत होता त्यात... त्यात शबूला आपले बाबा डळमळताना दिसले. जणू आपलं पिल्लू मारलं जात असलेलं पाहून गिधाड घिरट्या घालीत असावं.

"बाबा !" तिच्या गळ्यातून अखेरचा शब्द निघाला. मग तिला वाटलं आपल्याला जणू कुणीतरी पेटीत बंद करतंय. दुरून येणारा मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकता-ऐकता तिने डोळे मिटले.

अखेर शबूचा गळा पूर्ण ताकदीनिशी जोरात दाबून शबूचा सासरा उठला. आपण धरून ठेवलेले पाय पार शिथिल झाल्याचं मुलाला जाणवलं. तो पाय सोडून उभा राहिला. शबूचे डोळे बाहेर आले होते. जीभ लोंबू लागली होती.

"हिचं तोंड बांधून टाक." बापाने हुकूम दिला.

मुलगा जसाच्या तसा उभा राहिला.

"मर मेल्या रांडेच्या !" बापाने शिवी हासडून अगदी सराईतपणे सुनेचं तोंड तिच्याच चुंदडीने बांधून टाकलं.

प्रेत रेतीत पुरून थोड्या वेळाने ते दोघे मुलाच्या रडण्याचा आवाज जिथून येत होता त्या दिशेला चालू लागले.

पाणपोईवर पोचून ते पाणी प्याले. बापाने पाणपोईवालीला विचारलं, "बाळ इतकं का रडतंय ?"

"त्याला पटकी झाली आहे. सकाळपासूनच रडतोय, रूपा होण !" ती– म्हणाली, "सुनेला घेऊन आला का "

"नाही. बाई. त्यांनी पाठवलीच नाही." रूपा होणने चिलीम भरत म्हटलं.

ती माणसं मेली अशीच आहेत. किती वर्षांपासून पोरीला घरात ठेवलीय. सत्यानाश होवो मेल्यांचा !"

"जाऊ दे. बाई. असं बोलू नये." रूपा होण म्हणाला आणि उठून चालू लागला. जाता जाता त्याने त्या पाणपोईवालीच्या हातात एक बंदा रुपाया ठेवला. "घे. पोराला काही खायला दे."

त्या थेरड्याच्या हातून गाडीच्या चाकासारखा गोल गरगरीत रुपाया मिळालेला पाहून पाणपोईवाली बाई आश्चर्याने थक्क झाली. गोंधळल्या नजरेने ती तिथून

जाणाऱ्या त्या दोघांकडे बघत राहिली.

थोडं दूर गेल्यावर बापाने तोंडातून धुराचा ढग ओकत मुलाला म्हटलं, ''मेधा, तू पाहिले होतंस ना ?''

''काय बाबा ?'' थरथरत्या हृदयाने मुलाने विचारले.

''तिच्या पोटात पोर होतं ना ?''

''होय बाबा ! पण...'' मुलगा म्हणाला. त्याला आणखी काही बोलायचं होतं. पण कुणास ठाऊक कोणत्या अदृश्य भीतीमुळे त्याच्या तोंडून शब्द फुटला नाही. आणि अर्धमेल्यासारखा होऊन पाय फरफटत तो बापाच्या मागून चालू लागला.

# माझ्या चंपाचा नवरा

□ उमाशंकर जोशी

लक्ष्मीने उल्हासपूर्ण जीवनाच्या उंबरठ्यावर पाय ठेवला न ठेवला तोच तिचं नशीब फुटलं. अचानक तिचा पती तापाने आजारी पडला आणि वैवाहिक जीवनाचा आनंद पुरती दोन वर्षदेखील न घेता जीवन सोडून निघून गेला. लक्ष्मीसाठी अवघं जग अर्थशून्य झालं. तिचं उत्फुल्ल सौंदर्य व्यर्थ ठरलं. त्या सौंदर्याला फुटलेल्या धुमाऱ्यासारखी एक चार महिन्यांची मुलगी चंपा फक्त मांडीवर होती. तिनंच तिला मृत्यूच्या दाढेत शिरण्यापासून वाचवलं.

सर्वजण म्हणत होते की लक्ष्मीच्या नवऱ्याच्या नशिबातच लक्ष्मीसारखी बायको नव्हती. पुरता उपभोग घ्यायच्या आधीच तो भरल्या ताटावरून उठून गेला. अशा तऱ्हेने लोक एकीकडे मृत्त व्यक्तीची कीव करीत होते तर दुसरीकडे अप्रत्यक्षपणे लक्ष्मीची प्रशंसा करीत होते. एखादा शंकेखोर माणूस हळूच बोलूनही जायचा, "एखाद्या वैऱ्यानं मूठ घातली असेल. नाहीतर तुझ्या नवऱ्याला तर नखाएवढा रोग नव्हता. त्याच्या सुखाचा कितीतरी लोकांना हेवा वाटायचा."

ते काही असो. लक्ष्मीचं लग्न होईपर्यंत गावातले लहान मोठे सर्वजण आपल्या योग्यतेचा विचार केल्याखेरीजच लक्ष्मीचं पतिपद भूषवायला आतुर होते. यात अपराध कुणाचाच नव्हता. अपराध असलाच तर तो लक्ष्मीच्या सोनेरी छटा असलेल्या दाट लांबसडक केसांचा, तिच्या डोळ्यांतील थंड तुफानाचा आणि तिच्या ओठांवर क्वचितच खेळणाऱ्या पण म्हणूनच अनावर खळबळ माजवणाऱ्या स्मिताचा होता.

आणि तरीदेखील तिचा दुर्दैवी पती अवेळीच मरण पावला ! त्या दाट कुरळ्या केसांचा अधिकार त्याला ज्या दिवशी मिळाला होता त्या दिवशी त्याच केसांच्या एकेक बटेने जणू फाशीसारख्या यातना होऊन अनेक निराश हृदयांचा चक्काचूर झाला होता. पण ते सुख त्या अभागी माणसाला तरी कुठं लाभदायी झालं ? आणि आज तेच केस लक्ष्मीच्या डोक्यावरून कापून टाकण्यात आले आहेत. जणू फळांनी डवरलेल्या वृक्षावर फैलावलेल्या अमरवेलीला कुणीतरी ओरबाडून काढून पायदळी

चुरडून टाकलं आहे. तिच्या हातातली काकणं काढून टाकण्यात आली आहेत. पूर्वी हीच काकणं थोडीशी जरी किणकिणली तरी लोकांचे देहभान हरपून जायचं. वाटायचं जणू दोन हवाई गोळ्यांचीच टक्कर झाली आहे. पण ते सारं काही आता संपलं आहे.

लक्ष्मी हे वैधव्य कसं सहन करील याविषयीही कुणाला कुतूहल वाटत होतं, तर स्त्री जगतातला कुणी माहितगार प्राणी लक्ष्मीला वैधव्य सहन करण्याचे उपाय सांगायला उतावीळ होत होता. सहानुभूती असलेल्या एखाद्या विधवेला लक्ष्मीचा शोक पाहवला नाही तर ती म्हणायची, ''तुला स्वतःसाठी करायचे असले तर वाटेल तेवढे उपासतापास कर. पण या अजाण पोरीनं कसलं पाप केलंय की तिलादेखील–''

''तूच एक जगावेगळी विधवा थोडीच झाली आहेस ? बायकांच्या जन्माला आल्यावर कधी ना कधी विधवा व्हावंच लागतं...''

''सांभाळता आलं पाहिजे ग बाई. बघ, ती चतुर तेराव्या वर्षीच विधवा झाली होती आणि आता आपल्या डोळ्यांदेखत तीस वर्षांची झाली आहे. गंगा आक्का– सांगायची ना ? तुझ्या बहिणीची मुलगी– आणि काशी आक्का, तुझ्या थोरल्या दिराची सून, कधी विधवा झाली कुणाला ठाऊक आहे ? वेळप्रसंग पाहून वागता आलं पाहिजे. आम्हाला तरी असंच वाटत की...''

''आणि हो, दुःख तर सर्वांनाच आहे. कुणाला नाही ? बघ तर. बऱ्याचशा सौभाग्यवतीदेखील नरक यातना भोगीत असतात. उलट काही काही जणी विधवा असूनसुद्धा सुखानं जगत असतात.''

''आता तुम्ही ही पंचाईत थांबवणार की नाही ? काय मेलं विधवा आणि सधवांचं पुराण घेऊन बसल्या आहेत. रडवून रडवून बिचारीला अर्धमेलं करून टाकलं आहे.''

लक्ष्मीने स्वतःदेखील थोडासा घुंगट बाजूला सारून हे कोण कडाडलं ते पाहिलं. मग मनाशीच म्हणाली, बरं झालं हिनं सर्वांची तोंड गप्प केली ते.

''बरं बाळ, या पोरीची कीव कर आणि जास्त रडू नकोस.''

''जगी सुख जवापाडे आणि दुःख पर्वताएवढे असते. कण्हतकुंथत का होईना जगावंच लागतं.''

''काही कामकाज असलं तर निःसंकोचपणे सांगत जा. मी माझ्या किशोरला पाठवून देईन.''

''आता जायला काय घ्याल माझ्या आयांनो ?'' त्या तोंडाळ बाईने पुन्हा सर्वांना दटावलं आणि पिटाळून लावलं आणि नंतर, त्या सर्वजणी रडल्या नसतील अशी

हमसून हमसून रामी लक्ष्मीच्या खांद्यावर डोकं टेकून रडली. ती इतकी रडली की तिचं तिलाच कदाचित विचित्र वाटलं असेल. थोडा वेळ गप्प राहून तिने आपल्या हातांनी लक्ष्मीचा घुंगट बाजूला केला आणि दोन्ही हातांच्या ओंजळीत तिचा चेहरा धरून एकटक तिच्याकडे बघू लागली. लक्ष्मी व्याकुळ होऊन म्हणाली, "त्या सर्वांना तुम्ही धमकावून गप्प केलंत आणि आता स्वतः इतकं का रडत आहात ?"

"तुला नाही समजणार लक्ष्मी." इतकं बोलून रामी थरथरणाऱ्या पापण्यांनी लक्ष्मीकडे बघू लागली. ती स्वतः तीस वर्षांपासून विधवा होती. तिला तर मूलबाळदेखील नव्हतं. तिचा नवरा लहानपणीच वारला होता.

"काय बघता आहात ?" लक्ष्मीने विचारलं. मग थोडं सुखावून म्हटलं, "इतक्या नवलानं तर तेदेखील कधी माझ्याकडे बघत नसत." बोलता बोलता रामीच्या ओंजळीत लक्ष्मीच्या चेहऱ्याचे स्नायू असे थरारू लागले जणू त्यांना उकळी फुटली असावी. रामीने हात बाजूला करीत म्हटले, "म्हणूनच तर म्हणते लक्ष्मी, रडू नकोस. नाहीतर बघ मीदेखील पुन्हा रडायला लागेन." आणि मग पदराने लक्ष्मीचे अश्रू पुसत पुसत एकदम पुरुषांसारख्या आवाजात ती म्हणाली, "विधवेचं दुःख विधवेलाच ठाऊक. यापुढे तुला एकटीनेच जगायचं आहे. मी तर कित्येक वर्षांपासून एकटी जगतेय. तू अजिबात घाबरू नकोस." आणि मागे सरत लक्ष्मीकडे एकटक पाहात म्हणू लागली, "मी तर बस हेच पाहातेय की काय रूप आहे ! डोकीवरून केस गेले तरी जसंच्या तसं. हात ओकेबोके झाले तरी जरासुद्धा फरक पडला नाही. काही हरकत नाही लक्ष्मी. रडून काय उपयोग ? तू मुळीच घाबरू नकोस. तुझा नवरा खरंच दुर्दैवी म्हणूनच तो काळाच्या दाढेत गेला. पण तू तर नाहीस..."

त्याचवेळी छोट्याशा चंपाने पाळण्यात ऊं ऊं करून कूस बदलली. म्हणून दोघींचं लक्ष तिकडे वळलं.

"लोकनिंदा ? अग, लोक म्हणजे तरी कोण ? आपणच लोक आहोत. घरोघरी मातीच्या चुली आहेत, लक्ष्मी, हळूहळू तुला सारं काही समजेल."

पाळण्यात पुन्हा चंपा जरा कुरबुरली. लक्ष्मी इतका वेळ रामीच्या फटकळ बोलण्यानं अस्वस्थ होऊन नुसती चुपचाप बसली होती. आता तिनं पाळण्याकडे खुणावून डोळे गच्च मिटून घेतले जणू तिला चक्कर येत असावी.

"ही ऐकेल ? किती वेडी आहेस तू. मोठी होऊन हिलादेखील समजायला लागेल की..."

चंपाने पाळणा हिंदळला आणि ती मोठ्यांदा रडू लागली.

लक्ष्मी कठोर स्वरात म्हणाली, ''काय समजायला लागेल ?'' आणि उठून चंपाला छातीशी धरून तिला कुरवाळीत ती पुढे म्हणाली, ''बाळ, मी सतरा अठरा वर्ष तरी घालवली, तुला तर अजून...''

''नंतर सारं काही सावकाश लक्षात येतं.'' बोलून रामी निघून गेली.

लक्ष्मीने एकान्तात चंपाला आसवांनी व मायेनं न्हाऊ घातलं आणि तिच्याशी तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टी बोलत राहिली– ''पाहिलंस तू, ती दुर्गा मोठेपणाचा आव आणून तिच्या किशोरला माझं कामकाज करण्यासाठी पाठवायला तयार झाली. आणि रामी ? तिचं तर जणू अवघ्या जगाशीच वैर आहे. पण तिला काय ? आणि मी तिचं ऐकलं तरी मलाही काय ? पण बाळ, तुझी मात्र जिवंत असून मेल्यासारखी अवस्था होईल ना ? काय तरी लोक आहेत. मी काय यांचा सल्ला विचारायला गेले होते ? माझ्यासाठी तर माझं हे घर भलं आणि हा पाळणा भला ! बस्. तू मोठं व्हावंस, अब्रूनिशी तुझं लग्न लावून द्यावं, तू तुझ्या घरी सुखी रहावं... याहून अधिक कोणतं सुख मला हवंय ? बघा बाई, कशी हसतेय. जरा मोठी हो. मग आपण दोघी सारख्या गप्पाच मारत राहू आणि आपलं घर कसं भरल्या भरल्यागत वाटेल. आणि वेळ आता काय उशीर लागतो ? अरे, पुन्हा गंभीर झालीस तू ? पुरे झालं हे. खूप नखरे झालेत... अच्छा, म्हणजेच तुला ठाऊक नाही. तू अजून मला ओळखत नाहीस. मी लक्ष्मी नाही, चंपाची आई आहे.''

चंपाची आई !

लोकांनी पाहिलं आणि म्हटलं, ''लक्ष्मीसारखी विधवा आजवर कधी पाहिली नव्हती.''

''पती वारला तर जणू लक्ष्मीदेखील मेली !''

''कुठे ती पूर्वीची सौंदर्यखनी लक्ष्मी आणि कुठे ही म्हातारी !''

डोळ्यांवर पापण्यांचे पडदे लोंबू लागले. आणि त्याआड यांचं खरं तेज लोप पावलं. निरर्थक ओठ बिचारे असे चुपचाप आणि विलग राहू लागले जणू त्यांनी परस्परांच्या जवळ येणे योग्य नव्हते– भरलेल्या बसमध्ये परका पती आणि परकी पत्नी मनातल्या मनात एक तडजोड करून संकुचित होऊन जवळजवळ बसतात तशी त्यांची अवस्था होती. शरीराचे अणू परमाणू पूर्वी जिथं एकेक होतं तिथं आता जबरदस्तीने जणू दोन दोन, तीन तीन ठासून भरले होते आणि असं वाटत होतं जणू साडीत शरीर काही नाहीच.

दुर्गाचा किशोर दोन चार वेळा काही कामकाज तर नाही ना याची विचारपूस

करून गेला. रामीने ज्यांच्यावर लक्ष्मीची जबाबदारी सोपवली होती ती मंडळीही अधूनमधून येऊन जायची. पण लक्ष्मी मात्र आपल्या घरात कधी शेणगोठा करताना दिसायची. तर कधी धुणं भांडे करताना नाहीतर धान्यधुन्य पाखडताना दिसायची. आणि तिच्या अंगप्रत्यंगातून नावडच व्यक्त होत असल्याचे दिसायचे. दिवसेंदिवस ती आपलं मन घाण्याला जुंपून घेत होती. कसले पुरुष, कसल्या स्त्रिया आणि कसलं जग. लक्ष्मीसाठी तर ती भली की तिची छोटी चंपा भली होती. चंपा दोनतीन वर्षांची झाली, तेवढ्यात लक्ष्मीचं वय मात्र पंचवीस तीस वर्षांनी वाढलं, रामीनेच एक दिवस लाडाने चंपाला एक चापट लगावून म्हटले होते, ''रांड, तूच लक्ष्मीला खाऊन टाकलंस.''

त्यानंतर लक्ष्मी बाहेरची कामंदेखील करू लागली. घरात जनावरांबरोबर जनावर होऊन गायीम्हशींच्या दुधापासून थोडी कमाई करायची आणि बाहेर ऋतुमानाप्रमाणे गवत, सरपण, महुआ (मोहाच्या झाडांची फुले) इत्यादी वेचून विकायची व थोडे पैसे मिळवायची. दुसऱ्यांच्या घरचं दळणकांडण तर ती करीत होतीच.

अशाप्रकारे लक्ष्मी स्वतः झिजत राहिली पण चंपाला फुलासारखं फुलवायचा प्रयत्न ती सतत करीत राहिली. आणि वर्षामागून वर्ष कशी उलटत गेली ते तिला कळलेच नाही. आपल्या साऱ्या आशा तिने लेकीवर केंद्रित केल्या होत्या. कधीकधी लक्ष्मी असं काही करून बसायची की तिला वेड तर नाही ना लागलं अशी शंका चंपाखेरीज इतरांना वाटायची. एखाद्या परक्या पुरुषाबद्दल ती क्वचितच कधी काही बोलली असेल. पण चंपाच्या भावी पतीविषयी मात्र ती नेहमी मोठ्या उत्साहाने बोलायची. चंपाच्या मैत्रिणींनी तिला एकान्तात थट्टामस्करी करून जितकं सतावलं असेल त्यापेक्षा जास्तच लक्ष्मी मैत्रिणीसारखी होऊन तिला चिडवायची आणि मग समाधानाने म्हणायची, ''तुझं लग्न झालं म्हणजे बस्स् ! तेवढ्यासाठीच जगतेय मी.''

एकदा कुणीतरी म्हणालं, ''लक्ष्मी, चंपा खरोखरच तुझी लेक शोभते. अगदी तुझ्यासारखाच तोंडावळा आहे.''

चंपा ऐकत होती. ती आईकडे बघू लागली आणि आईबरोबर आपली तुलना होताना पाहून मनोमन निराशही झाली.

एके रात्री झोपायच्या अगोदर अंधारात पडल्या पडल्या लक्ष्मी चंपाला चिडवत होती. ''हो, हो, काळा ! शंभरदा काळा ! मी पण काळी आहे आणि तुझा बापदेखील काळा होता. तू कुठली गोरी आलीय ? लक्षात ठेव. तुझ्यासाठी मला काळाच नवरा शोधावा लागणार आहे.'' गेल्या पंधरा वर्षांत बिचारीने एकाही पुरुषाकडे डोळाभर

पाहिलादेखील नव्हतं. क्वचितच कोणाशी बोललीही असेल. पण आता, सर्वजण जेव्हा चंपाच्या भावी नवऱ्याविषयी बोलू लागले तेव्हा चंपाला त्याबाबतीत विचार केल्याखेरीज राहवणे कसे शक्य होते ? आणि चंपाची तर ती खरीखुरी जिवलग मैत्रीण होती. म्हणून कामकाजातून थोडा जरी वेळ मिळाला तरी दोघी जणी चंपाच्या भावी पतीविषयी गपा मारू लागत. चंपासाठी हे सर्व नाविन्यपूर्ण, उमेदीचं, उल्हासयुक्त होतं. पण लक्ष्मीच्या दृष्टीने मात्र तिचे ढासळलेले बुरूज आणखी जीर्णशीर्ण होण्यासारखं हे होत.

कधी कधी म्हातारी रामी येऊन दारात बसायची आणि कर्कश स्वरात म्हणायची, ''अग, ए, मुलखावेगळ्या पोरीची माय, आता हा धोंडा कधी उरावरून बाजूला करणार ?''

पण अंदरकी बात अशी होती की पतीच्या बाबतीत लक्ष्मी जितका विचार करायची तितका खुद्द चंपानेदेखील कधी केला नसेल. चंपाला आपल्या भावी पतीविषयी चिंता वा तर्कवितर्क करायची गरजच काय होती ? तिच्या हितचिंतनासाठी तिची आई होती की ! दुसऱ्या लोकांनी फक्त एवढंच केलं की गुपचूप सल्ला मसलत केली आणि चंपा आता उपवर झाली आहे, तिचं लग्न करून टाकायला हवं हे लक्ष्मीच्या कानावर घालून टाकलं ! लक्ष्मीला ती सूचना उमजली. नाहीतरी आई म्हणून तिला चंपाच्या लग्नाची जबाबदारी पार पाडायची होतीच. मोलमजुरी करकरून पैपैसाही जमविला होताच. म्हणून खर्चाबिर्चाचीही काही काळजी नव्हती. पण चंपासाठी वर पसंत करणे इतके सोपे थोडेच होते ?

लक्ष्मी चंपाच्या पतीच्या बाबतीत नाना कल्पना करू लागली. मोठ्या उत्साहाने मनःपटलावर विविध चित्रे रेखाटू लागली. जणू चंपाच्या साऱ्या भावभावना, तिच्या आशा आकांक्षा तिने आपल्यात सामावून घेतल्या असाव्यात. ''नाहीतर काय, माझ्या चंपाचा पती काकणभर श्रेष्ठच असायलाच हवा.''

चंपा तशी फार खोडकर होती. पण आईसमोर जरा कमीच बोलायची. एक रात्री दिवा मालवून मायलेकी दोघी झोपायला गेल्या तेव्हा लक्ष्मी म्हणाली, ''त्या म्हाताऱ्या कुबेरानेदेखील त्याच्या मुलासाठी मागणी घातलीय. आता बोल काय म्हणायचंय तुला ?'' काहीच उत्तर मिळालं नाही तेव्हा चंपाच्या मतकावर हात फिरवीत तिने पुन्हा विचारलं, ''ए– बोल की.'' उत्तरादाखल चंपाने नकारार्थी मान हलविली तेव्हा लक्ष्मी जरा चिडलीच. म्हणाली, ''असं करशील तर तुझ्यासाठी नवा वर कुठून पैदा करून आणायचा ? जरा नीट विचारानं वागायला शीक.''

आईला भेटायला येणाऱ्या बायका चंपाला म्हणायच्या, "ए चंपे, या कलियुगात अशी आई भेटणं कठीण आहे. तिनं रक्ताचं पाणी करून तुला वाढविलं आहे. आपलं घरदार, रूप सारं तिनं तुला देऊन टाकलं. स्वतः झिजत राहिली पण तुला कशाची झळ लागू दिली नाही. ती सांगेल तसंच कर बरं बाळ. अशी आई आजवर कुणाला भेटली नसेल. लेकीसाठी कोण हिच्यासारखं रक्त आटवतंय ?"

चंपादेखील समंजस आणि शहाणी मुलगी होती.

"तर मग आई, तूच सांग."

"मी काय सांगू ?"

"तू नाही तर दुसरं कोण सांगणार ? तू माझी आई आहेस ना ?"

"हो. पण लेक तर तूच आहेस. लग्न तुला लावायचं आहे की मला ?"

आणि दोघी हसू लागल्या.

शांतता !

"तर तू माझं लालनपालन का केलंस ?"

"तुझं लालनपालन करूनच तर मी जिवंत राहिले. नाही तर काय मी या घरात टिकले असते ? तुझ्यासाठीच मी या घरात टिकून राहिले. वाटायचं. एक दिवस तू मोठी होशील आणि चांगल्या प्रतिष्ठित स्थळी पडून सुखी होशील."

"पुन्हा आपलं तेच प्रतिष्ठित स्थळाचं पालुपद." चंपा जरा नखऱ्याने म्हणाली.

"बघा बाई, मी काय म्हटलं ? तू विचारलंस म्हणून सांगितलं. बाकी तू सुखी रहावंस म्हणूनच माझ्या कुडीत प्राण आहे... आणि ही गोष्ट तू कधी विसरू नकोस की मी तुझ्या इज्जत-अब्रूसाठीच मी जिवंत राहिलेय." लक्ष्मीने विव्हल होऊन म्हटले.

चंपाने लाडिकपणे म्हटले, "तर मग सांग ना आई."

"मलाच सांगायला लावणार आहेस ? तर मग ठीक आहे. पण मला कमी वयाच्या अननुभवी तरुणांची भीती वाटते. ती गौरी होती ना ? तिचा पती नुकताच विधुर झाला आहे. समजूतदार आहे, प्रतिष्ठित आहे. जग पाहिलेला आहे आणि श्रीमंतदेखील आहे."

"इतका मोठा ?" चंपाच्या तोंडून नकळत बाहेर पडलं.

"खूप झालं आता. यापुढे कधी काही बोलणार नाही. तुला लहान नवरा पाहिजे ना ? तर सुंदरा मावशीच्या दिराला नुकताच एक मुलगा झाला आहे. त्याच्याशी लग्न लाव."

हसण्यासारखी गोष्ट नसूनही दोघी खळाळून हसल्या.

गावच्या सर्व लोकांनी प्रशंसा केली.

"आई, असावी तर अशी आणि लेक असावी तर अशी !"

"लक्ष्मीने पोरीच्या आयुष्याचं सोनं केलं."

"बिजवराला दिली आहे. खूप सुखात राहील."

"बिचारी लक्ष्मी आता एकटी पडेल. आता कसली ती जिवंत राहतेय !"

पण लक्ष्मी काही एकटी पडली नाही. आता तिला पैसा जमवायची गरज उरली नव्हती. सकाळ संध्याकाळ मैलभर पायपीट करून ती घरचं दूध जावयाच्या घरी पोचवायची. तूप लोणीदेखील वरचेवर पाठवायची. नाही तर स्वतः जाऊन देऊन यायची. कधी कधी जावई येऊन घेऊन जायचा.

जावई पूनमलाल चांगला माणूस होता. खूपच मिळून मिसळून वागणारा. आणि लक्ष्मीशी तर त्याचं दुहेरी नातं होतं. ती त्याची सासू तर होतीच. पण गौरीची बालपणाची खास मैत्रीणदेखील होती. म्हणूनच गौरी आणि चंपा यांच्यामध्ये लक्ष्मी एखाद्या पुलासारखी होती. सुरुवातीला जावई आणि सासू चंपाविषयी फारसे बोलत नसत. म्हणून कधीकधी तासन् तास मृत गौरीच्या विषयीच दोघे बोलत बसायचे. लक्ष्मी पुनःपुन्हा गौरीच्या लहानपणचे मजेदार किस्से सांगायची आणि ती व पूनमलाल दोघे गौरीच्या त्या दूरवरच्या भूतकाळात हरवून जायचे.

कधीकधी गल्लीतून जाणारं कुणीतरी अचानक विचारायचं ? "काय गप्पा चालल्या आहेत लक्ष्मी ? कोण आलंय ?"

"अहो..." लक्ष्मी भरल्या गळ्याने उत्तर द्यायची, "माझ्या चंपाचा नवरा."

एकदा आळीतल्या काही बायका बरीच रात्र होईपर्यंत गप्पा गारीत बसल्या असताना कुणीतरी म्हणालंदेखील, "लक्ष्मी हल्ली किती आनंदात असते– लेकीचं लग्न लावून टाकलं ना म्हणून !"

"नाहीतर काय ! किती मोठ्या काळजीतून सुटली बिचारी." दुसरीने सुरात सूर मिळवला.

घोळक्यात आणखी एक जण येऊन बसली आणि विचारू लागली– "लक्ष्मी संध्याकाळी जेव्हा मी चालले होते तेव्हा तुझ्या घरात कोण होतं ग ?"

"माझ्या चंपाचा नवरा." ल' ीने उत्तर दिले.

"आता कुठाय ?"

"गेला आपल्या गावी."

"अग, इतका अंधार पडला होता. एखाद दिवशी राहिला असता तर काय

बिघडलं असतं ?''

''मी तर सांगितलं होतं रहायला. पण किती सांगणार ?''

''का ? सासरी राहिला असता तर त्यात काय बिघडलं असतं ?''

आलेली बाई इतकं बोलून तपकीर ओढून फटाफट शिंका द्यायच्या अतिशय महत्त्वाच्या कार्याला लागली.

घरची लहानसहान कामं पूनमलाल अधूनमधून येऊन करून द्यायचा. लक्ष्मीला हल्ली सवड असायची म्हणून तिला अवांतर नवी कामंही सुचायची. छप्पर मोडकळीला आलं होतं, नवं घालून घेतलं, दार नीट बंद होत नव्हतं, ते ठीक करून घेतलं. वाणी जास्त पैसे मागत होता, त्याचा हिशेब चुकता केला. तीनदा व्यालेली एक गाय होती, ती बऱ्या किमतीत चांगल्या जागी विकून टाकली.

''हे छप्पर केव्हा घातलंस लक्ष्मी ?''

''कुणी घालून दिलं ?'' दुसरीने विचारलं.

''दुसरं कोण घालून देणार आहे ? माझ्या चंपाच्या नवऱ्याने घालून दिलं.''

''नशीबवान आहेस बाई. नाहीतर असा जावई शोधून कुणाला सापडत नाही.''

कधीकधी दोघं गप्पा मारत बसले असताना सहज जाता जाता कुणी दारातून आत डोकवायचं आणि हसून निघून जायचं. त्यावेळी लक्ष्मीला वाटायचं किती सुखी आहे. कुणी उपहासानं हसत असेल याची स्वप्नातदेखील तिच्या मनाला शंका यायची नाही. का यावी ? जावयाबरोबर मनमोकळेपणाने गप्पा मारायचाही हक्क तिला नाही का ? जगाने कुटुंब रचनेत असे कितीतरी अधिकार दिलेले आहेत जे कायद्याच्या चौकटीत कुठेही बसत नाहीत. आणि त्याच्याबाबतीत वायफळ बडबड करायचा अधिकार कुणालाही नाही. गेल्या पंधरा वर्षात लक्ष्मीने कधी कुणा पुरुषाशी गप्पा मारल्या होत्या ? पूनमलाल तर तिचा जावई आहे. त्याच्याशी ती बोलणार आणि नक्कीच बोलणार !

पण बोलू नकोस असं म्हणतंय तरी कोण ? आणि लक्ष्मी तर गप्पांमध्ये अशी काही रंगून जाते की जणू किती वर्षापासून, किती जन्मांपासून ती कुणाशी बोलली नव्हती कुणास ठाऊक ! गप्पांमध्ये तिला वेळेचंही भान रहात नाही.

''बरं. आता बोलणं संपवू या. मला उशीर होतोय... तुम्ही सांगत होता की तुम्ही आणि ती दोघीजणी आंबराईत गेलात.'' अंधार पडायच्या आत घरी पोचायच्या तयारीने उभा रहात पूनमलाल म्हणाला. लक्ष्मीने बोलणं आवरतं घ्यावं म्हणून गप्पाचं सूत्र त्यानं लक्ष्मीच्या हाती सोपविलं.

''एवीतेवी उशीर तर झालाच आहेच. अंधारात कसं जाणार ?''

''रोजच जातो, आज काही नवीन विशेष थोडीच आहे ? चला. काय सांगत होता ते पटकन सांगून टाका... हं. तर तुम्ही आणि ती आंबराईत पोचलात. मग ?

''हो, रोज रोज उशीर झाला तरी मी तुम्हाला जाऊ देते त्यासाठी सगळेजण मलाच दोष देतात, तुम्हाला नाही काही !'

पूनमलालने मोठ्या अधीरतेने जायला तयार होत म्हटलं, ''अंधार पडो नाहीतर उजेड असो. घरी गेल्याखेरीज गत्यंतर नाही. हो, तर ती गोष्ट ?''

''सासरी राहण्यात जगावेगळं तर काही नाही !'' लक्ष्मी पोपटासारखी, यंत्रवत बोलून गेली.

''तुम्ही जी गोष्ट सांगत होता ती सांगून टाका म्हणजे मला निघता येईल. उगाच आणखी उशीर होतोय.''

''तर मग जा. उद्या सांगेन. आजच सांगणं काही जरूर नाही.'' लक्ष्मी चातुर्यानं म्हणाली. पूनमलालला वाटलं लक्ष्मी रागावली. म्हणून निश्चिंतपणे थांबत असल्याचा आव आणून तो थांबला. खरं सांगायचं म्हणजे वस्तुस्थिती अशी होती की लक्ष्मी आपलं बालपण आठवून आठवून गौरीच्याविषयी ज्या गोष्टी सांगत होती त्या ऐकल्याखेरीज त्याचं पाऊल पुढे उचलत नव्हतं.

''बरं तर. मी थांबतो. आता तर सांगाल ना ?''

लक्ष्मी हसून म्हणाली, ''त्यात काय एवढं मोठंसं ? उद्या सांगीन. नाहीतर पुढच्या वेळी याल ना तेव्हा सांगीन.''

''छे, छे. बोलणं अर्धवट टाकू नका. हं तर मग आंबराईत पोचलात. पुढे काय झालं ?''

''पुढे... मी एक दगड उचलून आंब्याच्या झाडावर मारला. कैरी काही पडली नाही. अलबत दोन बांगड्यांची टक्कर होऊन चुरा झाला.''

''हं.'' जायच्या घाईगर्दीत, त्या हकीकतीत फारसं गम्य नसूनदेखील पूनमलालने हुंकार दिला. ''मग ?''

''मग गौरीनंदेखील एक मोठा दगड उचलून फेकला. फेकला खरा, पण तो वर जायच्या ऐवजी धपकन खालीच पडला आणि गौरी किंचाळली.'' हात निखळला ग बाई.'' आणि कुंपणाकडे बघत खाली बसली. कुंपणाच्या पलीकडून कुणीतरी मुलगा जात होता वाटतं. पण त्यानं ऐकलं नाही वाटतं. मी गौरीचा हात नीट करायचा प्रयत्न केला पण तिला हात लावताच ती ओरडायला सुरुवात करायची. ते तर बरं

झालं की रघा शेतकऱ्याचा मुलगा त्या बाजूला आला आणि त्याने एक दोन हिसडे देऊन हात बसवून टाकला. जोडीला चार कैऱ्या पण दिल्या. त्या घेऊन आम्ही चालू लागलो तोच एक दगड भिरभिरत आला आणि माझ्या डाव्या हाताच्या कोपराला लागला. तसा तो गौरीलाच लागणार होता. पण थोडक्यात बचावला. रघा शेतकऱ्याचा मुलगा तर तलावाकडे चालला होता. आणि दगड आला होता कुंपणापलीकडून. त्या दिवशी मी जितकी रडले त्यापेक्षा जास्त गौरी रडली. रडता रडता ती सारखी कुंपणाकडे बघत होती. लहान असली तरी किती भली होती ती.''

पूनमलाल स्तब्ध होऊन उभा राहिला. त्याच्या मनाला असंख्य इंगळ्या डसत होत्या... याचा अर्थ आहे गौरी माझ्याशी खोटं बोलली होती तर. त्यांच्या नजरेसमोर त्या सर्व घटनेचं चित्र उभं राहिलं. पूनमलालला कुंपणाकडे जाताना पाहून त्याचं लक्ष वेधण्यासाठी गौरीने उगाच आरडाओरडा केला होता. हा आरडाओरडा बनावटी असल्याचं आणि गौरी एकटी नसून तिच्या बरोबर कुणी असल्याचं त्यानं ओळखलं होतं. म्हणून तिकडे लक्ष न देता तो पुढे निघाला. पण वळून मागं पाहिल्याखेरीज त्याला राहवलं नाही आणि त्याला दिसलं की दाट आंबराईच्या मागे सूर्य अस्ताला जाणार आहे आणि रंगीबेरंगी मेघांच्या पार्श्वभूमीवर तीच गौरी एका सामान्य शेतकऱ्याच्या मुलाचा हात धरून उभी आहे. याच गौरीशी पुढच्या वसंतऋतूत पूनमलालचं लग्न होणार होतं. पूनमलालचा पारा चढला. दगड मारून तिचा तो हात मोडून टाकावंसं त्याला वाटलं आणि दगड मारून तो पळून गेला. नंतर गौरीचा हात सहीसलामत असलेला पाहून आपला नेम चुकला असावा असं त्याला वाटलं होतं आणि नेम चुकल्याचा आनंदही झाला होता. नंतर गौरीला या घटनेविषयी त्यानं विचारलं की आपली पाठ दाखवीत ती सांगायची, ''दगड इथं लागला होता. डोक्याला लागला असता म्हंजे छान झालं असतं. मग कुणाशी लग्न केलं असतं ?''

हे सर्व आठवून पूनमलाल गौरीविषयी कमी आणि लक्ष्मीविषयीच जास्त विचार करीत होता. गौरीच्या बाबतीत त्याला इतकंच वाटत होतं की दगड तिला न लागता लक्ष्मीला लागला होता ही गोष्ट तिने का लपवून ठेवली होती ? त्याला त्या काळची लक्ष्मी आठवली. त्यावेळी तिच्याकडे नुसतं पाहायचंदेखील धैर्य त्याच्यात नव्हतं, ते त्याला आठवलं. लक्ष्मीला जर हे कळतं तर ह्या मानिनीने काय केलं असतं ? तो कल्पना करू लागला. गौरी त्याच्या मनातून उतरली... अरेरे इतक्या सुंदर लक्ष्मीला मी दगड मारला होता... आणि मैलभर दूरवरच्या आपल्या घरात दिवा लावणाऱ्या चंपाची तर यावेळी त्याला पुसट आठवणसुद्धा राहिली नाही. तिच्या दिव्याच्या

प्रकाशात त्याला वाटेल तेव्हा घरी परतता येणार होतं... यावेळी तर तो याच विचारात गढला होता की मीच दगड मारला होता हे कसं सांगावं ? गोष्ट मामुली होती. पण मग महत्त्वपूर्ण तरी काय आहे ? जे काही आहे ते त्या घटनेतच आहे. ती घटनाही सामान्य नव्हती की ती वेळही !

"खोटं बोलता तुम्ही. दगड तिलाच लागला असेल. म्हणूनच ती रडली असेल." काही सुचेना तेव्हा तोंडाला येईल ते तो बोलून गेला.

"छे, छे. मला खोटं बोलून काय करायचंय ? पहा, अजून..." आणि लक्ष्मीने चोळीची बाही जरा वर करून कोपरावरची जखमेची खूण दाखवली. "पहा अजून ही खूण आहे."

"काही चिकटलं असेल. जखमेसारखं नाही दिसत..." कसलाही विचार न करताच पूनमलालने सांगून टाकलं.

अंधार वाढत चालला होता. पण गप्पांच्या नादात लक्ष्मीने अजून दिवा लावला नव्हता. पूनमलाल दारापाशी उभा होता. ती त्याच्यापाशी जाऊन म्हणाली, "पहा ना, मी का म्हणून खोटं बोलू ?" पूनमलालने तिच्यापाशी सरकत म्हटले, "कुठं काय आहे ? जखम नाही की काही नाही." लक्ष्मी कोपरा मागचा भाग दाखवायला एकहात दुमडून उभी होती. दुसऱ्या हाताने तिने चोळी वर धरली होती आणि असा आभास होत होता जणू शरीराबाहेरची एखादी वस्तूच तिने धरली असावी. जखम गोंजारण्यासाठी पूनमलालने प्रयत्नपूर्वक बोटं फिरवली आणि म्हटलं, "हो खरंच. जखम तर झाली होती." लक्ष्मीच्या संपूर्ण शरीराच्या अणूरेणूने ते शब्द ऐकले.

बाहेर गल्लीतून जाणाऱ्या म्हाताऱ्या रामीने अचानक हाक दिली "लक्ष्मी !" आणि मग जणू गडबडीत असल्यासारखी आत डोकावून न बघतच ती तिथून सटकली. अरे देवा !

वर्षानुवर्षे लक्ष्मी आपल्या आयुष्याचं रितेपण चंपाने भरून काढीत राहिली होती. जीवनाची अखेरची वर्षं तिनं चंपाच्या नवऱ्यानं भरून काढली. गौरीविषयी बोलण्यात तिने बराच वेळ घालवला होता. पण आता त्या गोष्टींच्या आधारे आणखी वेळ घालवणं शक्य नव्हतं. चंपाचा आधार खरा आणि दृढ होता. चंपाच्या नावानं, तिच्या विचारांनी ती आपलं जीवन परिपूर्ण राखायची. आणि आता ती आपल्या नावानं, आपल्या बाबतीत विचार केलेल्या गोष्टींनी आपलं जीवन परिप्लुत करू लागली. समाजाच्या प्रवाहात वाहता वाहता जसं रहावं लागतं तसंच रहायला, तिनं आपल्या मनाला शिकवलं होतं. कोणताही उद्देश नाही, मार्गावरून इकडे तिकडे होण्याची

व्याकुळता नाही. बस्, समाजाच्या मर्यादित परिघात फिरत रहायचं. समाजाची इच्छा होती किंवा सवय होती म्हणा, त्यासाठी लक्ष्मीला आपला बळी द्यावा लागला आणि छोट्या पोरीच्या पालनपोषणात गुंतून पडावं लागलं. असो. त्याच समाजानं तिला चंपाचा नवरा दिला आहे. ठीक आहे.

लक्ष्मीच्या डोळ्यांत नवी चमक आली. तिच्या पापण्या अर्धोन्मीलित राहू लागल्या. अदृश्य वायुलहरींनी हलणाऱ्या पानांसारखे ओठ थरथरू लागले. जणू आपल्या आत कसला तरी संघर्ष होत असावा. चेहऱ्यावर तजेला दिसू लागला. जणू चेहऱ्यावरच्या सुरकुत्यांच्या नदीला पाणी आलं होतं.

कुणीतरी म्हणालंदेखील, ''लेकीच्या सुखानं सुखी होणाऱ्या आया जगात फारच थोड्या असतील. लक्ष्मीचं स्वतःचं लग्न झालं त्यावेळी देखील ती इतकी आनंदी नव्हती जितकी आताशी असते.''

हे बोलणं थोडं अतिशयोक्तीसारखं होतं. थोडं यासाठी की कधी कधी असलं बोलणं ''अल्पोक्ती'' सारखं असण्याचीही शक्यता असते. समाजाने एखाद्या नववधूला पतीच्या मीलनासाठी जितके उल्हासपूर्ण स्वप्निल प्रसंग दिले आहेत तितके एखाद्या सासूला जावयाला भेटण्यासाठी कुठे दिले आहेत ?

चंपाला वाटत होतं, आई माझं लग्न करून मला विसरली. चंपाला भेटायला लक्ष्मी फारच कमी जायची. तिला वाटायचं, मला भेटायचं असेल त्यानं माझ्या दारी यावं आणि सामाजिक मर्यादेच्या व अधिकाराच्या बंधनात राहून त्याला भेटणं शक्य असेल तर मी भेटेन. चंपाला आश्चर्य वाटायचं की तिच्यासाठी जीव टाकणारी लक्ष्मी तिला अशी कशी अचानक विसरू लागली ?

बाळंतपणासाठी चंपाला माहेरी बोलवायला लक्ष्मी गेली तेव्हा चंपा आपल्या थकल्या डोळ्यांनी तिच्या तजेलदार चेहऱ्याकडे बघतच राहिली. जणू आईने तिचं सौंदर्य चोरून घेतलं असावं.

ठरलं की चंपा आज नव्हे तर पुढच्या सोमवारी माहेरी जाईल. पण मध्येच शनिवारी अचानक एक माणूस धावत पळत आला आणि त्याने लक्ष्मीला बातमी दिली की पूनमलाल एकाएकी आजारी पडला आहे. क्षणभरही वेळ न दवडता लक्ष्मी लगेच मुलीच्या घरी दाखल झाली आणि जावयाची सेवा सुश्रूषा करू लागली.

''चंपा बाळ, रडू नकोस. साधं दुखणं तर आहे. होईल लवकर बरं.'' आणि चंपाला औषध आणायला पाठवून लक्ष्मी स्वतः पूनमलालच्या उशाशी बसून त्याचं डोकं चेपू लागली.

पण दुखणं कमी होईना. सर्वजण रात्रंदिवस डोळ्याला डोळा न लावता पूनमलालच्या पलंगाच्या आजूबाजूला बसून होते.

तिसऱ्या दिवशी रात्री दुखणं विकोपाला गेलं, पूनमलालला बोलवत नव्हतं. चंपा पलंगाच्या एका कोपऱ्यावर बसून त्याचे पाय चेपीत होती.

''माकोरबाई, तशा काही तुम्ही हिच्या सासूबाई नाहीत... पण चंपा, मोठ्यासमोर थोडी आदब ठेवायला हवी. पलंगावर बसली नाहीस तर काय चालणार नाही ? असू दे आता. पुरे झालं. मी पाय चेपून देते.''

माकोरबाई शेकोटीसमोर बसून डुलक्या घेत होती. लक्ष्मीच्या बोलण्याने ती दचकून जागी झाली आणि चिंताकुल होऊन, दुखणं एकाएकी वाढलं तर नाही ना हे बघू लागली. चंपाने मनोमन लक्ष्मीला आणि माकोरबाईला कोट्यावधी वर्ष नरकावास भोगायचा शाप दिला आणि दीर्घ निःश्वास टाकला.

लक्ष्मी सतत रात्रंदिवस उशाशी बसून शुश्रूषा करीत होती. पूनमलाल कधी कधी डोळे उघडायचा आणि वेगवेगळ्या क्षणी एकाच चेहऱ्यात लक्ष्मीला आणि चंपाला पाहून त्याचा चेहरा प्रसन्नतेने फुलायचा. कधी चंपा येऊन पतीचं लक्ष वेधून घेण्यासाठी हळूच हाक मारू लागली किंवा काही बोलू लागली की लक्ष्मी लगेच पुढे सरसावून आजाऱ्याची शुश्रूषा करायचं आपलं कर्तव्य तत्परतेने पुरं करीत म्हणायची, ''नुकताच तर डोळा लागला आहे नि...'' आणि चंपाला दटावायची.

आईच्या या अमर्याद प्रेमाने चंपाचा जीव गुदमरू लागला. पाचवी रात्र भयंकर होती. बाहेरच्या दाट अंधारापासून तयार झाल्यासारखा एक यमदूत सर्वांच्या डोळ्यांत तरळत होता.

''चंपा, गंगाजळ आण बघू.''

''लवकर. सोन्याचा तो तुकडा आण.''

''कारटे, तुळस कुठाय ?''

आता कितीही शोधाशोध करा. सारे व्यर्थ. लक्ष्मीचं अवसानही संपलं. ती अशी खाली कोसळली जणू तिच्या कुडीतूनही प्राण निघून गेले असावेत. आता जिवंत रहायला तिला आधार तरी कोणता होता ?

जमलेल्या लोकांनी शव खाली घेतले.

लक्ष्मी दुसऱ्यांदा विधवा झाली.

''रडू नकोस चंपा. रडायला मी खूप आहे.''

''हो, हो, लक्ष्मी खरं बोलतेय. जाणारा तर गेला पण आता तुला संसार पुढे

रेटायचा असेल तर येणाऱ्या बाळाची काळजी कर.'' दुसऱ्या एका बाईने म्हटले.

''हो, जर मुलगा झाला तर सारं काही ठीक होईल. रडून रडून त्या येऊ घातलेल्या जिवाची हत्या नको करूस.'' तिसरीने तिच्या बोलण्याचं समर्थन केलं.

आणि अशाप्रकारे सर्वजण रोज चंपाचं सांत्वन करीत. तिला रडू देत नसत. लक्ष्मी रडतेय तर रडू देत. समाजानं लक्ष्मीला रडायचा अधिकार दिलेला असो वा नसो पण लक्ष्मीच्या नशिबात अश्रू गाळण्याखेरीज काय राहिलं होतं ? आणि आता आपल्या जीवनातील उणीव दुःखी लेकीने भरून काढायचा विचार करायचा म्हणजे उलट्या बाजूने आयुष्याचा श्रीगणेशा करण्यासारखं होतं. लक्ष्मी अश्रुपात करीत राहिली. खाणं, पिणं, विश्रांती, सारं काही संपलं.

''आपल्या देशात अशी आई लाभणं दुर्मिळ आहे.''

''चंपा नसती तर ती त्याच वेळी आपल्या पतीबरोबर मेली असती.''

''आणि जिवंत राहिली तरी मेल्यासारखीच.''

''ती फक्त मुलीसाठीच जगली. नाहीतर तिच्या आयुष्यात काय राम होता ?'' आणि चंपाच्या लग्नानंतर तर काही विचारू नका. इतकी आनंदी रहायची.

''साहजिकच होतं. चंपासाठीच तर तिनं आयुष्य वेचलं होतं.'' म्हणूनच तर चंपाचं दुःख बघायला ती कसली जगणार होती ? बरं झालं. देवानं वेळीच तिला बोलावून घेतलं.'' लक्ष्मी गेली. पण तिच्यासारखी दुसरी सापडणं विरळा.

लक्ष्मीची प्रशंसा करता करता लोकांच्या तोंडाला खळ पडत नव्हती. चंपा मुकाट्यानं हे सर्व ऐकायची आणि दुःखानं आतल्या आत पिचून जायची. लक्ष्मीनं स्वतःला आणि आपल्या आत्मीय जनांना दुःखी करूनही समाजाला अजिबात दुःख दिलं नव्हतं. चंपा हे बघायची आणि आपल्या आईच्या भोळ्या चातुर्याचं तिला आश्चर्य वाटायचं.

दोन महिन्यानंतर चंपाला मुलगी झाली. लोकांना ते आवडलं नाही. पण नंतर सर्वजण तोंडदेखलं बोलू लागले– ''पहिली बेटी-धनाची पेटी. मुलगी झाली म्हणून काय झालं ''

मुलगी मोठी होत गेली. आपल्या छोट्याशा आईला आनंदी वातावरणात ओढत गेली.

आणि चंपा, जणू आपल्या आईचा सूड घेण्यासाठी दुप्पट उत्साहाने आणि मायेने मुलीचं पालनपोषण करीत राहिली.

# हे घर आणि ते घर

□ जयंती दलाल

सांडशीनं धरलेली फोडणीची वाटी कशी काय निसटली कुणास ठाऊक आणि कढत तेलाची आमटीला फोडणी लागायच्या ऐवजी ते खाली जमिनीवर सांडलं. सविता थोडक्यात बचावली तरी एखादा शिंतोडा तिच्यावर उडालाच. पण तिचं तिकडं लक्ष नव्हतं. खणाणत दूर पडलेल्या वाटीच्या आवाजानं तिच्या अबोध स्मृतीतला दुसराच एक प्रसंग जागा केला...

पण ती होती स्टेनलेसची वाटी. जेवण वाढताना चमचा वाटीला लागला होता. त्यावेळी काय मधुर झणूकार झाला होता. वाटी नवी होती. भांडी नवी होती. आम्हीसुद्धा नवेच होतो नाही का ?

सवितेच्या मनानं तिला दटावलं– जुन्या स्मृतीचं असं रवंथ करीत बसलीस तर त्यात गोडी उरणार नाही. उलट काळजाचा दाह होईल. आणि काळजाचा दाह करून तरी काय उपयोग ?

पण... पण... ते सारं आठवतंच त्याला काय करायचं ? विसरून जा हे सांगणं किती सोपं आहे. दुसऱ्यांना उपदेश देण्याहूनही ते सोपं आहे. पण तसं करणं किती कठीण आहे. विसरायचं ? काय विसरायचं ? केव्हा विसरायचं ? किती विसरायचं ?

सवितेनं उठून वाटी पुन्हा सांडशीनं पकडली. पण मन पकडण्यासाठी, उंचबळणाऱ्या स्मृती पकडण्यासाठी कुठून काय आणायचं ?

त्या घरात...

हे शब्द मनात येताच साऱ्या शरीराला कंप सुटला. त्या घरात ! किती विचित्र गोष्ट आहे ! कॉलेजच्या दिवसांत प्राध्यापकांनी शिकवलेली व्यंजना इतकी मर्म भेदक आणि घातक असू शकते ? त्यावेळी हे घर ''ते'' होतं आणि आज ते घर ''हे'' झालं आहे.

विशाल, डेरेदार वृक्ष आपल्या शाखा प्रशाखा आणि पानांना आपले सौंदर्य आणि सौंदर्यापेक्षादेखील आपले खास रक्षक समजत असतो. पण निर्लज्ज वायू त्या पानांना

भेदून, एकेक फांदी गदगदून सरळ त्या झाडाच्या बुंध्याला धडक देतो. मंद किंवा जोरदार स्पंदन चेतवून वायू दुसऱ्या वृक्षाशी नेत्रपल्लवी करायला निघून जातो. पण सौंदर्य, नैसर्गिकता आणि संरक्षण सारं काही हरवून बसलेल्या बापड्या वृक्षानं काय करावं ?

सवितेलादेखील असंच वाटलं. मनरूपी माकड कुठं, केव्हा, कोणत्या फांदीवर झेप घेईल याची कुणाला कल्पना तरी येणं शक्य आहे का ? तिला विक्रमची आठवण झाली.

याच कुशीत त्यानं जन्म घेतलाय. वेळेच्या अगोदरच जन्मला होता. कुणालाही मायलेकाच्या जगण्याची आशा नव्हती पण दोघंही वाचले. आणि आज ? खुद्द विक्रमनेच पुलिन बरोबर रहायचे ठरवले. सख्या आईपासून दूर. नव्या आईपाशी. आणि वर म्हणतो कसा– "त्या घरी गेलो तर या घरी मला येता यायचं नाही. पण या घरात राहिलो तर त्या घरी जाता येईल. हो ना ?"

तो स्वार्थी आहे का ? अजून दहा वर्षांचा तर फक्त आहे. आणि पुलिन बरोबर संसार थाटल्याला सविताला पुरी बारा वर्ष...

सविता सर्वांगी थरारली. जणू वळवळणारी स्मृती तिला दग्ध करीत होती. का आठवतेय मी हे सारं ? अगोदरच काय कमी दाह झालाय की आता पुन्हा या विषारी नागाचा दंश आठवत बसलेय ?

पण मनावर माझा काय ताबा आहे ?

घर-संसार !

नाही, नाही, नाही. मला हे सर्व आठवायचं नाहीय. सारं काही संपलंय. ज्याला सुख समजले होते ते सारं संपुष्टात आलंय. राग आणि द्वेष, आनंद आणि वेदना, तृप्ती आणि इच्छा सारं काही संपलंय. मेघ आकाशाला भेडसावीत, त्याचा इंच न् इंच आच्छादून टाकतात. मनमानेल तसे पाणीही वर्षवतात, पण त्यानंतर आभाळाला स्वच्छ, निर्मळ, शून्य आणि कलंकहीन करून जातात. मेघांसारखी ही खेळाडू वृत्ती आयुष्यात कुठे असते ? जीवन संपूर्ण चेतनेला दाट काळ्या मेघांनी आच्छादून तर टाकतं, पण मेघांसारखं खुल्या दिलानं बरसून जाणं याला जमत नाही. एखादा थेंब टाकला की झालं ! बरसताना मुसळधार पावसासारखा वाटणाऱ्या थेंबाने तृप्त शुष्क धरतीची तहान भागविली जावी वा न जावो पण ढग मात्र तसेच दटावीत धमकावीत गडगडत राहतात. काळे आणि धूसर मेघ, साहस आणि धैर्य तोडून टाकणारे मेघ, चेतनेला अवरुद्ध करून टाकणारे मेघ, विवेक नाहीसा करणारे, शुद्धबुद्ध हरपून

टाकणारे मेघ...

त्यावेळी देखील आभाळ भरून आलेलं होतं. अडचणी तर तेव्हाही होत्या पण मन तरुण होतं. तारुण्याला शोभून दिसणाऱ्या प्रेमाची अब्रूदेखील होती. पुलिनचंदेखील माझ्यावर प्रेम होतं. सारं कसं प्रसन्न, हसरं वाटायचं. पुलिनच एकदा म्हणाला होता "ते बकुळीचं झाड पाहिलंस ? पानापानावर लाख लाख फुलं असतील. पण वाऱ्याच्या एका झुळुकीची ते वाट पहात आहे..." ... वाऱ्याची झुळुक ! दगडातही जीव ओतणाऱ्या जीवनाची, चेतनेची एक झुळुक...

पण तू हा जीवघेणा उपद्‌व्याप घेऊन का बसली आहेस ? व्यतीत झालेल्या सुखाचं स्मरण मधुर असतं– ही गोष्ट एखादा अडाणी, अनुभवहीन, आणि ज्याला शब्दांचा अर्थ माहीत नाही असा एखादा पोकळ पंडितच बोलू शकतो. ह्या अशा बाता एखादा गप्पिष्टच मारू शकतो. त्याला या कटु सत्याची जाणीव नसते की सुखाने आप्लावित झालेल्या एकेका स्मृतीत शेकडो काळ्या नागांच्या दंशाचं विष भरलेलं असतं.

संपलं ते सारं. दुर्लौकिक होऊन घरी बसलेला अधिकारी काय आपल्या घरच्या भिंतीवर आपल्या अधिकारकालाची चित्रं लटकावून ठेवतो ? तूदेखील मानहानी होऊन पदच्युत झाली आहेस आणि घरी बसली आहेस. पुलिनने तुला पदच्युत केलं आहे. तुझ्यावरचं त्याचं प्रेम संपलं. लाख लाख फुलं फुलवणारी फांदी जशीच्या तशी राहिली. पण वाऱ्यांची झुळुक काही आली नाही. ती तर अन्य वृक्षाच्या फांद्या झुलवायला त्याची फुलं फुलवायला निघून गेली.

आणि कितीही आवर घातला तरी सवितेच्या मनात तो प्रसंग उभा राहिलाच काळ्या मेघांच्यामध्ये बारीकशी विद्युत् रेखा चमकावी तसा.

पण मनीच्या एकान्तातच त्याला आठवू काय ? विक्रमच्या जन्माच्या अगोदरची गोष्ट आहे. वेडे, जन्माच्या अगोदरची गोष्ट सांगून मुख्य गोष्ट टाळत आहेस ? त्याच वेळी, त्या वेळची तर गोष्ट आहे, नाही ? विक्रम तेव्हा पोटात होता. धड कपडेदेखील घालता येत नव्हते... विसरून जा, साफ विसरून जा !

हो, त्यावेळी पुलिन मला बिजली म्हणायचा. आणि बिजली म्हणता म्हणता, "बीजी"* म्हणू लागला होता.

बिजली ! नाही, नाही, दुसरी ! दुसरी !!

पण त्यावेळी पुलिन पुरे वीस दिवस घरात नव्हता, बाहेर गेलेला होता आणि मग मुसळधार पाऊस पडू लागला होता. नद्यानाले दुथडी भरून वाहू लागले होते. पुल

* बीजी– गुजरातीत याचे दोन अर्थ आहेत. एक वीज आणि दुसरा "दुसरी"

मोडले होते. घरं कोसळली होती, गाड्यांचं धावणं थांबलं होतं. पण तो सहीसलामत परतून घरी आला होता. त्याच रात्री त्याने मला बिजली म्हटलं होतं. बहुतेक मी पहिल्याच क्षणी ओळखलं होतं– नव्हे, मला विश्वास वाटू लागला होता. आणि मी पुलिनला सांगितलंही होतं. पण त्याला धुंदी चढलेली होती. तो म्हणाला होता– "जे काही आहे, ठीक आहे." आणखी काही ऐकायची गरजच त्याला कुठं होती म्हणाला होता– "दुसरी एखादी असली तरी अडचण कसली आहे ?"

"आयुष्याच्या अखेरच्या क्षणी तुम्ही कसली इच्छा कराल ?" मी विचारलं होतं आणि त्यानं माझ्या ओठांवर ओठ ठेवीत किती खोटं, चुकीचं आणि कपटी उत्तर दिलं होतं,– "हे." आणि त्यावेळी मला हे आवडलंही होतं.

दुष्ट होता पुलिन !

फोडणीची वाटी सवितेच्या हातातच राहिली होती. लक्ष गेलं तशी तिनं ती वाटी ठेवून दिली. पुन्हा विचारात दंग झाली. त्याच त्या गोष्टी. तेच ते शब्द. केव्हा स्वैपाक केला, केव्हा ताट वाढून घेतलं, केव्हा जेवायला बसली तिला समजलंच नाही.

सारं काही असंच होतं नाही ? जीवन असंच असतं. काय शिजवलं ? केव्हा शिजवलं ? सोड ही गोष्ट...

पुलिन खोटारडा होता. ढोंगी, लबाड, लुच्चा ! भुंग्याची जात ! त्याचा धंदाच फसवण्याचा होता.

"हे सर्व काय करताय तुम्ही ?" मी विचारलं होतं.

"काय ? काय करतोय मी ?"

"मनीषा कोण आहे ?"

"कोण मनीषा ?"

"सरळ उत्तर नाही देणार ?"

"पण सरळपणे विचार तर खरं !"

"सरळच विचारतेय.कोण आहे ही मनीषा ? तिचा तुमच्याशी काय संबंध ?"

"तुला काय वाटतं ?"

सवितेच्या तोंडून शब्द फुटला नाही. काय बोलणार ? म्हणून पुलिनला जोर चढला, "बोल ना, तुला काय वाटतं ? वेडी कुठली. माझी मनीषा ही काय माझ्यासमोर बसली आहे. आणि गावच्या मनीषाचं मला काय करायचं आहे ?"

आज उत्तर द्यायचं असतं तर सांगितलं असतं, "घरात ठेवायची आहे." पण त्यावेळी ? त्यावेळी पुलिनने माझी हनुवटी धरून, डोळ्याला डोळा भिडवून

माझ्याकडं पाहिलं होतं आणि त्याचवेळी विक्रम धावत आत आला होता. डोळे विस्फारून तो बघतच राहिला. मग म्हणाला, "बाबा, तुम्हीदेखील सिनेमा पाहून आलात काय ? सिनेमात असंच दाखतात. तो दीनदयाल आहे ना, तो मालतीदेवीची हनुवटी अशीच धरतो..."

दीनदयाल आणि मालतीदेवी ! हूं !

"सविता, मला काही सांगायचंय तुला !"

जवळजवळ वर्षभर अबोला राहिल्यानंतर पुलिन मला म्हणाला. मी म्हटलं– "सांगा."

"हे असं जगायच्या ऐवजी आपण वेगळं व्हावं हे उत्तम असं नाही का तुला वाटत ?"

"तुम्हाला जर हेच योग्य वाटत असेल तर माझी काही हरकत नाही." मी म्हटलं होतं. खरं बोलले ना ? स्वतःचीच फसवणूक करण्यात काय हशील ?

आणि पुलिन म्हणाला, "तुला जे घर पसंत असेल त्यात रहा. वाटल्यास हे घर नाहीतर ते घर घे.

मला पसंत असेल ते घर ! घर ! थंडीवारा, ऊन, पाऊस यांच्यापासून निवारा देणारं घर !

"पण हे काय ठीक राहील ?" ही, आक्रंदन करणाऱ्या मनाने मी विचारलं होतं माझ्याकडून काय अपराध घडला होता ? काय चूक होती माझी ? माझं मन विचलित झालं होतं का ? मी कुणाकडं कधी मान वर करून पाहिलं तरी होतं का ? हिरे मोती का मी मागितले होते ? हट्ट धरला होता ? त्यानं उत्तर तरी द्यायचं होतं.

पण त्याने अगदी निष्ठुरपणे उत्तर दिलं, "सविता, माझं मन उडालंय."

मन उडालंय म्हणजे ? दुसरीकडे लागलंय हेच ना ? पण का ? माझ्यात कसली उणीव होती ?

"बोल, कोणतं घर घेणार तू ?"

"मी हे वाडे पाहून का इथं आले होते ? दगडधोंडे, विटा-चुना, दारं खिडक्या पाहिल्या होत्या मी ?"

"रोख रक्कम आणि दागिने जे काही जितकं हवं असेल तितकं घेऊन जा."

"आणि विक्रम ?" माझ्या तोंडून शब्द निसटले.

"त्यालाच विचार. त्याची मर्जी असेल तसं."

"तुमची काय इच्छा आहे ?"

"कशाबाबत विचारतेस ?"

"मला वेगळं करून..."

"हो. तुला सांगितलेलंच बरं ! मी मनीषाच्या बरोबर..."

"पुरे, पुरे झालं. पुढं नका बोलू, हलकट, नीच, निर्लज्ज !"

विक्रमला जवळ बोलावून आम्ही विचारलं. आम्हा दोघांच्या चर्चेत तिसरा कुणी आला असेल तर तो फक्त विक्रम. पण तो तरी काय बिलंदर ! मलाच विचारतो– "तू कुठं रहाणार आहेस ?"

"बघ. हे इथं रहाणार असतील तर मी दुसऱ्या घरात राहीन." हे ! हे ! हे ! "पण तू या घरात राहिलीस आणि मीदेखील याच घरात राहिलो तर मग मला त्या घरी जाता येणार नाही ना ?"

"नाही. नाही जाता येणार. मी जाऊ देणार नाही. का म्हणून तू बेशरम होऊन त्या घरी जाशील ? लाजलज्जा नसेना का पण माझी अशी फसवणूक करून जाणाऱ्याकडे..."

"पण आई, मी जर त्या घरी राहिलो तर मात्र या घरी तुझ्याकडे येऊ शकतो ना ?"

नव्हतं, माझ्यापाशी याचं काही उत्तर नव्हतं. चक्रीवात धुळीला बगळ्यासारख्या गोल गोल आकारात उंच उडवून नेतो. खूप खूप उंच नेतो. पण त्याच्या आत मात्र पोकळीच असते ना !

मी याच घरात राहिले आणि ते त्या घरी. दागदागिने, घर, रोख रक्कम...

सांगितलं तिथं सही केली. मनात इतका राग होता की अंगाची लाहीलाही होत होती. नालायक, दुष्ट, ढोंगी, बेशरम, निर्लज्ज, आणि कसा मागं मागं हिंडत असतो. विक्रम सांगत होता की...

पण तू का हे सारं आठवत बसली आहेस ? तू त्याच्या मनातून उतरलीस, संपली कथा. सारा खेळ खलास झाला. तुझ्याबाबतीत याहून दुसरं काय होणार होतं ? निष्फळ क्रोध. सर्वांनी किती मनाई केली होती. पण त्यावेळी तू या काळतोंड्यावर इतकी लुब्ध झाली होतीस की आईवडील बहीणभाऊ सर्वांना सोडून याच्या मागे पळून आलीस आणि याच्याशी लग्न लावलंस. आज तोच सुंदर छेलछबिला तुला भर प्रवाहात एकटी सोडून दुसऱ्या फांदीवर जाऊन बसला आहे. हेच होतं त्याचं प्रेम ? आणि ती मनीषा काय तुझ्यापेक्षा जास्त देखणी आहे ? जास्त गोरीगोमटी आहे ? किती बेडौल तर आहे. हं. तडतड बोलणं आणि दुसऱ्यांच्या जिव्हारी घाव घालणं

हे मात्र तिला छान जमतं. डोंबारीण आहे मेली...

बाहेरून हाक आली– "आऽऽई."

विक्रम होता.

"खेळायला चालली होतो पण तहान लागली म्हणून मनूला म्हटलं की या घरी पाणी पिऊन येतो."

त्यानं माझ्याकडे पाहिलं नाही की मी दिलेलं काही खाल्लं नाही. बस् स्वतःच पाणी घेऊन प्यायला आणि निघून गेला.

या विक्रमला "हे घर" आणि 'ते घर" करू नकोस म्हणून समजावून नाही का सांगता येणार ?

पण मुलाला तरी कुठं काय वाटतंय ? त्याला जर मनापासून काही वाटत असतं, त्याच्या आईवर जर त्याचं खरं प्रेम असतं तर...

किती निष्ठुर झाली आहेस तू ! मुलाच्या बाबतीतदेखील कसकसले विचार करायला लागली आहेस ? मुलगा परका झाला हेच तू म्हणत असतेस ना !

संथ सरळ वाहणाऱ्या नदीच्या पाण्यावर धरण बांधायची गोष्ट सगळेच जण करतात. आक्राळ विक्राळ लाटा उंचबळणाऱ्या पुराच्या पाण्यावर धरण बांधायची गोष्ट का कुणी बोलत नाही ?

तो तुझा मुलगा आहे. तुझ्या हाडामासानं त्याचा देह घडविला आहे. तुझ्या रक्ताचं त्याचं रक्त...

परत ये, मना, अजून परत ये !

मनात जर विचारच आले नाहीत तर किती बरं होईल ! हे शब्द ! शब्दांनो तुम्ही कृपा करून विचारांना आकार द्यायचं सोडून द्या, सोडून द्या.

पण तू दुसऱ्यांना का म्हणून ही विनंती करतेस ? तुला तुझ्या अधिकारांविषयी गाऱ्हाणं नाही मांडायचं ? दुसऱ्यांच्या पायांवर पडायचंय ? अधिकार ! नाही. नाही. मी अधिकाराविषयी नाही बोलत. अधिकारासाठी झगडण्याचा अवाक्षरानं उल्लेख करीत नाही. माझं आयुष्य असं खरेदीविक्रीसाठी बाजारात मांडायची माझी इच्छा नाही.

पुलिनवर तुझा राग आहे. पण त्याने तुझ्या मनीचे मनोरे उद्ध्वस्त केले तेवढ्यानेच का तो ठक ठरला ?

कसले भयंकर विचार करतेस तू सविता ? ज्यानं तुझं सोन्यासारखं आयुष्य धुळीला मिळवलं त्याला तू ठक, बदमाष नाही म्हणणार तर काय म्हणणार ?

पण तू त्याला... मी म्हटलं नव्हतं ? तू त्याला काय नाही दिलंस ? मी आज तू या देवाण-घेवाणीचा काय विचार करू लागली आहेस ? आयुष्यात कोण कोणाला काय देतं आणि काय मिळवतं ?

का ? माझं यौवन, माझं स्त्रीत्व, माझं मन, माझं शरीर, माझं सर्वस्व, माझ संपूर्ण जीवन...

दिलं ! तू सारं काही दिलंस. विचारपूर्वक दिलंस. अंतःकरणापासून दिलस. कसलाही आडपडदा न ठेवता दिलंस. ते सर्व दिलं म्हणून आज तुला वाईट वाटतं ? वेडाबाई, मनीच्या एकान्तात तरी मान्य कर. पूर्वीचं सारं काही आठव... तो, पहिल्या नजरभेटीचा क्षण ! एकाएकी तुला कसं वाटू लागलं होतं ! जणू नसानसातून वीज सळसळत गेली होती. अंगावर कसा रोमांच फुलला होता. किती व्याकुळ तू– जणू देह आणि चित्त सर्वांवर एक ताणलेली प्रत्यंचा चढविली गेली होती. तो थोडीच तुला सांगायला आला होता ? त्यानं सांगायच्या अगोदर तूच तर...

नाही. मी त्याला फसव्या म्हणणार नाही. निर्लज्ज म्हणणार नाही. तो माझ्या बाळाचा पिता आहे. मी मनापासून त्याचा स्वीकार केला आहे. त्याला धूर्त म्हणणार नाही. दुष्ट म्हणणार नाही.

आता वठणीवर आलीस ना ? म्हण हो, हो म्हण. आता तुझी सुटका नाही. आणि साऱ्या जगापासून कुठवर पळ काढणार ? सर्वांच्या डोळ्यांत धूळ फेकता येईल तुला ? मग तू स्वतःचं काय करशील ? तिथं कोणता अडसर घालशील ? तिथं कसली लपवाछपवी करशील ? तिथं कसलं गुपित ठेवशील ?

तुझं त्याच्यावर प्रेम आहे. तुझ्या मनाच्या अणूरेणूत तुझा तो प्रियतम सामावलेला आहे. तू त्याला विसरलेली नाहीस सविता ! अग, त्याची, नखं, दात... इतकंच नव्हे, त्याची प्रत्येक बारीकसारीक गोष्टही तुला आवडते, कंजूष माणसाच्या संपत्तीसारखं तू त्याला हृदय संपुष्टात जतन करून ठेवले आहेस. तो तुझा जिवलग आहे. तुझ्या तनमनाचा धनी आहे. आजही, या क्षणीसुद्धा तो तुझ्या हृदयाचा स्वामी आहे.

तो स्वामी, आणि तू ? फक्त पत्नी फेकून देणाऱ्या लायकीची बाहुली ? चोखून घेतलेली चोयटी ? आळीतला एक बोळ ?

तुला काही स्वाभिमान आहे की नाही ?

पण तुझा स्वाभिमान तर तू दाखवून दिलास. स्वाभिमानाच्या जोडीला आपली कुलीनता पण दाखविलीस. त्याचा अपमान करण्याचा विचारसुद्धा तुझ्या मनाला शिवला नाही. मध्यस्थीसाठी कुणा तिसऱ्या व्यक्तीला आपल्यात शिरकाव करू दिला

नाहीस. हे काय कमी झालं ? बरं वाटलं ना ? किती चांगली गोष्ट आहे. तुझंही नाही नि माझंही नाही. चला संपली कहाणी.

आणि त्यानेदेखील...

तुझा न्याय करायला आलेय बाई, म्हणून जरा दुसरीकडेदेखील बघ ! त्यानंच तुला हे घर दिलं. पैसा दिला. दागिने दिले. आयुष्यभरच्या सुखसोयी उपलब्ध करून दिल्या.

पण यात त्याने कसले उपकार केलेत ? मीसुद्धा त्याच्यावरून सर्वस्व ओवाळून टाकलं होतं. त्याला सुख दिलं होतं. त्याच्यासाठी काय नाही केलं मी ? फार काय त्याला विक्रमसुद्धा दिला.

स्वतःशीच संघर्ष करता करता सविता स्तब्ध झाली. तिच्या मनात शिरून चंदेरी शब्दांत भिजलेला युक्तिवाद करणारा दुसरा कुणीदेखील निःशब्द झाला. मी त्याला विक्रम दिला आणि त्यानं मला घर दिलं. पैसा अडका दिला. दागदागिने दिले. त्यानं हे सारं दिलं आणि मी मुकाट्यानं घेतलं.

तर मग माझं असं काय ? मी कोण आहे ?

त्याच्या मुलाची आई !

त्याच्या मुलाची आई होण्याच्या मोबदल्यात... हे घर ! सोन्या चांदीची गोल गोल नाणी ! रत्नजडित आणि हिऱ्यामोत्यांचे आभूषण ! पाणी पिऊन लगेच पळाला माझा विक्रम !

हे सर्व घेऊन मी काय दाखवून दिलं ?

पुलिनला मी पती मानलं होतं. त्याचं पत्नीपद भूषवून मी धन्य झाले होते. त्याच्या मुलाची आई होताना मला अपार आनंद झाला होता. जे काही माझ्यापाशी होतं, माझं म्हणण्यासारखं होतं, ते सर्व प्रेमपूर्वक त्याच्या चरणी अर्पण करताना मी स्वतःला कृतार्थ समजले होते. आणि अग वेडे, मनाशी हितगुज करताना तरी तू हे सर्व हसत हसत केल्याचं आणि अजूनही तुझं त्याच्यावर प्रेम असल्याचं मान्य कर. इतकं सर्व घडूनही तोच तुझा स्वामी आहे. आज, या क्षणी जरी तो म्हणाला तरी... विक्रम ! दुसरा विक्रम !

कोणत्या प्रेरणेने कुणास ठाऊक सवितेने डोकं वर उचललं. आगळीच धुंदी चढली होती. असंख्य विषारी नागांच्या दंशांनी हृदयाला कुरतडत, खात, मनात लपून बसलेल्या दुसऱ्या सवितेची केलेली कानउघाडणीदेखील जणू या सवितेसाठी व्यर्थ ठरली होती. ओठातून शब्द उमटले,

"पण मला असं झिडकारून टाकणारा..."

शब्द तिथेच थिजून गेले. दुसऱ्या सवितेने मर्मभेदक उत्तर दिलं– "दयेची भीक मागतेस ? निराधार, असहाय्य होऊनच जगत राहणार आहेस ? अशा जगण्यापेक्षा मेलेलं काय वाईट ? वरून स्वाभिमानाच्या बाता मारतेस ?"

सविता दचकली. दोन्ही हातांच्या ओंजळीत तिनं तोंड लपवलं, जणू स्वतःपासूनच लपवू इच्छित होती. गळ्यात दाटून आलेले आसू मागे लोटण्याचा प्रयत्न केला पण ते तर बाहेरच ओघळलेच. तिचं लक्ष नव्हतं. पण तळहात भिजून चिंब झाले तेव्हा आपल्या डोळ्यांना पूर आल्याच तिला जाणवलं. ती कर्तव्यविमूढ झाली होती. बुद्धी जणू बर्फासारखी थंडगार होऊन निपचित पडली होती. काहीसुद्धा सुचत नव्हतं.

यंत्रवत तिने करंगळीने डोळ्यांतील अश्रुबिंदू टिपून काढले. हाताच्या बोटावरच टिकून राहण्याची कसरत करणाऱ्या एका अश्रुबिंदूला अंगठ्याच्या मदतीने तिने दूर भिरकावून दिलं. सुकणाऱ्या अश्रूला ती डबडबलेल्या डोळ्यांनी बघत राहिली. एक अश्रू ! आणि मग तर अश्रूंचा प्रचंड लोट... अश्रूंना स्वाभिमानच नसतो. का ?

सविताला काहीच उमजेना. आपल्या अंतर्गत चाललेल्या त्या भीषण युद्धाकडे ती तटस्थ दर्शकासारखी पाहात होती. कुणीही तिच्या कह्यात नव्हतं. खरोखरच ती अतिशय केविलवाणी झाली होती. मनावरचा ताबा सुटला होता– शुद्धबुद्ध, अक्कलभान सारं काही लुळं पांगळं झालं होतं. त्यांचा बोलविता धनी वेगळाच असल्यासारखं झालं होतं आणि ती स्वतः कोलमडू लागली होती. तिचा कणन्‌कण इतस्ततः विखुरला जात होता...

भानावर येताच पुन्हा तीच ओली जखम...

मी विक्रमची आई बनले. मी हे घेतलं. मागून घेतलं. धनदौलत आणि दागदागिने घेतले. बाई, तू सौदा केलास. तुझी किंमत वसूल करून घेतली. दुसऱ्या जणी बाजारबसव्या असतात; तू संसार थाटून राहिलीस. वा, काय ढोंग आहे ! काय दंभ आहे ! पोट जाळता येत नसेल तर ते फाडून टाक. आणि वर दयेची भीक मागायला निघाली आहेस ! निर्लज्ज, बेशरम, ढोंगी ! पुलिनला बदनाम करून...

नाही. मी त्याला बदनाम करायचा मुळीच प्रयत्न केला नाही. कुणाच्याही दयेवर जगायची माझी इच्छा नाही. अजून तर हातपाय धडधाकट आहेत. ज्या दिवशी यांच्यात त्राण उरणार नाही त्या दिवशी या जीवनाचा ही अंत करून टाकीन. मला कोण अडवणार ?... तर काय तुला अडवणारं कुणी हवंय ? छे, छे, तुला तर असं कुणी हवंय जो आत्महत्येच्या प्रसंगी तुझं छायाचित्र घेईल.

सविता...

सविता भानावर आली त्यावेळी ती एका छोट्याशा पेटीत सगळे दागिने भरत होती. सर्व दागिने भरून झाल्यावर बँकेचं नवं चेकबुकदेखील तिनं त्यात टाकलं. मात्र त्या अगोदर कोऱ्या चेकवर स्वतःची सही करायला ती विसरली नाही. नेसत्या वस्त्रानिशी ती घराबाहेर पडली. घराला कुलूप लावून त्याची किल्लीदेखील त्या पेटीत ठेवली आणि पेटी घेऊन दुसऱ्या घराकडे चालू लागली... हे घर आणि ती रक्कम, ज्याच्यामुळे तिनं स्वतःला हीन आणि बाजारू लेखण्याचा सौदा केला होता, ती परत द्यायला निघाली. पायऱ्या उतरून ती घाईघाईने चालू लागली.

# ध्वनी आणि प्रकाश

□ जयंत खत्री

अखेर पायात चपला सरकवता सरकवता त्यानं मनाशी ठरवून टाकलं व तो बाहेर पडला. खोलीचं दार ओलांडताना त्याला वाटलं की काही तरी होईल. पण काही झालं नाही. उघडलेलं दार तसंच राहिलं. जिन्यावर येऊन त्यानं मागं वळून पाहिलं आणि त्याचा चेहेरा विकृत झाला. तो जिना उतरून खाली आला.

बाहेरच्या दिंडी दरवाजापाशी पोचून त्यानं दीर्घ श्वास घेतला आणि तो ताळ्यावर आला. दाराबाहेर एका जुन्या खाटेवर बसलेल्या म्हाताऱ्या पठाणाची नजर चुकवून तो चालू लागला.

गल्ली जरा लांबलचक होती. दोहो बाजूंना उंच, कृश, घाणेरडी, आजारी, हाडांच्या सापळ्यासारखी घरं दाटीदाटीनं, एकमेकांचा गळा दाबीत असल्यासारखी उभी होती. या घरांच्या खिडक्यांशी टक्कर घेणाऱ्या हवेत धुळीला उडवून लावायचं त्राण नव्हतं. या खिडक्यांच्या वाटेने छोट्या छोट्या खोल्या प्रकाशानं उजळून टाकणाऱ्या उन्हात ऊबही नसायची. दिवसा दमटपणा आणि घाण. रात्री ढेकणं आणि डास. रोगट तन आणि मन घेऊन या इमारतींमध्ये राहणाऱ्या लोकांचं जीवन बेपर्वाईनं पुढं सरकत होतं. जीवन तर होतंच, पण जीवनाच्या प्रतीकरूपात फक्त गती होती आणि गतीच्या प्रतीकरूपात फक्त ध्वनी होते.

आणि ध्वनी तरी कसले ?

या गल्लीत रात्र असो नाही तर दिवस– सारखा, रात्री उशिरापर्यंत, पहाटे– कुठं तरी कुणाचा तरी ग्रामोफोन सारखा वाजत असायचा. कुणाचं न कुणाचं भांडण जुंपलेलं असायचं. पोरं कुठं न कुठं रडत असायची. पोरं उगी झाली तर त्यांच्या आया रडायच्या आणि मायलेक सर्व झोपी गेले तर त्यांचे वडील झोपेत बडबडायचे... दगडी पाटावर सतत चोवीस तास नळाचं पाणी वाहात राहायचं. मध्यरात्रीदेखील मळके कपडे आपटून आपटून धुतले जायचे. आणि भांड्यांचा आवाज होत राहायचा. हे सर्व ध्वनी थांबून कधी शांतता झालीच तर डासांची गुणगुण, पालीची चुकचुक आणि उंदराची चू चू यांच्या जोडीला अपष्ट निःश्वास आणि वेदनायुक्त

सीत्कार, ऐकायची इच्छा नसूनही कानावर यायचे.

पण आज त्याचं मन या आवाजांच्या दुनियेला विटलं होतं. त्याला त्याचा तिरस्कार वाटू लागला होता. त्यानं पावलांचा वेग वाढवला. गल्लीच्या टोकाशी पोचून त्यानं मागं पाहिलं. सर्व इमारतींच्या खुल्या खिडक्या बेधडक दृष्टीनं त्याच्याकडं एकटक पहात होत्या. त्या दृष्टिपासून बचावण्यासाठी तो हळूहळू धावू लागला. बाहेर हमरस्त्यावर लकाकणाऱ्या प्रकाशानं त्याचं स्वागत केलं.

त्याच्या धोतराच्या सोग्यात हवा शिरली. हवा त्याच्या चापूनचोपून बसवलेल्या केसांशी खेळू लागली. हाफकोटच्या दोन्हीकडच्या खिशांत त्याने हात घातले. त्याच्या कृश शरीराची छाती उल्हासाने फुगली. त्याची मान ताठ झाली.

संथ गतीनं तो चालत राहिला. कुठं जात होता ते त्याचं त्यालाच माहीत नव्हतं. तो तर फक्त आवाजाच्या दुनियेतून प्रकाशाच्या दुनियेत निघून आला होता. बाहेर येताच प्रकाशाची धुंदी त्याच्या रोमरोमात भिनली.

थोड्या वेळानं तर तो स्वतःचं अस्तित्त्वच विसरला. आपल्या आजूबाजूला वर खाली भडकलेल्या जीवनाच्या आगीत त्याचं भान हरपलं. डाव्या-उजव्या बाजूला मस्तक हलवीत तो चालत राहिला.

बाह्य उजेडानं त्याच्या अंतरीचा अंधःकार थोड्या वेळापुरता झाकून टाकला. बाहेरच्या जगावर गौरवाची पुटं चढवणारी कल्पनादेखील जिरल्यासारखी झाली. मानवतेने व्याकुळ होण्यासाठी, कंटाळून जाण्यासाठी सदोदित तयार रहाणाऱ्या भावनादेखील समाधिस्थ झाल्या. प्रकाशाच्या वशीभूत होऊन तो निव्वळ पशू उरला. खिशांतून त्याचे हात बाहेर निघाले नाहीत. धोतराच्या निऱ्यांत आणि विस्कटलेल्या केसांत वारा आणि प्रकाश दोघांचा खेळ चालला होता. आणि तो प्रकाशाच्या एका बिंदूकडून दुसऱ्या बिंदूकडे नजर टाकीत चालला होता.

प्रकाशाची चित्रविचित्र दुनिया विस्तारू लागली. सिनेमाच्या लखलखणाऱ्या असंख्य दिव्यांच्या खालीदेखील भेळवाल्यांच्या हाऱ्यांवर घासलेटच्या चिमण्या लुकलुकत होत्या. दीड डझन दिवे असलेल्या इराण्याच्या हॉटेलात, भगभगत्या प्रकाशात कुणीतरी हॉटेलच्या पोऱ्याच्या पाठीत लाथ घालीत ओरडलं, "दिसत नाही वाटतं ? सुव्वरका बच्चा !"

थोडं दूर, दिपवूनं टाकणाऱ्या प्रकाशाचे दोन मोठमोठाले डोळे उघडून येणाऱ्या मोटार-गाडीने "डबल ब्रेक" लावले. एक आंधळा भिकारी रस्ता ओलांडत होता.

तो चालतच राहिला.

थोड्या अंतरावर, उजव्या बाजूला गुलमोहोराच्या झाडीत नगरपालिकेची एक बत्ती विझून गेली होती. त्या अंधारात एक कुरूपशी बाई देखणेपणाचं ढोंग करीत उभी होती आणि अंधारामुळं तिचा ढोंग खपूनही जात असल्यासारखं वाटत होतं. अखेर कुणा गिऱ्हाइकानं तिचा हात धरलाच. हे बघून जरा दूर उभ्या राहिलेल्या बग्गीवाल्यानं घोड्याचं लक्ष तिकडं वळवलं. घोडा खिंकाळला. गिऱ्हाईक खाकरले. बाईनं मुरका मारला.

त्याची चाल मंदावली. आणि ओठांवर एक ओंगळ हसू रेंगाळू लागलं. त्याच गुलमोहोर खालच्या विजेच्या खांबाला टेकून तो उभा राहिला आणि त्यानं सिगारेट पेटवली. पेटलेल्या काडीच्या मागे त्याच्या डोळ्यांसमोर थोडा वेळ सारं काही अंधारात दडून गेलं. त्यानं मोठ्या नखऱ्यानं काडी विझवून खाली फेकून दिली. त्याच्या पशू मनात एक अभिलाषा निर्माण झाली. तो हसला. आणि ते हास्य जनावराच्या हास्यासारखं विमुक्त आणि हिडीस होऊन बाहेर पडलं. रस्त्यावरचे दिवे त्याच्या डोळ्यांत लपून गेले.

शेजारच्या गल्लीत शिरायच्या अगोदर त्यानं पान खाऊन आपले ओठ रंगवले. मन तर एका मालवलेल्या दिव्याच्या कल्पनेने अगोदरच रंगलं होतं.

त्या गल्लीतला उजेड भयंकर होता. भयंकर होता आणि ही गोष्ट त्याला माहीत होती. तरीदेखील तो थांबला नाही. उंच इमारती उजळून निघत होत्या. प्रत्येक खिडकी-खिडकीवर लाल, निळे, पिवळे दिवे तऱ्हेतऱ्हेच्या रंगीबेरंगी टोप्या घालून मोठ्या दिमाखानं झुलत होते. या गल्लीतल्या दुनियेला रात्रीच्या प्रकाशाखेरीज कशाचीही पर्वा नव्हती– इतर कुठल्याही गोष्टीची काही किंमत नव्हती. प्रत्येक खिडकीत बाया उभ्या होत्या. नग्न दिसण्यासाठीच त्या वस्त्रं नेसल्या होत्या. आणि प्रकाशाची फुलं होण्यासाठी त्या प्रकाश लुटत होत्या.

इथे विजेच्या प्रकाशानंच डोळे उघडत होते. तो प्रकाश मालवला की डोळेही मिटत होते– आणि त्यानंतरच या गल्लीच्या बाहेर सूर्य उगवत असे.

त्याची नजर धाव घेऊ लागली. गावच्या या भागात इतक्या सुंदर स्त्रिया आहेत ? त्या 'सुंदरी'च तर होत्या. एकेक खिडकीत चार चार. कुणी केसांत फुलं माळली होती, कुणाच्या तोंडात सिगारेट होती तर कुणी पान चघळत होती– पण सर्वजणी एकजात रंगलेल्या होत्या. या दुसऱ्यांच्या गालावर...

अचानक त्याची कुणाची तरी टक्कर झाली.

"डोळे फुटले वाटतं ?"

आणखी कुणाशी टक्कर होऊ नये या प्रयत्नात एका कुत्र्याच्या शेपटीवर त्याचा पाय पडला. त्याच्या केकाटण्यावरून लक्ष काढलं तर तेवढ्यात कथलाच्या बांगड्या घातलेला एक कृश हात त्याच्यासमोर भीक मागायला आला. त्यानं आपली चालायची गती वाढवायचा प्रयत्न केला. पण इथं तर ध्वनी आणि प्रकाश दोहोंत विलक्षण वेग होता. आणि त्या वेगाशी स्पर्धा करण्याचं सामर्थ्य आता त्याच्यात उरलं नव्हतं. पाय फरफटत तो चालू लागला.

त्याचं कपाळ घामानं डबडबलं. पायपथावर तशी काही विशेष गर्दी नव्हती. पण इथं प्रत्येकजण मन मानेल तसा चालत होता. कुणीही बाजूला सरकून कुणाला वाट करून देत नव्हतं. त्याचे डोळे पहिल्या मजल्यावरून चौथ्या मजल्यापर्यंत चढउतार करीत होते.

कुणीतरी त्याच्या खांद्याला धक्का देऊन निघून गेले. त्यानं मागं वळून पाहिलं. एक 'सुंदरी' बसच्या थांब्याच्या खांबाला टेकून उभी होती आणि मोठ्या नखऱ्यानं त्याच्याकडं बघून हसत होती. त्याच्या चेहऱ्यावर क्षीण हसू झळकलं. आणि मावळलं. पुढं जाता जाता त्यानं आपला बेत बदलला. तो मागं वळला. पण पुरा पायपथ अडवून एकमेकांच्या अंगावर रेलत समोरून येणाऱ्या तीन लाल टोपीवाल्यांना पाहताच कोटाच्या खिशात त्याच्या मुठी आवळल्या गेल्या. तो उभा राहिला. तेवढ्यात एक सायकलवाला त्याच्यापाशी येऊन थांबला आणि विडी पेटवून आरामात त्याच्याकडं बघत राहिला. पहिल्या मजल्यावरून कुणीतरी पचकन पीक टाकली. ती त्याच्या अगदी जवळच पडली. वर पहावंसं त्याला वाटलं. पण तेवढं धैर्य झालं नाही. किंकर्तव्य-विमूढ होऊन तो नुसता उभा राहिला.

रात्र बरीच उलटली होती. कमीजास्त प्रमाणावर ही रात्रदेखील रोजच्या सारखीच होती. गुलमोहोराच्या फुलांसारखे लाल देह, चाफ्याच्या फुलासारखं फुललेले पिवळे देह, नाजुक कळ्या, आणि पिकली पानं... सर्वच्या सर्व नटूनथटून खिडक्यांत आरूढ झाले होते.

या गल्लीचं एकच वैशिष्ट्य होतं– ध्वनी आणि प्रकाश. आयुष्यात जर काही असेल तर फक्त हेच ! जुने ध्वनी निस्तब्ध होतात. जुने प्रकाश विझून जातात, जुने देह नवीन दिसण्याच्या खटपटीत थकून बेजार होतात, आणि नाजुक व नवे देह त्यांची जागा बळकावतात. इथली गती भयंकर होती. ही गती प्रत्येकाला गिळून टाकायची.

त्या गतीनं त्याला फार वेळ मोकळं उभं राहू दिलं नाही. कुणी त्याच्यावर थुंकलं,

कुणी त्याला धक्का मारला. कुणी त्याच्या खिशाला हात घालायचा प्रयत्न केला, कुणी त्याच्यापाशी भीक मागितली. कुणी डोळे वटारून त्याला धमकावलं, कुणी आपल्या अदांनी त्याला उत्तेजित केलं, कुणी त्याला खुणावून बोलावलं. त्याला काही सुचेना त्याची मती गुंग झाली. प्रकाशाच्या धुंदीनं त्याच्या शरीराचा रोम न् रोम बोचकारून काढला.

त्याचे स्नायू आकसू लागले. त्याने दात ओठ खाल्ले. त्याचं मस्तक तापलं. डोळे जळू लागले.

विजेच्या झटक्यासारखा त्याच्या मनात एक विचार आला आणि त्याचं शरीर तितक्याच द्रुत गतीनं सावध झालं. त्यानं पाठ फिरवली आणि समोरच्या घराचा जिना धाडधाड चढून तो वर गेला. पहिल्या मजल्यावरच्या पहिल्याच खोलीसमोर तो धापा टाकत उभा राहिला. दारावर लोंबकळणारा लाल पडदा अचानक बाजूला सरला. जणू कुणीतरी त्याची वाट पहात उभंच होतं. त्याने दम घ्यायच्या आतच एका कोमल हातानं त्याचा खांदा धरून त्याला आत ओढून घेतलं. पहिल्या खोलीत तीन "सुंदरी" त्याच्याकडं पाहून हसल्या. पण त्यांचं ते अस्त्र वाया गेले. तो हात त्याला दुसऱ्या खोलीत ओढून घेऊन गेला.

त्या स्त्रीनं त्याचा कोट काढला. टोपी काढली आणि त्याला पलंगावर निजवलं. मग सुरुवात केली,

"किती पैसे आणलेत ?"

आणि बाहेर गोंगाट होत राहिला. कुठंतरी एक जुनं घड्याळ, किल्ली संपायच्या थोड्या वेळा अगोदरचे अखेरचे आचके देत टरक टरक करीत होतं. रात्र कशीबशी सरत होती.

थोडे सवाल जवाब झाले. तो मोजकंच बोलला. पण पलंगावर उगाच तसाच पडून राहिला. वेळ जाऊ लागला. स्नो-पावडरीचा तो वास त्याला आवडला नाही. स्त्रीचं शरीर त्याला बिलगलं. त्याला जणू एक जोराचा धक्का बसला. हरवलेल्या भावना पुन्हा परतून आल्या– भावनांचा जणू पूर लोटला. नव्या भावनांसह भूतकालातल्या स्मृतींचे पुंजकेदेखील येऊन धडकले. त्याचं मन खिन्न झालं. एक सुस्कारा त्याच्या तोंडून बाहेर पडला.

तो उठून उभा राहिला.

"निघालात ?"

"हो."

"का ?"

त्यानं उत्तर दिलं नाही.

तिनं विचारलं, "तर मग आलात कशाला ? पैसे कशाचे दिले ?"

हो, खरंय– कशाचे ? पण हे तर त्याचं त्यालासुद्धा ठाऊक नव्हतं. तो अतिशय दमला होता. त्याचं हृदय धाड धाड त्याच्यावर हातोडा हाणीत होतं. पैसे गेले मसणात. त्याला रडावंसं वाटत होतं. अश्रू ढकलून टाकायला डोळे उत्सुक होते. पण ती काही रडायची जागा नव्हती. त्यानं कसेबसे आपले अश्रू आवरले.

त्याचे हात त्याच्या टोपीशी चाळा करू लागले. "तुमची तब्येत बरी नाही वाटतं ? पाणी आणू ?"

पाणी पिऊनदेखील त्याला चैन पडलं नाही. स्त्रीनं त्याचा हात धरून त्याला खुर्चीवर बसवलं.

"तुम्ही काय काम करता ?"

ती गप्पच राहिला.

"तुम्हाला बायकापोरं आहेत ?"

त्याच्या चेहऱ्यावरचं स्मित मावळलं. तो ताठरला. स्त्रीकडे बघता बघता त्याचे डोळे थिजले. आणि तोंड आ वासून राहिलं. काळोखाचा एक ढग त्याच्या नजरेसमोर तरळून गेला.

"होती," तो हळूच म्हणाला, "सर्व मेले."

"अरेरे... ! बायको देखणी होती ?"

"हो, अत्यंत देखणी. मी अठरा वर्षांचा होतो व ती चौदाची होती तेव्हा आमचं लग्न झालं होतं. आणि... आणि..."

"काय ?"

"काही नाही."

"तिचं तुमच्यावर प्रेम होतं ?"

त्याने प्रेमळपणे स्त्रीकडे पाहिलं आणि गोंडस हसला. डोक्यावरून टोपी काढली आणि तिच्यावरील नक्षीवरून हात फिरवू लागला.

"फार सुशील असेल ?"

त्या गडबड गोंधळातदेखील दोघांमध्ये मौन पसरलं.

"तुम्ही दुसरं लग्न नाही केलंत ?"

त्याला दुसरा धक्का बसला. नजर झुकवून तो खाली बघू लागला. टोपी डोक्यावर

घातली आणि खिशातून रुमाल काढला.

"का नाही केलंत ?... अजून तुम्ही तरुण आहात."

स्त्री त्याच्याकडे पाठ वळवून उभी राहिली आणि म्हणाली, "माझ्याशी लग्न कराल ?" बोलता बोलता ती गर्रकन मागे वळली आणि हसली. तिने निव्वळ थट्टा केली होती. तिच्या चेहऱ्यावर ध्वनी आणि प्रकाश स्मित करीत होते. तरीसुद्धा त्या स्मिताचा तिच्या रंगरंगोटीशी ताळमेळ बसत नव्हता. त्याला ती थट्टा आवडली नाही. तो उठून चालू लागला.

स्त्रीने मागून म्हटलं– "तुम्ही पैसे वसूल नाही केलेत ?"

दारापाशी येऊन त्यानं मागं पाहिलं. त्याचा जीव गुदमरू लागला आणि डोळ्यांसमोर अंधारी येऊ लागली. मनात नसूनही त्याच्या चेहऱ्यावर दुसरेच काही भाव आले. त्या बदनाम बाईवर आलेला राग तो लपवू शकला नाही. त्याचे ओठ घट्ट मिटले गेले. त्याच्या डोळ्यांतून ठिणग्या बाहेर पडू लागल्या.

"पुन्हा कधी याल ?"

उत्तर न देताच तो पायऱ्या उतरून खाली आला आणि खालच्या ध्वनी व प्रकाशात एकजीव होऊन गेला.

यावेळी त्याच्या नजरेला काही दिसत नव्हतं. प्रकाशानं त्याचं मन अंधारून टाकलं होतं. त्याच्या कानांत आवाजांच्या त्या गल्लीचे प्रतिध्वनी घुमत होते.

प्रकाशाने झळाळणारा रस्ता ओलांडून गल्लीत शिरताना त्याने सुटकेचा श्वास सोडला. चालण्याची गती मंद केली. कुठं एखादा दिवा पेटलेला होता. कुठून आवाज येत होते. त्याच्या थकल्याभागल्या शरीरात थंडीने शिरशिरी आली.

आवाजांनी त्याला घेरून टाकलं.

"तुम्हाला बायकापोरं आहेत ?"

"सर्व मेले."

आता त्याला राहवेना. त्याचे डोळे डबडबले. त्याला हुंदका आला. मनातल्या मनात तो म्हणाला– "आतापर्यंत सर्व मेले होते."

कसलाही आवाज न होऊ देता तो दिंडी दरवाजाने आत शिरला. दोनदोन पायऱ्या चढत तो चौथ्या मजल्यावर पोचला. जिन्यापाशी जरा घुटमळला. समोर त्याच्या खोलीचं दार होतं आणि अजूनही ते तसंच उघडं होतं.

त्याने मान खाली घातली. इथं खरंच का काही घडलं नाही ? हे कसलं जग आहे ? धोतराचा सोगा त्याच्या हातून गळून पडला.

खोलीत शिरून त्यानं इतकडेतिकडे नजर टाकली. बांगड्या भरलेला एक हात कंदिलाची वात मोठी करण्यासाठी पुढे सरसावताना त्याला दिसला. धावत जाऊन त्यानं तो हात पकडला आणि प्रेमभराने दाबला.

"कोण ? तुम्ही ?"

"हो. असू दे. मला उजेड नको. अरे बाप रे ! तुझा हात किती गरम लागतोय. पुन्हा ताप आला वाटतं ?"

उत्तरादाखल रडण्याचा अस्पष्टसा आवाज त्याच्या कानांवर आला. बांगड्यांची किणकिण करीत तो कृश हात त्याच्या हातातून निसटून बाजूला झाला. दुसऱ्या कोपऱ्यात कुणी जोरात खाकरलं. एक पोर रडू लागलं. "आई !" बांगड्या पुन्हा किणकिणल्या. पोटमाळ्यावर धावपळ करणाऱ्या उंदरांनी काचेचा एक पेला खाली पाडला. आणि दूधवाल्यानं दार ठोठावलं.

खाटेवर बसून त्यानं डोकं गच्च धरलं.

पुन्हा तेच आवाजांचं जग !

# पुनर्विवाह

□ स्नेहरश्मी

सांत्त्वन करायचं माणसाचं सामर्थ्य किती तोकडं असतं याचा अनुभव आज काही पहिल्यांदाच त्याला येत नव्हता. पण काही प्रसंग स्वजनांच्या मृत्यूपेक्षादेखील अधिक वेदनादायक असतात हा अनुभव मात्र आज पहिल्यांदाच त्याला येत होता.

बिछान्यावर पडल्या पडल्या तो कूस बदलत राहिला. पण खूप आळवून देखील निद्रादेवीची बहाल मर्जी काही होईना. खोलीतला काळोख त्याचं दुःख आणखी वाढवू लागला. पलंगाखाली नेहमी असणारा कंदील त्याने पेटवला. खोली प्रकाशानं भरून गेली. पण त्याच्या मनातला अंधार मात्र आणखी दाट झाला. तपकिरीची डबी काढून त्याने चिमूट घेतली पण त्याची चिमूट तशीच राहिली आणि तो बाहेर बघू लागला.

दार उघडून तो बाहेर चौथऱ्यावर आला. अवघी आळी झोपलेली होती. अंधारी रात्र इतकी नीरव आणि निस्तब्ध होती की जणू आपल्या समस्त वैभवानिशी कुणाची तरी वाट पहात असावी.

चौथऱ्यावर तो थोडा वेळ उगाच चकरा मारत राहिला. तपकिरीची डबी त्याच्या हातातच होती. डबी रिकामी झालेली होती आणि कुणीतरी अंगाची कातडी सोलून काढत असल्यासारखी त्याची मनःस्थिती झाली होती. घरातल्या प्रत्येक वस्तूशी त्याच्या मुलीची मनोरमेची स्मृती निगडीत होती. मनोरमा असताना त्याची तपकिरीची डबी कधी रिकामी राहिली नव्हती. त्याचे कपडे तर ती दुसऱ्या कुणाला धुवूच देत नसे. त्याला केव्हा तहान लागेल, त्याला केव्हा बाहेर जावंसं वाटेल, आज त्याला काय जेवावंसं वाटेल– त्याच्या मनातल्या या सर्व गोष्टी त्याचा चेहऱ्यावरूनच मनोरमेला समजायच्या. खरंच. मनोरमा असताना त्याचं आयुष्य कसं भरलेलं होतं !

आणि सविता ! "माझ्या मनू" शिवाय ती पळभर राहू शकत नसे. आणि दिवसातून एकदा नव्हे कितीदा तरी विचारायची की मी हिची आई आहे की मुलगी, त्या सवितेच्या जीवनात मनोरमेला किती महत्त्वपूर्ण स्थान होतं ! मुलगी आईची की वडिलांची ? हा प्रश्न आज पहिल्यांदाच मोठ्या आघातानं त्याच्या मनात निर्माण झाला. त्याला वाटलं की तो स्वतःच जर इतका मोडून, खचून गेला आहे तर बिचाऱ्या

सविताला विष जवळ करावसं वाटू लागलं तर त्यात नवल ते काय ? अरे, मनोरमेच्या हातून चारा खायची सवय असलेल्या बैलांनीदेखील चाऱ्याची टोपली नुसती हुंगून सोडून दिली आहे. चाऱ्याला तोंड लावलं नाही ! जनावरांनादेखील इतकं कळतं का ?

तपकिरीची डबी उघडून चिमूट घेण्यासाठी तो उगाचच यंत्रासारखा डबीत बोट फिरवीत राहिला– आणि आपण रिकाम्या डबीलाच मोठ्या प्रयत्नाने हुंगत असल्याचं त्याला समजलंदेखील नाही. माणूस किती पराधीन असतो.

रात्रीची नीरवता त्याला असह्य झाली. तो सवितेच्या खोलीकडे गेला. खोलीत गच्च अंधार होता. सवितेची झोपमोड होऊ नये म्हणून तो चोरपावलांनी खोलीत शिरला.

"कोण ? तुम्ही आहात ? अंधारातून सवितेचा कापरा आवाज आला."

"हो ! म्हटलं तू झोपलीस की नाही हे पाहून यावं." असं म्हणत तो मनोरमेच्या रिकाम्या खाटेवर बसला. सविता उठली. कंदील लावला. त्याच्या प्रकाशात जगजीवनला दिसलं की सवितेचे डोळे आसवांनी डबडबले आहेत.

जगजीवन सवितेच्या खाटेवर येऊन बसला. अथांग सहानुभूतीनं त्यानं सवितेच्या पाठीवर हात फिरवला आणि तिला आपल्यापाशी ओढून घेतली. कित्येक वर्षांचं अंतर मधून नाहीसं झालं आणि ते सान्निध्य पतिपत्नीच्या जीवनातील एका अतिगूढ मर्मभेदी कथेला आकार देऊ लागलं.

तसं पाहिलं तर हे दोघे पतिपत्नी, आईवडिलांनी बांधून दिलेल्या विवाहग्रंथीने एकमेकांशी बांधले गेले होते. पण पंचवीस वर्षांपूर्वीची ही हकीकत आहे. दोघे त्यावेळी कुमारावस्थेत होते. तरीदेखील प्रथमदर्शनीच त्यांच्या मनात एकमेकांप्रती किती निष्ठा, प्रेम आणि दृढ समज निर्माण झाला होता. आणि पहिलं अपत्य झाल्यावर तर त्यांचा आनंद गगनात मावेनासा झाला होता. जणू नंदनवनच पृथ्वीवर आल्यासारखं त्यांना वाटू लागलं होतं. त्या फुलासारख्या कोमल बालिकेच्या गोड कूजनानं घर उजळून निघू लागलं होतं. पण दोन वर्षांच्या अल्पकालावधीनंतर फक्त नऊ तासांच्या संक्षिप्त आजाराने तो प्रकाश लुप्त झाला. त्यावेळी सवितेनं खचून जाऊ नये म्हणून जगजीवनला आपलं दुःख गिळून, किती तपश्चर्या करावी लागली होती !

पोरीच्या मृत्यूच्या काही दिवसांनंतरची ती रात्र त्याला आठवली. सविता रडतारडता स्तब्ध होऊन काष्ठवत निपचित पडली होती. सवितेच्या मनीची व्यथा दूर करण्यासाठी त्याने हरतऱ्हेचे प्रयत्न केले होते. सवितेच्या गार शरीरात आपल्या

तन, मन आणि हृदयाच्या उष्णतेने चैतन्य आणण्यासाठी शक्य होतं ते सारं त्यानं केलं होतं. स्नेह, सहानुभूती आणि कारुण्यानं ओथंबलेल्या नजरेनं पहात तो सवितेच्या बिछान्यापाशी बसून राहिला होता. आपल्या घराच्या शोकाकुल एकान्तात आपल्या प्राणेश्वरीच्या वेदनांच्या मूकनिर्निमेष साक्षीदारासारखा ! बरीच रात्र गेल्यावर, एका दीर्घ निश्वासाने सवितेचा मौनभंग झाला होता. जगजीवनने तिला छातीशी कवटाळून धरलं होतं. आणि हुंदके देऊन ओक्साबोक्सी रडणारी सविता तुफान वादळवाऱ्यात वृक्षाचा आधार शोधणाऱ्या लतावेलीसारखी त्याला बिलगली होती.

सकाळी ती जागी झाली तर अशी काही अस्वस्थ होती जणू दिवसाच्या प्रकाशासाठी व्याकुळली होती. जगजीवनशी नजरभेट होताच तिची मान खाली झाली देवा रे ! हे काय झालं ? लेकीचा मृत्यू अजून घरातच घोटाळतोय आणि आम्ही हे काय करून बसलो ? सवितेच्या मनाची तगमग शांत करण्यासाठी जगजीवनने समजावले होते– ''मुलीला हे घर सोडून जावं लागू नये म्हणून देवाला हेच योग्य वाटलं असेल.'' सविता विचारात पडली होती. तिनं विचारलं होतं– ''जाणारे लोक काय परतून येतात ?''

''का नाही ? तसं नसतं तर या जन्मी तुझी-माझी गाठ कशी पडली असती ?''

''गेल्या जन्मीदेखील आपण दोघे बरोबर होतो याची खात्री आहे तुम्हाला ?''

''हो. इतकंच काय माझा पूर्ण विश्वास आहे की पुढच्या जन्मीदेखील आपण दोघे बरोबरच राहू.''

आणि हे ऐकून सविता किती श्रद्धेनं, किती आवेगानं त्याचा आधार शोधत जणू त्याच्यात सामावून गेली होती.

जगजीवनने सवितेला जे आश्वासन दिलं होतं ते खोटं नाही ठरलं. थोड्याच दिवसांत सवितेच्या शरीरावर त्याच्या खुणा दिसू लागल्या. त्याचबरोबर तिच्या भोळ्या मनात ही मुग्ध श्रद्धा आकार घेऊ लागली की तिची देवाघरी गेलेली मुलगीच परत जन्माला येणार आहे. प्रसूतीनंतर तिनं जेव्हा ऐकलं की नवजात अर्भक मुलगी आहे, तेव्हा तिच्या आनंदाला पारावार उरला नाही. मुलीच्या मृत्यूच्या दुःखात असताना तिला विश्वास वाटला नव्हता. पण आता मात्र तिची खात्री पटली की जगजीवनचं बोलणं शंभर टक्के खरं होतं आणि हे सर्व देवाच्या कृपेनंच घडलं आहे. नवजात मुलीचं नाव तिनं ठेवलं– मनोरमा.

आणि मनोरमा खरोखरच इतकी गोड होती की चटकन कुणाचंही मन जिंकून

घ्यायची. तिच्या जन्मानंच जणू या तरुण दंपतीच्या जीवनात आनंदाचा नवा प्रकाश उजळला होता. तिच्या प्रगतीच्या प्रत्येक गोष्टीची ते चर्चा करायचे. आणि त्या चर्चेची पुनरावृत्ती करतानादेखील ते अजिबात कंटाळत नसत. मनोरमा चार पाच वर्षांची झाली तोवर तर तिच्या बाबतीत सांगण्यासारख्या बऱ्याच गोष्टी गोळा झाल्या होत्या. इतकंच काय, तिची बाहुलीसुद्धा जगजीवन, सविता आणि त्यांचे नातेवाईक व मित्र यांच्यातील गप्पांचा विषय व्हायची.

मनोरमेनं बाहुलीचं नाव ठेवलं होतं रेखा. पण त्याच रेखाचा राग आला म्हणजे ती तिला ''रेखली'' म्हणायची. कधी कधी ती तिच्यावर रागवायची, ओरडायची, गालावर एखादी थप्पड ठेवून द्यायची आणि मग राग शांत झाला की तिचे लाड करायची. ''माझी सोनुली ती ! जोरात लागलं का बाळीला ? पण मला राग येईल अशी कामंच का करतेस तू ? आता नाही हं पुन्हा असं करणार ? उगी, उगी– माझी छकुली ती.'' हा असला वेडेपणा ती दिवसातून कितीदा तरी करायची. कधी कधी मैत्रिणीबरोबर खेळताना अचानक तिला आठवण व्हायची आणि ती म्हणायची– ''रेखेला भूक लागली असेल... ती रडत असेल.''आणि बाहुलीला छातीशी कवटाळून हलक्या हातानं थोपटण्याचा अभिनय करीत ती येऊ लागली म्हणजे सविता आणि जगजीवन मुग्ध होऊन एकमेकांकडे पहात आणि अर्थपूर्ण स्मित करीत.

काही दिवसांनंतर त्यावेळच्या पद्धतीनुसार बालपणीच मनोरमेचं लग्न ठरवण्यात आलं आणि चांगलासा मुहूर्त पाहून एक दिवस तिचा विवाह करून टाकण्यात आला. आपलं जीवन धन्य झाल्यासारखं सवितेला वाटलं. पण त्याच वेळी आपल्या एकुलत्या एका मुलीच्या वियोगाच्या दुःखानं तिचं हृदय भरून आलं. पण या वेदनेतही माधुरी होती. तिच्या लाडक्या मुलीच्या कल्याणाची मंगल भावना होती. त्यावेळी बिचाऱ्या सवितेच्या स्वप्नातदेखील आलं नव्हतं की तिच्या या मधुर वेदनेचं काही दिवसांनंतर हृदयविदारक व्यथेत रूपांतर होणार आहे.

लग्नातील ताशावाजंत्रीचा आवाज बंद व्हायच्या आतच मनोरमा विधवा झाली. सविता आणि जगजीवनचं पहाडासारखं तारुण्य या वज्राघातानं कोसळून पडलं. किशोरावस्थेतील निर्दोष विधवा मुलीला सासरहून माघारी आणून आपल्या स्नेहाच्या कोषात त्यांनी ठेवून घेतलं. या बाबतीत कसलीही चर्चा न करता, कोणतीही पूर्वयोजना न आखता जगजीवन आणि सवितेनं आपला जीवनक्रम नव्या धर्तीनं सुरू केला. घर फार मोठं नसलं तरी इतकं लहानही नव्हतं की त्यात एखाद्या स्वतंत्र

खोलीची व्यवस्था होऊ शकणार नाही. आता सविता आणि मनोरमा एका खोलीत राहू लागल्या. जगजीवनचा बिछाना दुसऱ्या खोलीत घातला जाऊ लागला. सौभाग्यसूचक अलंकाराखेरीज बाकीचे सर्व अलंकार सवितेने काढून टाकले. मनोरमेच्या वैवाहिक जीवनाखेरीज बाकीच्या सर्व इच्छा पुऱ्या होतील असं प्रेमळ वातावरण निर्माण करण्याचा ते दोघे स्नेहशील माता, पिता शक्य तितका जास्त प्रयत्न करू लागे. आयुष्यातील या संकटाला तोंड देण्याचं धैर्य आपल्या मुलीत यावं हीच एक भाबडी आशा त्यांच्या मनात होती.

आपल्या लावण्यवती कन्येच्या हरपलेल्या सौभाग्याकडं पाहून वेळोवेळी सवितेच्या हृदयांतून व्यथेचे निःश्वास बाहेर पडत. हा कसा धर्म आहे ? जिनं अजून संसारसुख पाहिलंच नाही, एका परक्या मुलाच्या हाताला ओझरता स्पर्श फक्त केला आहे, तिला उष्ट्या पत्रावळीसारखं आयुष्य घालवायची ही कसली शिक्षा ? आणि ही क्रूर शिक्षा तरी कोणत्या अपराधासाठी ? सवितेच्या या प्रश्नांना उत्तर मिळत नसे. पुनर्विवाहाची नुसती कल्पनादेखील तिच्या मनात येणं शक्य नव्हतं. मुलीला शिकवलं पाहिजे म्हणजे तिला दुसऱ्याच्या दयेवर अवलंबून रहावं लागणार नाही. हे जगजीवनचं म्हणणंदेखील मोठ्या कष्टानं तिच्या गळी उतरलं होतं.

शिक्षणात मनोरमेनं चांगलं नाव मिळवलं. संगीत, शिवणकाम, चित्रकला इत्यादी ललितकलांमध्ये, फक्त आपल्या वर्गातच नव्हे तर अवघ्या विद्यालयात तिचा पहिला क्रमांक यायचा. फायनलची परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाल्यानं साऱ्या जिल्ह्यात तिला प्रसिद्धी मिळाली. तिला पुढं शिकवण्याची जगजीवनची इच्छा होती पण सवितेला ते पटलं नाही आणि ती गोष्ट तिथेच संपली.

ही आणि अशाच अन्य अनेक घटना चलचित्रासारख्या जगजीवनच्या डोळ्यांसमोरून तरळून गेल्या. आणि उन्मळलेल्या लतेसारख्या पडलेल्या सवितेला अपार सहानुभूतीनं आपल्या शरीराचा आधार देऊन उठवण्यासाठी मनाची तयारी करीत त्यानं म्हटलं, ''जे काही व्हायचं होतं ते होऊन गेलं.''

''पण मनूने असं का केलं ?''

''तू आपली ती रात्र विसरलीस...''

लज्जेनं सवितेची नजर खाली वळली. वर न पाहताच ती म्हणाली, ''पण तुम्ही तर म्हणत होता की देवानं हे...''

''खरं तेच सांगत होतो. आणि आजही तेच सांगतो की हेसुद्धा देवाच्याच मर्जीनं घडलंय...''

"पण देव काय असलं अधर्माचं कर्म करायला लावणं शक्य आहे ?"

सवितेचा गळा दाटून आला होता.

"कोण म्हणतं हा अधर्म आहे ? हे पाप आहे ? तारा, मंदोदरीसारख्या सती पाहता आपली मनू तर काकणभर जास्तच निर्दोष आहे, पवित्र आहे."

"ते ठीक आहे. पण लोक..."

"लोक, लोक म्हणून तू पोरीला शिक्षणदेखील पुरं करू दिलं नव्हतंस. लोकांचा तो आधार तुझ्या काहीतरी उपयोगी पडला का ?"

आणि वेदनेच्या मौनाला शब्दरूप देत दोघे पतिपत्नी मनोरमेच्या जीवनातल्या असंख्य लहानमोठ्या घटनांच्या आठवणीत भान हरपून दंग झाले. जगजीवनने मनोरमेच्या पुस्तकांमधून तो अल्बम उचलला. मनोरमेने तो चित्रांची कात्रणं चिकटवून तयार केला होता. पहिलं चित्र एका सुंदर युगुलाचं होतं. दुसऱ्या चित्रांत पिलावळीसह दाणे टिपायला निघालेली एक कोंबडी होती. तिसऱ्या चित्रात पिल्लांशी खेळणारी एक कुत्री होती. चौथ्यात, झडप घालणाऱ्या ससाण्यापासून पिल्लाचं रक्षण करण्यासाठी अंग फुगवून त्यांना पंखाखाली लपवणारी, एक चिमणी होती. पाचव्यात, पिंपळपानावर अंगठा चोखत पडलेल्या बाळकृष्णाचं चित्र होतं... एका पाठोपाठ एक अशी चित्रं उलटत जगजीवन म्हणाला :

"ही सर्व चित्रं मनोरमा किती उत्साहानं आम्हाला दाखवायची. पण आपण मात्र खरंच मूर्ख होतो. या चित्रांमधून ती आपल्याच मनच्या भावना आम्हाला सूचित करीत असल्याचं आपल्या कसं ध्यानात आलं नाही ?"

एक सुस्कारा सोडत जगजीवनने तपकिरीची डबी काढली आणि चिमटीने त्यात तपकीर चाचपडू लागला. सवितेनं पाहिलं आणि मनोरमा त्या दोघांच्या जीवनाला सुखाच्या हिंदोळ्यावर किती निःस्वार्थ प्रेमानं झुलवीत असे याचं एक चित्र तिच्या डोळ्यांसमोर उभं राहिलं.

पतिपत्नीच्या मनोव्यथेला शब्दरूप देत स्मृतीचा धागा पुढे सरकू लागला. मधून-मधून तपकिरीची रिकामी डबी नाकाशी धरत हुंगायचा प्रयत्न जगजीवन करीत होता. ते पाहून सवितेला हसू आले. म्हणाली– "हे काय करताय तुम्ही ? रिकामी डबी..."

"हो खरंच. लक्षातच रहात नाही... आणि ... आणि बघ, रिकामी डबी जर हे करायला लावू शकते तर तारुण्यानं मुसमुसलेली काया..." आणि त्याचं वाक्य पुरं व्हायच्या आत सविता त्याच्या मिठीत शिरली.

तारुण्य ओलांडून प्रौढावस्थेतून मार्गक्रमण करणाऱ्या दोन मुग्ध हृदयांचं हे मीलन कित्येक वर्षांच्या कठोर संयमाचा बांध फोडून इतकं उत्कट, इतकं आवेगपूर्ण झालं होतं की जणू दाम्पत्यजीवनाच्या प्रथम रात्रीचंच ते मीलन होतं. देहातील अंतर नाहीसं झालं– केवळ भावना, प्रेम आणि अनुभूतीची एक हृदयंगम उर्मी वातावरणात तरंगू लागली. नवविवाहित दंपतीसारखं हे वत्सल जोडपं उत्तरोत्तर प्रगाढ आलिंगनात बद्ध होत आपल्या असह्य वेदना एका नव्या मुग्ध आशेनं परावर्तित करू लागलं. त्यांनी ठरविलं की दुसऱ्या दिवशी जगजीवन स्वतः जाऊन मनोरमा व तिच्या प्रियकराला बोलावून घेऊन यावं आणि त्यांनी कोणत्याही तऱ्हेने का लग्न लावलं असेना, जगजीवन आणि सवितान त्या दोघांचं लग्न वैदिक पद्धतीनं आपल्या घराच्या अंगणात लावून द्यावं. स्वतः कन्यादान करावं.

सकाळी अकराच्या गाडीने जाऊन, त्या दोघांना बरोबर घेऊन जगजीवनला संध्याकाळी पाचच्या गाडीनं परतायचं होतं. म्हणून सकाळी लवकर उठायची काळजी नव्हती. जवळजवळ रात्रभर जगजीवनचा डोळ्याला डोळा लागला नव्हता. म्हणून सूर्य वर आला तरी सवितेने त्याला उठवलं नाही. ती हळूच त्याच्या शेजारून उठली, नित्याची कार्ये तिने आटोपली आणि जगजीवनसाठी चहा करायला ती शेजारच्या खोलीत गेली.

खोलीत एका चित्राखाली सवितेला थोडा केरकचरा पडलेला दिसला आणि मनोरमेची आठवण पुन्हा ताजी झाली. त्या चित्रामागं चिमण्या नेहमी घरटं बांधायच्या आणि त्यावरून मनोरमा व त्यांचा गडी सीताराम यांचं नेहमी भांडण व्हायचं. घरट्यासाठी चिमण्यांनी गोळा केलेल्या काड्याकुड्या, पालापाचोळा, गवत, कापूस, वगैरे सीताराम फेकायला जायचा पण मनोरमा त्याला हात लावू देत नसे. अखेर त्या भांडणात मनोरमेचा विजय व्हायचा आणि सीतारामनं कितीही बडबड केली तरी त्याला ते घरटं तसंच ठेवावं लागायचं.

सवितेनं मोठ्या हळुवारपणे खाली फरशीवर पडलेल्या काड्याकुड्या उचलल्या आणि चित्रामागं बांधल्या जाणाऱ्या घरट्यांवर व्यवस्थितपणे ठेवून दिल्या. घरट्यात त्यावेळी चिमणा, चिमणी, त्यांची पिल्लं वा अंडी काहीच नव्हतं. त्यानंतर स्नेहानं उचंबळणाऱ्या क्षुधित मातृहृदयानं घरट्याकडं एकटक पहात ती भविष्यकाळातील एक मधुर स्वप्न पाहू लागली. त्याच वेळी चोचीत काडी धरून एक चिमणी उडत आली आणि चित्राच्या मागं जाऊन लपली. तिच्या पाठोपाठ तशाच दोन काड्या चोचीत घेऊन चिमणा आला.

सवितेचं अंग प्रत्यंग मोहरून गेलं. एक गोड शिरशिरी घेऊनच ती चहा करायला स्वयंपाकघरात गेली आणि जगजीवनने झोपेतच एक मधुर श्वास घेऊन कूस बदलली.

# नीलीचं भूत

□ गुलाबदास ब्रोकर

घनघोर, भयाण, काळोख्या रात्रीनं चहूबाजूंना आपलं साम्राज्य फैलावलेलं होतं. पण घराच्या एका खोलीत दिव्याच्या उजेडात बसलेल्या त्या तिच्या मित्रांचं तिकडं अजिबात लक्ष नव्हतं. ते तर त्यांच्या गप्पांतच इतके रंगून गेले होते की ढगांच्या गडगडाटानं आणि मुसळधार पावसानं रात्र आणखी भयंकर झाली असती तरी त्यांना त्याचं काही वाटलं नसतं.

एका पाठोपाठ एक रात्रीचे तास उलटत होते. थंडी मी म्हणत होती. पण त्याची जाणीव बहुधा त्यांना होती वाटतं. कारण खोलीच्या एका कोपऱ्यात पडलेल्या खाटेवर निर्मला आणि प्रबोध– पति-पत्नी– एकच शाल पांघरून एकमेकांना खेटून बसले होते आणि त्यांचा मित्र शशी खाटेजवळच खुर्ची सरकवून दोन्ही पाय वर छातीशी घट्ट धरून मुटकुळी करून बसला होता.

त्यांच्या बोलण्याच्या पद्धतीवरून, हावभावांवरून, त्यांच्या चेहेऱ्यावर दिसणाऱ्या रंगरेखांवरून स्पष्टपणे दिसून येत होतं की गप्पांमध्ये तिघेही रंगून गेले होते. कित्येकदा तिघेही एकदमच बोलू लागायचे, कधी एखाद्याचं बोलणं पुरं व्हायच्या आतच दुसरा बोलू लागायचा. संभाषणाला तिळमात्र खीळ पडत नव्हती.

''अग आई ग ! पण असं कसं झालं असेल ? ते आवडत तरी कसं असेल ?'' शालीत झाकलेले आपले गोरे आणि किंचित अशक्त हात बाहेर काढून, आपल्या गोऱ्या आणि सुंदर शरीराला झाकत निर्मला म्हणाली. तिच्या स्वरांत विषाद कमीच होता. उलट घृणाच जास्त दिसून येत होती.

थंडी नक्कीच जास्त होती. कारण क्षणात लगेच निर्मलेचे हात पुन्हा शालीच्या आत लपले. विषाद आणि घृणा युक्त चेहराच तेवढा खुला राहिला.

''ते तुला समजणार नाही निमू.'' प्रबोधने तिच्याकडे प्रेमभरानं आणि मानानं पाहात म्हटलं– ''तुला समजणं कसं शक्य आहे ?''

''खरंच निमाताई. तुम्हाला जे वाटतंय ते साहजिकच आहे.'' शशी आपल्या हातांनी आपले गुडघे आणखी घट्ट आवळीत म्हणाला, ''तुम्ही कुठं आणि ती कुठं !

ती तर थेट...'' पुढे काही न बोलता त्यासाठी योजलं जाणारं विशेषण त्यानं अर्धवट सोडून दिलं. पतिपत्नी दोघंही त्याचं बोलणं मोठ्या विश्वासानं खरं समजून ऐकत असल्याचं तो पहात होता. म्हणून फार काही बोलायच्या ऐवजी तो गप्प बसला. त्याच्या गोऱ्या, हसऱ्या, तजेलदार चेहऱ्यावर विषाद, औदासीन्य, धिक्कार इत्यादींचे संमिश्र भाव दाटून आले.

''पण हे कसं शक्य आहे ?'' निर्मला पुन्हा म्हणाली, ''त्याच्यात स्वाभिमान म्हणून काही होता की नाही ? हिंदू, मुसलमान, मित्र, शत्रू, कुणी का असेना...'' बोलणं अपुरं सोडून फक्त शोकसूचक रेखा चेहऱ्यावर आणून ती गप्प झाली. ''आपल्याला काय करायचय् निमू ?'' प्रबोध म्हणाला. मग शशीकडे पाहून त्याने म्हटलं, ''ती तर मेली. पण बिचाऱ्या मंगलला मात्र तिनं मरायच्या अगोदरच अर्धमेला करून टाकलं होतं. तुला तर सारं काही ठाऊक आहेच.''

''सारं ठाऊक आहे.'' शशी उत्तरला. मग जरा गंभीर होऊन म्हणाला, ''कदाचित तुझ्याहूनही जास्तच माहीत आहे.''

बोलता बोलता त्याच्या चेहेऱ्यावर जे भाव आले ते निर्मला आणि प्रबोध दोघांपैकी कुणीच पाहिले नाहीत. दोघे उत्सुकतेने त्याच्याकडे बघू लागले.

शशी म्हणाला– अगदी खालच्या आवाजात– ''ती कुसुम आहे ना ? जयाची बहीण– एकदा दुपारी ती कुठल्याशा कामासाठी तिच्या घरी गेली होती. मंगल बिचारा त्यावेळी कामासाठी बाहेर गेलेला होताच. नीलीने खोलीचं दारदेखील नीट लावलेलं नव्हतं. कुसुमने धक्का देताच दार उघडलं. आत नीली कुणाबरोबर तरी बसू नये अशा तऱ्हेनं बसली होती. कुसुमने पाहिलं.''

''तुला कुणी सांगितलं ?'' ''तुम्हाला कुणी सांगितलं ?'' पति-पत्नी दोघंही एकदमच विचारू लागली.

शशी थोडा वेळ स्तब्ध राहिला. जणू त्या दोघांचा प्रश्न त्याने ऐकलाच नव्हता. त्यावेळी त्याच्या डोळ्यांसमोर एक चेहरा तरळत होता– लहानसा, निस्तेज, जरा गोरा आणि अतिशय निर्दोष दिसणारा ! आणि तो चेहरा जणू त्याच्यापाशी जाब मागत होता– ''तुम्हीदेखील ? तुम्हाला काय हक्क आहे ?'' या प्रश्नाचं उत्तर मनातल्या मनात शोधायचा प्रयत्न शशी करणार तोच त्याचं लक्ष विचलित झालं. दोघांनी पुन्हा विचारलं,

''पण हे सर्व कळलं कसं ?''

''मला ? कुसुमने जयाला सांगितलं आणि जयानं माझ्या बायकोला.''

"ऐक निमू. आणखी एक किस्सा !" प्रबोधने म्हटलं.

निर्मलादेखील काही बोलली. पण त्या क्षणी तरी ते शशीला ऐकूच आलं नाही कारण तो चेहरा आता निव्वळ चेहरा राहिला नव्हता. त्याच्यासह आता एक संपूर्ण. मानवी देह उभा राहू लागला होता. दुर्बळ, अशक्त, तरीसुद्धा मोहक आणि निर्दोष दिसणाऱ्या चेहऱ्याला अधिक निर्दोष सिद्ध करीत ! आणि ती काया जणू शशीला विचारीत होती,

"तुम्हीदेखील ? बोला, आणखी काही बोला ना !"

आणि त्यानेच जणू प्रेरित होऊन प्रबोध आणि निर्मलेचं बोलणं थांबवीत शशी म्हणाला, "आणि निमाताई, नीली किती निर्दोष वाटायची नाही ?" तिला पाहून असं वाटायचं जणू अशी स्त्री कुठलंही पाप करूच शकत नाही. तरीदेखील किती दुष्ट होती ती !"

"आणि किती विषारी ! मंगल निमूशी जरासं नुसतं बोलला तरी ती त्याचा जीव घ्यायची !" प्रबोधनं म्हटलं.

"असेल. आम्हाला काय करायचंय त्याच्याशी ?" निर्मलेनं दुःखी स्वरात म्हटलं, "अखेर बिचारी मेली ना ? आणि तिनं तरी काय कमी दुःख भोगलं ?"

"अशा लोकांचं हे असंच होतं." शशी आवेगानं म्हणाला, "स्वतः सुखानं राहिली नाही की दुसऱ्यांनाही सुखानं राहू दिलं नाही." पण पुन्हा तीच आकृती नजरेसमोर तरळू लागली. तेव्हा तिला जणू जबरदस्तीने स्मृतीतून घालवून देण्यासाठी शशी अधिकच उत्तेजित होऊन बोलू लागला, "मी तर त्या वेळीच सांगून टाकलं होतं आणि पहिल्यांदा..."

त्याचा वाक्‌प्रवाह बराच वेळ वाहात राहिला. एका प्रसंगानंतर दुसरा प्रसंग, नीलीचे दोष आणि त्या दोषांमधून नीलीला मुक्त करण्यासाठी आपण केलेल्या प्रयत्नांची हकीकत तो सांगत राहिला. एकेकाळी त्याचे आणि नीलीचे चांगले सख्य होते. त्यावेळच्या साऱ्या घटनांना निर्मला आणि प्रबोध अत्यंत आवडीने आणि सहानुभूतीने ऐकत राहिले. मधूनमधून आपल्या स्मृति-कोषातूनदेखील वेधक प्रसंग निवडून रसाळ वाणीत सादर करीत होते. यातच वेळ जात राहिला.

शशी जसजसा बोलत होता तसतसा अधिकाधिक उत्तेजित होत चालला होता. कारण हे होते की एकीकडे तो अशा प्रकारच्या प्रसंग मालिकेचं वर्णन करीत असला तरी दुसरीकडे मात्र या अशा प्रसंगमालिकेच्या पार विपरीत दुसऱ्याच प्रकारची प्रसंगमालिका त्याच्या मनःपटलावर रेखांकित होत होती.

शारीरिक रूपाने तो त्या भीषण रात्री, दिव्याच्या प्रकाशाने उजळलेल्या खोलीत निर्मला आणि प्रबोधशी होणाऱ्या गप्पागोष्टींत हजर होता. पण मनाने, कल्पनेने मात्र इथून शेकडो मैल दूर व मुंबई शहराच्या एका उपनगरात भटकत होता. क्षण, तास आणि दिवस विचारांसारख्या वेगाने लोटत होते. तो मुंबईच्या एका शाळेत नोकरी करीत होता. नीलीचा नवरा मंगलदेखील त्याच शाळेत होता. दोघे एकाच उपनगरात रहात होते. आणि प्रबोध दुसरा धंदा करीत असला तरी तोदेखील निर्मलेबरोबर त्याच उपनगरात रहात होता.

तिघांची घरं थोड्या थोड्या अंतरावर होती. मंगल आणि निर्मला, निर्मला आणि नीली, नीली आणि शशी, प्रबोध आणि मंगल– हे सर्व आणि यांतले सर्वजण एकमेकाचे जिवलग मित्र झाले होते. गावच्या लोकांना मत्सर वाटावा इतकी यासर्वांची दाट मैत्री होती.

ही दृष्ट लागण्यासारखी मैत्रीही थोडेच दिवस टिकून राहू शकली. शशीच्या नजरेसमोरून एका पाठोपाठ एक घटना चलचित्रासारख्या द्रुत गतीने सरकू लागल्या. मंगल निर्मलेशी इतका एकरूप झाला म्हणून नीलीला निर्मलेचा मत्सर वाटू लागला. बऱ्याच खटपटी लटपटी करून तिने मंगलचे निर्मलच्या घरी जाणेयेणे बंद केले.

शशीपाशीदेखील ती निर्मलेविषयी वेडंवाकडं काही बोलली होती. त्यापैकीच एक गोष्ट यावेळी शशी, निर्मला आणि प्रबोधला सांगत होता.

''आणि ती मला म्हणू लागली– ''शशीभाई, मंगलने जर निर्मलेच्या कपाळाचं चुंबन घेतलं तर त्याला माझी काय हरकत असणार ? मित्रत्त्वानेच तो असं करतो याची मला खात्री आहे. असं केलं म्हणून त्यात काय बिघडलं ?'' हे सर्व ती इतक्या भाबडेपणाने सांगायची की तिच्या मनातलं विष मनातच दडून रहायचं, बाहेर पडायचंच नाही.''

''खोटी ! साफ खोटारडी !'' निर्मला चिडून म्हणाली, ''असं कधी घडलंच नव्हतं.''

प्रबोधच्या डोळ्यात फक्त तिरस्कार भरलेला होता. तो काही बोलला नाही.

''खोटारडी तर ती होतीच. हजार लोकांनी तिचं चुंबन घेतलं तरी तिला आवडावं अशी ती स्वतःच होती. म्हणूनच तर या अशा कल्पना ती करायची.'' शशी म्हणाला आणि क्षणभर स्तब्ध राहिला.

एवढ्या वेळात तर एक संपूर्ण घटना त्याच्या मनात येऊन गेली.

नीलीचं वागणं सैल होतं आणि ही गोष्ट साऱ्या मित्र मंडळाला माहीत होती. या

गोष्टीची कबुली खुद्द नीलीनं मोठ्या व्यथित मनानं मंगलपाशी दिली होती. शशीला हे सारं माहीत होतं.

म्हणूनच तर तो प्रसंग घडला.

त्या दिवशी मंगल आणि नीली बरोबर शशी त्यांच्या खोलीत बसला होता. शशी खूप हसत होता आणि त्याच्या जवळच्याच आरामखुर्चीवर शशी बसला होता. शशीच्या शेजारच्या एका छोट्या खुर्चीवर होती नीली.

मंगल वाक्पटू होता. तऱ्हेतऱ्हेच्या गप्पा मारून तो दोघांना हसवीत होता. शशी खूप हसत होता. हसता हसता एकदा त्याने नीलीकडे पाहिलं. नीली आपल्याकडेच बघत असल्याचा भास त्याला झाला.

गप्पा रंगत होत्या. हास्याला उधाण येत होतं. शशीने पुन्हा नीलीकडे पाहिलं. हसून हसून तिचा चेहेरा लालबुंद झाला होता. शशीचं तिच्याकडे लक्ष जाताच ती खळाळून हसली. बहुधा पहिल्यांदाच शशीला नीली मोहक वाटली असावी.

फिरायला जाताना मंगल जी छडी हातात घेऊन जायचा ती समोरच पडली होती. नीलीनं ती उचलून घेतली आणि तिच्याशी चाळा करू लागली. यामुळे त्या तिघांच्याही गप्पात काही खंड पडला नाही.

थोड्या वेळानं नीली त्या छडीनं हळूहळू शशीच्या पायांना गुदगुल्या करू लागली. शशी आणखीनच हसू लागला. मंगलला देखील हसू आलं.

या खोडकरपणाची शिक्षा देण्यासाठी शशीने नीलीच्या हातातून छडी हिसकावून घेतली. त्यावेळी छडी धरून ठेवण्याच्या प्रयत्नात नीली जरा खाली वाकली. पण खाली वाकतानादेखील तिचा चेहरा शशी समोरच राहिला आणि ती त्याच्याकडे टक लावून बघत राहिली. त्या निर्दोष भासणाऱ्या हसऱ्या चेहेऱ्यावरील दोन डोळे शशीला बरंच काही सांगून गेले.

का कुणास ठाऊक पण आज नीलीविरूद्धच बोलत रहावं असं शशीला वाटत होतं. नीलीच्या स्वभावाच्या अनेक छटा सांगून झाल्यावर ती सर्वांसमोर मंगल व निर्मलेचा कसा अपमान करायची हे तो प्रबोध आणि निर्मलेला सांगू लागला.

"कुसुमलादेखील तिने तुझ्या आणि मंगलच्याविषयी खूपसं काही सांगितलं होतं माझ्या बायकोनं जेव्हा ते सारं मला सांगितलं तेव्हा मला इतका राग आला की..."

तिकडे शशीच्या मनात मात्र दुसरंच विश्व साकार होत होते. एकदा मुंबईला जाण्यासाठी शशी आणि नीली बरोबरच लोकल ट्रेनमध्ये चढले. एकाच डब्यात बसले डब्यात भलतीच गर्दी होती. कशीबशी त्या दोघांना एकमेकांजवळ बसायला जागा

मिळाली. शशीच्या पायाचा ओझरता स्पर्श नीलीच्या पायांना झाला. नीली आपले पाय सरकून घेईल असे त्याला वाटलं होतं. पण नीलीने पाय तसेच राहू दिले. जणू तिला काही समजलंच नव्हतं. शशी पण आपले पाय बाजूला करू शकला नाही.

गाडीतून उतरून दोघे बसची वाट पाहात उभे राहिले. त्यावेळी दोघांनी एकमेकांचे हात गच्च धरून ठेवले जणू नकळतच त्यांनी तसे केले होते. नीलीने आपला हात सोडवला नाही की शशीने सोडवला नाही. आपले निर्मळ दिसणारे डोळे नीलीने शशीकडे वळवले तेव्हा घोगऱ्या स्वरात शशीने म्हटले, ''नीले, उद्या संध्याकाळी तू माझ्या घरी ये.''

शशी त्यावेळी आपल्या घरी एकटाच राहायचा.

''मंगल वेळेवर घरी आला तर आम्ही जरूर येऊ.'' नीली हसून म्हणाली.

शशीला आपला आवाज आणखी घोगरा झाल्यासारखं वाटलं. त्याचं अंगही थरथरत होतं. म्हणाला, ''नको तू एकटीच ये.''

''का ?'' नीलीने बसमध्ये चढता चढता विचारलं. बस त्याचवेळी आली होती.

''सहज.'' इतकं बोलून शशी तिथून निघून गेला होता.

त्यानंतर दुसऱ्या दिवशी संध्याकाळी नीलीच्या असंख्य प्रियकरांच्या संख्येत आणखी एकाची भर शशीने घातली होती. शशीला ते सारं आठवलं. निर्मला आणि प्रबोधशी बोलताना तो म्हणाला, ''नीली तर वेश्याच होती. कुठल्या नरकात जाईल कोण जाणे !''

''जाऊ द्या शशीभाई !'' निर्मलेने जांभई देत म्हटले, ''ती बिचारी मरून गेली. आता काय त्याचं ?''

''शशी, आज तू भलताच उखडलेला दिसतोस. तुझं मनही नीलीला इतकं विटलं असेल याची काही कल्पना नव्हती बुवा आम्हाला !'' प्रबोध म्हणाला.

''इतकं विटलं होतं की विचारू नकोस. तिच्याशी ओळख असणेच पाप होतं.'' शशी कडवटपणे म्हणाला.

पण त्यावेळी त्याला वाटलं की तोच चेहरा आपल्या निष्पाप दिसणाऱ्या मोहकपणे हसत त्याला विचारीत आहे– ''असं होय ? आणि तुमच्याशी ओळख होऊन मला पुण्यलाभच झाला नाही ?''

यामुळे शशीचा कडवटपणा अधिकच वाढला.

बोलण्यातून बोलणं वाढत गेलं आणि दीड वाजून गेला. एव्हाना गप्पा मारून तिघेही दमले होते. शशी उठून उठा राहिला, ''ठीक आहे तर मग. मी निघतो. आज

तर खूपच उशीर झाला.''

''दीड वाजून गेलाय.'' निर्मला पुन्हा जांभई देत म्हणाली.

शशीने आपल्या कोटाची कॉलर उंच करून आपली भरदार छाती झाकून घेतली. हात पसरून आळस झटकत तो म्हणाला, ''अजून मला किती दूर जायचंय आणि मूर्खासारखा मी इतका वेळ इथंच बसून राहिलो.''

''त्यात काय झालं ?'' प्रबोधनेदेखील शालीतून बाहेर पडून उभं राहात म्हटलं, ''दोन अडीच मैल चालणं म्हणजे तुझ्यासाठी काही फार नव्हे !''

निर्मलादेखील शाल बाजूला सारून साडी ठीकठाक करीत उभी राहिली. खिडकीतून बाहेर बघून म्हणाली, ''काय भयंकर अंधार आहे.'' मग थोड्या भावूक स्वरात म्हणाली, ''शशीभाई, आजची रात्र इथंच राहा ना. या अंधारात कुठं जाल ?''

''छे, छे !'' शशी हसत उत्तरला, ''ही मुंबई थोडीच आहे की टेलिफोन करून पटकन घरी सूचना देता येईल ? अजून घरी पोचलो नाही याचीच तिकडे सर्वांना काळजी वाटत असेल.''

''आणि म्हणे आपलं राज्य ! प्रबोध, उगाच आपण इथं आलो नाही ?'' निर्मला म्हणाली, ''रस्ताभर ब्लॅक आउटमुळे अजिबात कुठं प्रकाशाचा किरण नाही. जणू सारी लढाई इथंच होणार आहे. यापेक्षा मुंबई किती चांगली होती !''

''मुंबईइतक्या पगारात इथं किती थाटात राहतोय !'' प्रबोधने म्हटलं.

यावर निर्मला काही बोलणार होती. पण शशीने मध्येच तिला अडवलं. ''आता या वादात गुंतलो तर आणखी एक तास सहज निघून जाईल. थोड्या थोड्या दिवसांच्या फरकाने आपल्याला इथं नोकरी मिळून आपण सर्व जण पुन्हा इथं एकत्र जमलो ही ईश्वराची कृपाच समजा !''

''बिचारे मंगलभाई फक्त तिथे राहिले.'' निर्मलेने म्हटले.

''बरंय तर– मी निघतो आता.'' बोलून शशी चालू लागला.

निर्मला आणि प्रबोध त्याला पोचवायला दारापर्यंत आले. शांत, नीरव रात्र मूकपणे सरत होती. ताऱ्यांनादेखील जणू अंधाराने गिळून टाकले होते. साडी आपल्या अंगाभोवती घट्ट लपेटून घेत, वर आकाशाकडे पाहात निर्मला म्हणाली, ''शशीभाई, खरंच आज तुम्ही इथेच राहा. रात्र भयंकर आहे आणि थंडी पण खूपच आहे.''

''छे, छे, मी निघतो.'' म्हणत शशीने तिच्याकडे पाहिलं आणि जरासं स्मित करून दाराबाहेर पडला.

"बघ, वाटेत नीलीचा जास्त विचार करू नकोस." प्रबोधने हसत सूचना केली आणि मग दार लावून घेत म्हणाला, "शशीला थंडीने किंवा अंधाराने आजवर कधी अडवलंय ? मग आज कसला तो थांबतो ? मर्द गडी आहे. बघ तर खरं काय शरीर आहे त्याचं !"

"मला तर अशा वेळी जरासं जरी दूर जावं लागलं तरी इतकी भीती वाटेल की विचारू नकोस !" निर्मला म्हणाली.

आणि ते दोघे पुन्हा दिव्याच्या प्रकाशात शिरले.

इकडे शशीचा एकट्याचा प्रवास सुरु झाला.

त्याला दोन अडीच मैल जायचं होतं. काठियावाडच्या या छोट्याशा शहरात निर्मला आणि प्रबोध तीन चार महिन्यांपूर्वी रहायला आले होते आणि शशी दोन महिन्यांपूर्वी आला होता. निर्मला आणि प्रबोध गावाबाहेर दूरदूर बांधलेल्या क्वार्टरमध्ये राहात होते. आणि शशी होता शहरात. दोघांच्या घरामध्ये दोनअडीच मैलांचं अंतर होतं.

मधल्या एक मैलात तर अजिबात एकदेखील घर नव्हतं. ती जागा अगदी निर्जन होती आणि शहरातील लोक त्यास 'रण' म्हणायचे.

तो चालू लागला. त्याच्या पावलांच्या आवाजाने रात्रीची निःशब्दता मुखर झाली.

त्याच्या डोळ्यांसमोर दूर दूरवर अंधार पसरलेला होता. पुढे मागे, इकडे, तिकडे, नजर पोचत होती तिथवर अंधारच अंधार ! आणि अंधाराचीच मूक वाणी असल्यागत थंडी आपलं वर्चस्व स्थापन करीत होती.

शशी पुढे जात होता. रात्रीच्या अंधारापेक्षाही दाट अंधार त्याच्या मनात भरलेला होता... "का मी नीलीविरूद्ध इतका बडबडत राहिलो ? नीली दोषी असली तर मी तरी कुठं निर्दोष होतो ?"

का ? का ? का ?" त्याचं मन त्याला विचारू लागलं. या प्रश्नाच्या पकडीतून सुटण्यासाठी म्हणून त्याने मानसिकदृष्ट्या स्थिर होण्याचा प्रयत्न करीत आजूबाजूला आणि वर नजर टाकली.

कुठंही काहीच दिसलं नाही. फक्त अंधार होता आणि त्याला वाटलं हा अंधार यालाच गिळून टाकण्यासाठी आवासून उभा आहे.

तो पुन्हा विचारांत गढून गेला.

"गेल्या काही तासांत निर्मला आणि प्रबोध किती कमी बोलले होते. मीच मूर्खासारखा बडबडत राहिलो. नीलीवर मी अन्यायच केला नाही का ?"

"हो केलाय !" नीलीच उत्तर देत असल्याचा भास त्याला झाला. दचकून त्यानं समोर बघितलं. जणू नीली हसत, ठपका देत उभी आहे. पण डोळे फाडफाडून पाहिलं तरी त्याला काही दिसलं नाही. निव्वळ अंधार !

त्याचा धरकाप झाला. त्याने कोट आपल्या बळकट छातीशी घट्ट आवळून धरला. जणू थंडीनेच त्याला कापरं भरलं होतं.

तो पुढे चालू लागला. विचारांची साखळी पुन्हा जुळली. आपल्याच पावलांचा आवाज दुसऱ्याच्या पावलाच्या आवाजासारखा त्याला यापूर्वी कधीही वाटला नव्हता. पण आज त्याला वाटलं की पदध्वनी दुसऱ्याच कोणाचा तरी आहे आणि तो त्याचा पाठलाग करीत आहे. तो थांबला. दुसरा पदध्वनीदेखील थांबला. त्याने मागे वळून पाहिलं.

काहीसुद्धा नव्हतं. केवळ अंधक्कार !

त्याला स्वतःचाच राग आला. मी आजवर कधी कुणाला भ्यालो नाही. मग आज हे काय ? मला स्वतःचीच भीती वाटतेय का ? आणि नीली ? मी तिच्याविषयी खोटं थोडीच बोललो होतो ? ती होतीच वाईट !

"हो, ती तर वाईट होतीच. पण तुम्ही ?" पुन्हा तोच हसरा चेहरा गहन अंधकार भेदून त्याच्यासमोर येऊन हसू लागला.

त्याच्या नजरेपासून बचावण्यासाठी शशीने इकडे तिकडे बघितलं. तिकडेदेखील तेच डोळे, तेच स्मित, त्याच रेखा त्याला दिसल्या.

हा सर्व भ्रम असल्याचं त्याला ठाऊक होतं. त्याचं प्रक्षुब्ध मनच त्याच्या आजूबाजूला असले आभास निर्माण करीत असल्याची जाणीव त्याला होती. तरीसुद्धा त्या सावल्यांच्या आभासाने त्याला भय वाटलंच.

चालता चालता त्याच्या मनात आलं की कुणाची तरी सोबत असती तर काय बरं झालं असतं. मग त्याला कुठलाही भास झाला नसता.

पण चार पावलं जाताच पुन्हा त्या आभासांनी त्याला घेरलं.

"किती थंडी आहे ?" त्याने आपल्या कंपित मनाला विचारलं.

"खूप— खूपच." उत्तर आलं.

जास्त विचार करायच्या भानगडीत न पडता तो माघारी वळला. प्रबोधच्या घरापासून तो फार लांब गेला नव्हता. त्याचं घर ओळखून तो उतावीळपणे चालू लागला.

तिथेसुद्धा अंधार झाला होता. त्या लोकांनी दिवा मालवला होता. हाक मारावी

की नाही या विचारात तो थोडा वेळ तसाच उभा राहिला. पण संतृप्तीच्या क्षणांत त्याने आपल्या चित्तात संचित करून ठेवलेलं नीलीचं मोहक हास्य त्याला पुन्हा ऐकू आलं, तेव्हा त्याने हाक मारली– ''प्रबोध ! निमुताई !''

आतून झोपाळू स्वरात उत्तर आलं– ''कोण आहे ?''

''मी आहे.''

''कोण शशीभाई ?'' आतून पावलांची चाहूल ऐकू आली. क्षणानंतर तो प्रबोधच्या खोलीत होता.

''काय झालं शशी ? परत का आलास ?'' प्रबोधने विचारलं. माणसं पाहून शशीचं भय नाहीसं झालं. तो म्हणाला, ''थंडी खूप आहे. म्हणून म्हटलं तुझी शाल घेऊन जावं.''

येताना शशीचा चेहरा पाहिला म्हणून म्हणा किंवा आणखी कुठल्या कारणाने म्हणा निर्मलेनं म्हटलं, ''अजूनही माझं ऐका शशीभाई, आजची रात्र इथेच राहा. थंडी आणि अंधार दोन्ही विलक्षण आहे.''

''नाही, वाटेल ते झालं तरी मला जायलाच हवं.'' आपण क्षणभर तरी कसे काय घाबरतो ते आता शशीला स्वतःलाच समजेनासे झालं होतं. स्वतःला मनातल्या मनात का होईना पण तो दुर्बल मानायला तयार नव्हता.

निर्मलेने पुन्हा त्याला थांबण्याचा आग्रह केला. प्रबोधनेदेखील तिचीच री ओढली. पण शशी थांबला नाही. शाल अंगावर व्यवस्थित लपेटून घेत तो पुन्हा निघाला.

पुन्हा त्याच निःशब्द, निस्तब्ध रात्रीनं त्याचं स्वागत केलं.

पण आता त्यानं भीतीला पार पळवून लावलं होतं. आता भ्यायचं नाही असा निश्चय करून टाकला होता. याच विचारात दंग होऊन त्यानं प्रबोधच्या घराच्या प्रकाशातून बाहेरच्या अंधारात प्रवेश केला. आणि जलदीने चालू लागला.

त्याच्या मनात अजूनही विचार चालले होते. नीलीदेखील त्या विचारात गुंफलेली होती. तरी आता मात्र त्याला भीती वाटत नव्हती.

''मी घाबरलो होतो ?'' तो स्वतःशीच हसला. ''अशा कित्येक अंधाऱ्या रात्री मी घालविल्या आहेत. यात भिण्यासारखं काय होतं ?''

नीलीच्या बाबतीतही तो आता स्वस्थपणे विचार करू लागला. ''इतरांसाठी ती कशी का असेना. पण माझ्यावर मात्र तिचं प्रेम होतं. हो. खरंच प्रेम होतं.'' या विचाराने त्याचा पुरुषी अहंकार तृप्त झाला.

असाच विचार करत करत तो वस्ती पार करून आला. आता 'रण' सुरू झालं.

अंधार तर इथंदेखील तितकाच होता. पण पहिल्यापेक्षा अधिक दाट वाटला. आणि आजूबाजूला घरं नसल्यानं थंडीला आणखी जोर चढला होता यात शंकाच नव्हती.

"तुला आठवता आठवता एखाद्या ओसाड जागी जर मी मरून गेले तर काय बहार होईल." त्या निर्जन जागी पोचताच त्याला नीलीचे शब्द आठवले.

"अखेर बिचारी खरंच मरून गेली. मरताना तिनं माझी आठवण केली की नाही कुणास ठाऊक ! पण बिचारी क्षयासारख्या राजरोगानं झिजून झिजून मेली. अखेरच्या दिवसांत तर मी तिला पाहिलंच नाही. कशी दिसत असेल त्यावेळी ती ?"

नीलीचं अखेरच्या दिवसांतलं एक भयंकर रूप त्याच्या कल्पनेत साकार होऊ लागलं. डोळे खोबणीत गेलेले. चेहरा भयंकर. त्या कल्पनेनेच तो दचकला. अचानक त्याच्या तोंडून किंकाळी फुटली आणि तो थबकला. त्याच्या पायाखाली काहीतरी आलं होतं. आणि तो एकाएकी बॉंबगोळ्यासारखा उडाला होता. भुंकणाऱ्या आवाजावरून तो कुत्रा असल्याचं त्याने ओळखलं होतं. पण ते ओळखूनदेखील त्याच्या हृदयाची धडधड काही थांबली नाही. कुठल्या तरी अकल्पित भयाने त्याला ग्रासून टाकलं.

पुन्हा त्याला प्रेतछाया दिसू लागल्या.

"कशी दिसत असेल नीली ?" त्याने भीत भीत विचार केला आणि त्याला वाटलं की क्षणापूर्वी क्षयग्रस्त नीलीची त्यानं जी कल्पना केली होती त्यापेक्षाही भयंकर रूप धारण करून नीली त्याच्यासमोर येऊन उभी राहिली आहे आणि आपले मोठमोठाले दात विचकून खो खो करून खिदळत आहे.

शशीने डोळे मिटून घेतले. पुढे जाण्यासाठी पाऊल टाकायचा प्रयत्न त्याने केला. पण पायात मणामणाच्या बेड्या पडल्यासारखं त्याला वाटलं. त्याने डोळे उघडले. काहीसुद्धा नव्हतं. फक्त अंधार. पण तो अंधार आता त्याला पहिल्यापेक्षाही जास्त भीतिदायक वाटू लागला.

लवकर घरी पोचण्यासाठी त्याने धावायला सुरुवात केली. थोडा वेळ धावलादेखील. पण मग त्याला भास झाला की आपल्यामागून आणखीही कुणीतरी धावत येत आहे. पण मागे वळून पाहण्याची त्याची छाती झाली नाही.

लहानपणापासून शशी अनेक प्रकारच्या भीतींना आपल्या चेतन मनातून आतल्या अवचेतन मनात लोटीत आला होता. आज अचानक त्या सर्व अवचेतन मनातून बाहेर पडून चेतन मनात येण्यासाठी घाईगर्दी करू लागल्या.

पायांना भेगा पडलेल्या असाव्यात आणि त्यात काटा बोचावा. शशीच्या बाबतीत अगदी तसेच झालं. थोड्या वेळापूर्वी प्रबोधपाशी बोललेलं आपलंच एक वाक्य त्याला आठवलं,

"नीली मंगलला इतकी सतावायची की भूत होऊन त्याच्या पाठी लागली नाही हे आश्चर्यच म्हणायचं !"

नीली जर खरंच भूत झाली असली तर ? या सर्व तिच्याच कारवाया असल्या तर ? शशीचा तसा भुताखेतांवर विश्वास नव्हता. या क्षणीदेखील हे सर्व आपल्या मनाचे खोटे आभास आहेत असेच तो समजत होता. तरीसुद्धा कल्पनेनं त्याला पंगू करून टाकलं.

जिवाच्या आकांतानं तो पळत होता. कशी कोण जाणे त्याला रामरक्षा आठवली होती. तो त्यातील श्लोक मनातल्या मनात म्हणत होता. शहर जवळ येत होतं पण स्मृती त्याचा पिच्छा सोडत नव्हत्या.

त्या दिवशी संध्याकाळी नीली शशीकडे आली तेव्हा गर्वामुळं का होईना तिनं शशीला आवरायचा खूप प्रयत्न केला होता.

"जर काही केलं तर तुम्हाला मंगलची शपथ !" तिनं म्हटलं होतं.

पण शशीने तिला अजिबात दाद दिली नव्हती. "आणि तरी आज स्वतः पावित्र्याचा टेंभा मिरवून मला मात्र पापी म्हणत होती. का ?"

शशीला वाटलं नीली बिकट हास्य करीत आपल्यासमोर येऊन म्हणत आहे, "मित्रद्रोही ! हरामखोर !"

त्याचा श्वास जोरजोराने चालू होता. तरीदेखील शाल अंगाभोवती लपेटून घेत तो पुढे जात होता. अचानक त्याला वाटलं की समोर थोड्याच अंतरावर विशाल वृक्षासारखं काहीतरी उभं आहे. या जागी तसलं काही नसल्याची त्याची खात्री होती. तर मग हे काय आहे ? त्याने वरच्या बाजूला नजर टाकली ? त्या वृक्षावर बसलेली, रसरशीत, तरुण, देखणी नीली त्याला आपल्या बाहुपाशात बोलावत होती. डोळे मिटून तो चालू लागला. थोडं दूर गेल्यावर त्याच्या लक्षात आलं की तो वृक्ष नव्हता तर माणिक चौकातला खांब होता. झाडझुडूप काहीसुद्धा तिथं नव्हतं.

मग तर तो पाठीला पाय लावून घरापर्यंत धूम पळतच गेला.

ज्या वेळी तो घराशी पोचून दार वाजवीत होता त्याचं सारं अंग थरथरत होतं. इतकी थंडी असूनसुद्धा तो घामानं डबडबला होता.

त्याला पाहताच त्याची बायको म्हणाली, "अरे देवा ! तुम्हाला तर थंडी बाधलेली

दिसते. सारं अंग थरथर कापतंय.''

''कुठं काय ? मला जरा झोपू दे.'' असं बोलून तो धाडदिशी अंथरुणावर पडला.

शशी खरंच भ्यायला होता. रात्री अर्धवट झोपेतदेखील त्याच्या मनात नीलीचेच विचार येत होते. तिचीच स्वप्नं पडत होती.

पहाट झाली. तो अजून अर्धवट झोपेतच होता. त्याची बायको त्याच्या कपाळावर पाण्याच्या घड्या ठेवीत होती. कारण शशीला ताप चढला होता. रात्रीदेखील तो एक दोनदा दचकला होता.

शशीने डोळे अर्धवट उघडून एकदा पाहिलं आणि मग लगेच डोळे गप्पकन मिटून घेतले. त्याने जबरदस्तीने बायकोचा हात आपल्या कपाळावरून बाजूला सारला.

''अजून माझा पिच्छा सोडत नाहीस ? जीव का घेणार आहेस माझा ?''

बायकोने कापडाची घडी पाण्यात भिजवून त्याच्या कपाळावर ठेवली. मस्तकावर प्रेमळपणे हात फिरवीत तिने विचारले, ''झालंय तरी काय तुम्हाला ? कालरात्रीपासून हे असं काय बोलताय ?''

शशीने डोळे सताड उघडले. तेच घर. तीच प्रेमळ पत्नी, उन्हाची सुखावणारी ऊब– सारं काही त्यानं नजरेनं टिपलं. इतका वेळ त्याच्या डोळ्यांत सामावलेली नीलीची प्रतिमा आपोआप अदृश्य झाली. त्याने पुन्हा डोळे विस्फारून पाहिलं. नीली तिथं नव्हती. तिचं विषारी स्मितदेखील नव्हतं. तिथं फक्त त्याची प्रेमळ पत्नी होती त्याचं घर होतं आणि सूर्याचे किरण होते.

उठून बसत त्याने विचारलं, ''तुला काहीच दिसलं नाही ?''

''मला काय दिसणार आहे ? मला तर तुम्हीच काय ते दिसता. असे काय हो बघताय ?'' बायकोनं विचारलं.

शशीने एक निःश्वास सोडत म्हटलं, ''काही नाही.''

भित्र्या डोळ्यांनी त्यानं खोलीच्या त्या कोपऱ्याकडे पाहिलं. जिथं रात्रभर त्याला नीली विविध रूपांत दिसत होती. कोपऱ्यात एका सुंदरीचा फोटो नेहमीसारखा टांगलेला होता.

डोळे मिटून तो पुन्हा बिछान्यावर कलंडला.

पत्नीचा कोमल स्पर्श त्याच्या तृप्त शरीरावर शीतल शांतीचा वर्षाव करीत राहिला.

# वात्रकच्या काठी

□ पन्नालाल पटेल

संध्येनं आज आकाशाला भगव्या रंगात पुरतं रंगून टाकलं होत. संथपणे वाहणाऱ्या वात्रक नदीच निळं पाणी लाव्ह्यासारखं झालं होत. उजव्या काठाच्या टेकडीवरील एकुलत्या घराचं छप्पर सोनेरी पाण्यानं न्हाऊन निघाल्यासारखं वाटत होतं. पलिकडच्या डोंगर पायथ्याशी उडणारी गोधूलदेखील क्षणभर गुलाल बनली होती. फार काय कार्तिक महिन्यातल्या कडक थंडीलादेखील आजच्या सांजवेळेनं जणू गुलाबी करुन टाकलं होतं.

टेकडीवरल्या त्या घरासमोर शेळ्यामेंढ्यांच्या बें बें ओरडण्याचा आणि गायी म्हशींच्या हंबरण्याचा गोड कोलाहल माजला होता. पण तो कोलाहल थोडाच वेळ राहिला. मोठी गुरं गोठ्यात बांधली गेली आणि शेळ्यामेंढ्यांना अठरा एकोणीस वर्षाच्या एका तरुणीनं बाहेरच्या आवारात कोंडून टाकलं. आवार बंद करुन तिनं पाठ फिरवली तोच लक्ष हरबऱ्याच्या शेतापलीकडे नदीकाठी गेलं.

आपला प्रकाश फैलावण्याचा प्रयत्न करीत एक छोटीशी आगटी तिथं पेटली होती. काळ्या कुळकुळीत दाढी-मिशा, गलमिशांपेक्षा थोड्या लांब जटा, आणि भगव्या वस्त्राची गाठ गळ्यात बांधून ते अर्धवट नेसल्यासारखे व अर्धवट पांघरल्यासारखे केलेले दोन साधू दिसले. त्यांच्यापैकी एकजण घड्यासारख्या तुंबटीत पाणी भरुन लंगडत किनाऱ्याकडे येत होता आणि दुसरा आगटीपाशी आपला चिमटा रोवण्याचा प्रयत्न करीत होता. त्याचबरोबर तो आगटीत मोठीमोठी लाकडंदेखील सरकावीत होता.

"काय बघतेस, नवल ? गाय हंबरतेय ते ऐकू येत नाहीय वाटतं ?" ओसरीच्या एका कोपऱ्यातून एक म्हातारी, गुराढोरांसाठी उकडलेल्या धान्याचा भरडा गार करीत म्हणाली. पण नंतर मात्र ती देखील त्या नदीकाठी नजर टाकून त्या साधूंना बघू लागली.

"तसं काही नाही मावशी, पण या मेल्यांना याच जागी येऊन धुनी पेटवायचं का सुचलं ?" नवलच्या स्वरात बालिशपणा होता. सहजपणा होता. पण नदीकाठी

टक लावून पाहणाऱ्या तिच्या डोळ्यात आणि नाजुक चेहेऱ्यावर मात्र पूर्ण गांभीर्य होत आणि ते क्षणोक्षणी वाढतच होतं.

"असेल, आम्हाला काय त्याचं? कोल्ह्याचा काळ आला म्हणजे तो शहराकडे धावतो. गेल्या वर्षी एका डोंबाऱ्याला याच जागी पकडलं होतं हे या मुर्दाडांना माहीत नाही वाटतं. गेल्या तीन वर्षापासून सरकारची वक्रदृष्टी या घराकडे लागलेली आहे...."

मावशीच्या बोलण्याकडे नवलचं लक्ष असतं तर कदाचित तिला हसू आलं असतं. या बिचाऱ्यांना काय माहीत की या घरातला माणूस तीन वर्षापूर्वी पाटलाच्या पोराचा खून करुन पळून गेलाय म्हणून !

त्याच दोघा व्यक्तीकडे नवलचं लक्ष लागून राहिलं होतं. ती अंगणातून शेण गोळा करीत होती, पण यंत्रवत !

मावशी बडबडत होती- "आणि तो मेला पळून गेला तो गेलाच. पकडाला गेला असता तर निदान अशी ही गरीब बिचारी माणसं तरी जाळयात अडकली नसती. त्याने तर ही (नवल) कुठवर वाट पाहात राहील याचादेखील जरा विचार केला नाही."

मावशीचं बोलणं बहुतेक असंबद्ध नाहीतर उलटसुलट असायचं. आंबोण भरलेली टोपली उचलून ती नवलला म्हणाली, "घे हे आंबोणे चांदरी (म्हशी) ला पटकन घालून ये बघू." मग जाता जाता म्हणाली, "हे असले डांबरट मेले चिक्कार हिंडत असतात."

नवलला म्हणायचं होतं- "पण मावशी ही माणसं तर आपल्याच घराविषयी बोलत असल्यासारखं वाटतंय. बघ ना. याच बाजूला तोंड करुन विडी ओढत बसले आहेत." पण का कुणास ठाऊक आज मावशीसमोर असं बोलायची तिची हिंमत झाली नाही. शिवाय अशा गोष्टीपासून फायदा काय ?

आंबोणीची टोपली नवल गोठ्यात घालून आली. मग काही सुचेना तेव्हा ओसरीच्या चबुतऱ्यावर जाऊन बसली. कामाचं निमित्त पुढे करायला तिने गुरांना बांधण्याची दावणी उचलून घेतली आणि त्याला गाठ मारु लागली. पण तिचे डोळे मात्र नदीकडेच खिळलेले होते.

एकदा तर तिच्या मनात असंदेखील आलं की मावसा आलेले असते तर त्यांनाच पाठवून विचारपूस केली असती... इतकं मोठं जग आहे. पलीकडे समोरच कालीमातेचं देऊळ. आहे, अवघं गाव आहे. पण इतर कुठेच न जाता माझ्याच

उरावर, समोर धुनी पेटवायचा अर्थ काय आहे? नाहीतर हे देखील हेर तर नाहीत ?

तेवढ्यात मावसा येताना दिसले. गाईगुरांना चारुन त्यांनी अगोदरच घराच्या दिशेनं हाकून दिलं होतं आणि स्वतः बैलांना शेताच्या बांधावर चारण्यासाठी मागे राहिले होते. आता ते घोड्यांसारख्या दोन बैलांबरोबर येत होते. त्यांना बघताच नवलने त्यांना आठवण करुन दिली-" बघा काका, इथं कुणीतरी मुक्काम केलाय."

पण मावसानं लक्ष दिलं नाही- "करु देत. आपलं काय खाताहेत?" असं बोलून ते बैलांच्या पाठोपाठ घरात निघून गेले.

नवलला आज- या क्षणी- स्वतःचंच आश्चर्य वाटू लागलं. आज का बरं तिला त्या अविचारी, खुनी माणसाची आठवण होतेय ? ते देखील तीन वर्ष निघून गेल्यावर ? इतकचं नव्हे, नवलला आज आपल्या पहिल्या पतीचीदेखील आठवण होऊ लागली. तो आठ वर्षापूर्वी नाराज होऊन कुठं निघून गेला होता. आजवर कधीही दोघा पतीची आठवण एकदम झाली नव्हती. पण आज या दोघा साधूंना पाहून मात्र तिला आपले दोन्ही पती एकदमच आठवू लागले. अरेच्या, तिच्या मनातून तिचा पहिला सुंदर पतीच नव्हे तर दुसरा खुनी पतीदेखील दूर गेला होता !

वाढत चाललेल्या अंधारात ते दोघे साधू आपल्याच दिशेने येत असल्याचं तिला दिसलं. ती उभी राहिली. दाराशी जाऊन जरा अडखळली आणि मग घरात निघून गेली.

का कोण जाणे पण अठ्ठावीस वर्षाच्या हयातीत आज पहिल्यांदाच नवलला भीती वाटली. मनातल्या क्षोभाला तर सीमाच नव्हती. घरात जाऊन तिनं आपल्या हट्टी मनाला समजावलंदेखील- "ते दोघे चांगले धडधाकट आणि दुसऱ्या तरुणांसारखे होते पण हे मात्र ... दिसत नाही, त्याच्यापैकी एकजण लंगडा आहे. आणि दुसरा.... तो तर अशक्त होता पण हा चांगला गलेलठ्ठ आहे !"

मावसा मावशी दोघे नवलचे पालक होते तसेच आश्रितदेखील होते. वडिलांच्या मृत्यूनंतर नवलला आधाराची गरज भासली तेव्हा तिने मावसा मावशीला आपल्याकंडे बोलावून घेतलं होतं. मावशीला चार सुना होत्या. पण एकही त्यांना आपल्यापाशी ठेवयला तयार नव्हती. म्हणून हे म्हातारं जोडपं निराधार पडलं होत. नवलच्या आश्रयाला राहिल्यानं ते नवलचा आदर करायचे. तिच्या मताला मान द्यायचे तिला एखाद्या गोष्टीचा उदाहणार्थ- पुनर्विवाहाविषयी, सल्ला द्यायचे तर तो देखील तिची मर्जी पाहून ! पण आज या घराची मालकीण नवल स्वतःच त्यांना घाबरु लागली होती- विशेषतः मावशीला !

नवलला उगाचच घरात इकडून तिकडे फेऱ्या मारताना पाहून दूध काढता काढता मावशी म्हणाली, "अंधारात काय करतेस माझे बाई? जरा दिवा तरी लाव."

नवल जणू भानावर आली. दिवा पेटवून तिने तो गोठ्याच्या आणि घराच्या उंबरठ्याच्यामध्ये बांधलेल्या गुडघ्याएवढ्या उंचीच्या एका ओट्यावर ठेवून दिला. आतून तांदूळ आणून ते पाखडले. मग दारापाशीच असलेल्या चुलीसमोर बसून चुलीच्या आगीच्या उजेडात तांदूळ निवडू लागली.

चवरीत दूध घालायला जाता जाता मावशीच्या मनात आलं की नवलला सांगावं, "चुलीच्या उजेडात का कुणी तांदूळ निवडतं?" पण ती काही बोलली नाही. बाहेर कुत्रा भुंकायला लागला होता आणि त्या आवाजाने मावशी चिडली होती- "हे मेलं कुत्र रात्रंदिवस नुसतं ओरडत असतं."

लाडकी नवल जर यावेळी आपल्या नेहमीच्या मनःस्थितीत असती तर मावशीला नक्कीच म्हणाली असती " तू तरी काय कमी ओरडत असतेस मावशी? चोर दिवसा तुला घाबरतात आणि रात्री या कुत्र्याला!" पण समाधिस्थ योग्यासारखं नवलचं यावेळी लक्ष नव्हतं. अवघा नदीकिनारा दणाणून सोडणारं कुत्र्याचं भुंकणंदेखील तिला ऐकू येत नव्हतं.

पातेलीत तांदूळ वैरणाऱ्या नवलच्या कानावर नव्हे तिच्या थेट हृदयावर एक आवाज धडकला. अंगणातल्या दगडावर टकटक करणारा काठीचा आवाज. एका माणसाच्या जोड्यांचा आवाज आला तेव्हा न बघताच नवलने ओळखलं की लंगड्या साधूच्या पायात जोडे घातलेले नाहीत. पहिला आवाज आला- "जय सीताराम काका!"

एकाएकी नवलच्या अंतरात्म्याने म्हटलं," एक तर तोच आहे. हा त्याचाच आवाज आहे!"

दाराजवळ पडलेल्या दोन खाटांच्या मधल्या जागेत मावसा शेकोटी पेटवत होते. साधूंचे स्वागत करीत ते म्हणाले, या महाराज, या बसा."

एका साधूने एक खाट उचलून समोरच्या बाजूला टाकली आणि मग शेकोटी व दाराकडे तोंड करुन पुटपुटला, "इथं, एकाच खाटेवर बसू. "लंगडा पण त्याच खाटेवर पायथ्याच्या बाजूला बसला."

शेळ्यामेंढ्यांच्या आवारासमोर बांधलेल्या कुत्र्याने भुंकायचे सोडून गुरगुरायला सुरुवात केली होती. घरात मावशीची बडबडदेखील सुरु झाली होती. "येऊन जाऊन नुसतं सीताराम म्हणायला येतं. आयत्या बिळावरचे नागोबा कुठले गिळायचं आणि

भटकायचं....!''

नवलचे कान बाहेरच लागलेले होते. चुलीत लाकडं कोंबीत ती ऐकत होती- त्या दोघांपैकी एकजण, ज्याला ती आपला पहिला पती समजत होती, तो मावशाला विचारीत होता- ''किती मुलं आहेत ? चौघापैकी एकही इथं नाही? एकही सून घरात ठेऊन घ्यायला तयार नाही ? तुम्ही दोघंच काय ते इथं आहात ? अस्सं ? या घराची मालकीण तुमची भाची आहे होय ?- बाई एकटीच आहे ?''

मांजरीसारखे डोळे फिरवीत मावशी दारात उभी होती. बोलल्यावाचून तिला राहावलं नाही. ''काय हो बाबाजी ? तुम्हाला या चांभार चौकशा कशापायी ?'' आणि कमरेवर हात ठेवत ती त्या साधूसमोर जाऊन उभी राहिली.

''तसं काही खास कारण नाही. प.... पण सांसारिक लोकांशी आणखी काय बोलणार ?'' शक्य तितक्या गोड आवाजात साधूने म्हटलं.

राग गिळून उभ्या असलेल्या मावशीचा स्वरारोहणाचा बेत होता. पण साधूबाबाच्या या थोड्याशाच बोलण्याने त्यांना शेकोटीपाशी बसून गप्पा मारु लागली.

''चुलीत केले ते अवतार आणि हा संसार ! बाबाजी, देवाघरी शंभर मण तेल असूनही अंधार आहे. नाहीतर ...'' आणि अंधाराचा फायदा घेऊन दोन्ही दारांच्यामध्ये येऊन बसलेल्या नवलकडे खूण करीत ती म्हणाली, ''या आमच्या नवलचंच पाहा ना ! पाच भावांच्या मृत्यूनंतर एकटी उरली. आईदेखील लहाणपणीच वारली आणि हिच्या नशिबाने बापसुद्धा असा होता की त्याचं अख्ख्या गावाशी वैर होतं. आता तुम्हीच सांगा बाबाजी लेकीसाठी बाहेरचंच स्थळ शोधावं लागणार ना? आणि मग घरजावई होऊन रहायला कोण तयार होतं ? ज्याचं कुठचं लग्न जमत नसेल किंवा तो हलक्या कुळातला असेल तोच काय घरजावई व्हायला तयार होतो.'' मावशी डोळे विस्फारुन थोडा वेळ काहीतरी बघत राहिली. मग म्हणाली,'' आणि झालंही तेच. हिच्या नशिबाने नवरा मिळला तो होता बेकार ...''

''बेकार का म्हणून माई ?'' पहिल्या साधूला विचारावंच लागलं.

'' का ... का म्हणून काय ?'' त्याच्या आईबापांचा काही ठावठिकाणा नव्हता. तो मामाच्या घरी रहायचा असं म्हणतात. त्याने कुठल्याशा जत्रेत आमच्या नवलला पाहिलं म्हणून माझी लेक सांगत होती. ...'' अचानक म्हातारीच्या भुवया ताणल्या गेल्या. '' हालकट, पाजी, बेशरम कुठला ! सारी लाजलज्जा सोडून इथं येऊन घरजावई होऊन राहिला. आता तुम्हीच सांगा बाबाजी, बेकार नसता तर तो का

म्हणून इथं येऊन राहिला असता? शिवाय काही एक कामकाजाचा नव्हता. नुसतं बोलणं तेव्हढं ऐकून घ्या. आणि तुम्हाला तर माहीत असेल, आम्हा शेतकऱ्यांना दिवसाकाठी दीड शेर घाम गाळावा लागतो. पण याचा आपला साहेबी थाट ! आमच्या मेव्हण्यांना हे सहन होणं कसं शक्य होत ? त्याचा इतका खर्च ... आणायचा कुठून ? रोज सकाळी एक रुपया तर त्यांना नुसत्या अफूसाठी लागायचा. म्हणून सासऱ्या-जावयाचं अजिबात पटत नव्हतं. अखेर एकेदिवशी दोघांची जुंपलीच. सासऱ्याने हात टाकला आणि जावयाच्या जिभेने ताळ सोडला. इतकं सारं होऊनसुद्धा त्या मेल्याला इतका राग आला की त्याच रात्री त्यानं तोंड काळ केलं. मामाच्या घरीदेखील चौकशी केली. पण तो तिथंही नव्हता. मेला पाताळातच गडप झाला जसा काही !''

पहिल्या साधूने निःश्वास टाकला. पण लंगडा जरा रागेजल्या डोळ्यांनी त्याच्याकडे बघू लागला आणि मग भान हरपून उद्गारला, ''त्यानेच तर हे सर्व घडवून आणलं !''

''होय बाबानो.'' वेळेवर सुरात सूर मिळवून, खूष झालेल्या म्हातारीने त्याच्याकडे प्रेमळ नजरेने पाहिलं, पण पहिल्या साधूने लंगड्याला कोपरखळी मारली आणि लंगड्याचं बोलणं जणू आपल्याला आवडलं नसल्यासारखा चेहरा केला. लंगडा सावध झाला.

म्हातारी आपल्याच तंद्रीत होती - ''तरीसुद्धा बाबाजी माझ्या नवलने आज उद्या करता करता पुरती चार वर्षे त्याची वाट पाहिली.......'' आणि मग मान हलवीत स्वतःशीच पुटपुटल्यासारखी ती पुढे म्हणाली, ''शेवटी निराश होऊन दुसऱ्या एकाशी लग्न केलं. पण तो मेलादेखील बाहेर गावचाच होता. पण त्याचं कुणी नात्याचं तरी होतं. त्याला सात भाऊ आहेत आणि आईवडिलदेखील जिवंत आहेत असं कुणीतरी सांगत होतं. खरं. पण स्वभाव भारी उग्र होता म्हणे. कशावरुन तरी भावाचे भांडण झालं आणि स्वारीने घर सोडलं. भटकता भटकता त्याचे ग्रह त्याला इथं घेऊन आले. आता तो भागीदार म्हणून इथं आला होता की आमच्या मेव्हण्याचं मन रिझवायला म्हणून आला होता कुणास ठाऊक ? दुसऱ्याच वर्षी भागीदाराचा घरजावई झाला !

'' बाबाजी, त्याला तर मी सुद्धा एकदा पाहिलं होतं.'' म्हातारीच्या चेहेऱ्यावर थोडा आंनद झळकला. ''मी तर पाहताक्षणीच ओळखलं होतं. की हा कामाचा माणूस आहे. पण खायचा मात्र गाडाभर ... राक्षसासारखा खातच सुटायचा ! आणि जीभ

बघावी तर ही इवलीशी. दोनदा विचारावं तेव्हा कुठं एकदा उत्तर मिळायचं. आता तुम्हीच सांगा, नवलच्या बापाला तो का म्हणून आवडला नसता ?''

म्हातारी अजून आपल्याच नादात होती - ''आणि महाराज माझी नवल तर अशा गाईसारखी आहे की कुठल्याही दावणीला बांधा हूं की चूं करणार नाही. आपण भलं, आपलं काम भलं की आपल्या अफूबाज बापाची चाकरी भली ! दोन दोन जावई या घरात राहिले पण हिचं एकाशीही कधी जरासुद्धा भांडण झालं नाही.'' म्हातारीचा आवाज मंद होऊ लागला- ''पण तो मेला देवच हात धुऊन या बिचारीच्या मागं लागला होता. इतके प्रयत्न करुनही त्याने काही हिला सुख दिलं नाही. कुणास ठाऊक का. ...'' आणि मग तर शब्दांऐवजी रुदनानेच ती आपलं म्हणणं सांगू लागली.

मावसादेखील डोळे पुसू लागला. दाराआड बसलेल्या नवलचे डोळे तर कोण जाणे केव्हापासून पाझरत होते. कुणी नीट पाहिलं असतं तर त्याला लंगड्या साधूचे डोळेही डबडबलेले दिसले असते.

म्हातारीकडून सारी हकीकत काढून घेणारा साधूदेखील बेचैन झाला होता. ''हं, तर पुढं काय झालं माई ? पुरत सांगा ना.''

''काय पुरतं आणि काय अपुरं बाबाजी !'' पुटपुन मावशीने दीर्घ श्वास घेतला आणि बोलणं पुढं चालू केलं - ''समोरच्या गावच्या पाटलाने आमच्या मेव्हण्याचा एक माणूस मारला होता म्हणून त्याच्याशी जुनं वैर होत. वीस वर्षापासून त्या दोघांमधून विस्तव जात नव्हता. तरीसुद्धा.... पाटलाच्या त्या हलकट पोराचे ग्रहच फिरलेले असावेत म्हणून तीन वर्षापूर्वी चार्तुमासात भरलेल्या एका जत्रेत त्याने नवलला छेडले.''

मावशीने दीर्घ उसासा सोडला आणि पुन्हा आपल्या जीर्णशीर्ण भात्यात हवा भरुन म्हणाली, ''त्या रात्री नवलचा बाप ऊर बडवून रडला होता असं म्हणतात. ज्या लोकांनी ऐकलं होतं ते आजही सांगतात की झिमझिम पाऊस पडत होता आणि अंधाऱ्या रात्री म्हाताऱ्याचं रडणं असं वाटत होतं जणू नदी पडल्याचं रानच विलाप करीत होतं. इकडे आपल्या मृत भावाचं स्मरण करुन नवलदेखील आकांत करीत होती.... म्हणतात की नवल रडत नव्हती तर असं वाटत होतं जणू वात्रक नदीच कढ येऊन क्रंदन करीत होती.''

म्हातारी पुन्हा स्वगत भाषणाच्या आविर्भात मान हालवू लागली. म्हणाली, ''असचं झालं असेल. म्हणूनच तर जावयाच्या - त्या परक्या माणसाच्या हृदयात

आगडोंब उसळला असेल. असं म्हणतात की तो सरळ जत्रेतून निघाला. दाट अंधारात त्याने नदीच्या पाण्याची देखील पर्वा केली नाही. आणि पाटलाच्या घरी वरच्या माडीवर झोपलेल्या आपल्या दुश्मनाला उठवून त्याला मारुन टाकलं. घरी परतून तो सासऱ्याला ही आनंदाची बातमी सांगू लागला. पण तेवढ्यात नवलने त्याच्या तोंडावर हात ठेवून त्याला उलट पावली रानच्या दिशेनं घालवून दिलं आणि म्हणाली, "जा देव तुमचं रक्षण करो." आणि तेव्हापासून तो जो गेला तो गेलाच. आजवर त्याचा पुन्हा पत्ताच नाही."

सुस्कारा सोडून मावशीने पुन्हा म्हटलं, "आज उद्या करताकरता तीन पावसाळे गेले. बाबाजी ! त्या पळपुट्याचाही काही पत्ता नाही की नवलही पुन्हा संसार मांडायचा काही विचार करीत नाही."

त्याच वेळी नवलचा व्याकुळ स्वर आला - "मध्यरात्र झाली मावशी. जेवणार कधी ?" मावशी जरा दचकून उभी राहिली तशी ती म्हणाली, "यांना शेरभर तांदूळ द्यायचे असतील तर देऊन टाक आणि बाहेर घालवून दे."

पण साधू विचलित झाले नाहीत. तांदूळ मिळूनही ते उठले नाहीत.

नवलने मावशीलादेखील जेवायसाठी आत बोलवून घेतलं. तरीदेखील ती लोचट माणसं उठली नाहीत.

आणि नवलला बाहेर येऊन त्यांना सांगावंच लागलं," का उगाच मृत्युच्या दारी बसलात ?"

" आम्हांला तुझ्याशी काही बोलायचंय. काही विचारायचंय." खूष होऊन पहिला साधू म्हणाला आणि शेकोटीच्या प्रकाशात उभ्या असलेल्या, ऊन-सावली सारख्या भासणाऱ्या नजरेला नजर कशी द्यावी याचा विचार करु लागला.

दुसरीकडे लंगड्या साधूचे डोळे बेचैन दिसत होते आणि नजरेनंच तो नवलच्या देहाची मोजमापे घेत होता. त्याला म्हणायचं होतं - "तू पोटभर जेवतेस तरी का नवल ? बघ ना. किती सुकून गेली आहेस तू !" पण त्याच्या तोंडून शब्द निसटले, "अगोदर हे सांग तू आम्हांला ओळखलं आहेस् की..."

त्या निष्पाप, निर्मळ आवाजाकडे वळणाऱ्या नवलच्या डोळ्यात स्नेहाचा पूर लोटला आणि ओसरला. काहीशा दयाळू , दुःखी नजरेनं पहात तिने विचारलं, "हो, पण हा पाय कुठ घालवलात ?"

" तो तर घालवला..." त्याला आपल्या प्रश्नाचं उत्तर जाणून घ्यायची घाई होती. म्हणून तो म्हणाला, " खुनाच्या त्या रात्री धावता धावता पण अगोदर तू आपली

गोष्ट. ...''

नवल निर्दय झाली स्वतः प्रतीच फक्त नव्हे तर त्या दोघांप्रतीसुद्धा आणि जणू कोयत्याने त्या दोघा प्रेमळ व्यक्तींच्या प्रश्नाला छाटून टाकीत म्हणाली, '' हे सर्व राहू द्या. आणि तुम्ही दोघं उठा बघू इथून. माझं ऐका, आता तुमच्या धुनीपाशी न जाता सरळ इथून निघून जा.'' मग त्या लंगड्या साधूकडे पाहात हळूच म्हणाली, ''इथे तर सगळीकडे सरकारी चुगलखोर आहेत. म्हणून. ...'' वाक्य अपुरं सोडून तिने स्वतःच दाराकडे पावलं टाकली आणि जाता जाता हाताच्या इशाऱ्याने सांगून गेली. ''जा निघा, पळून जा.''

पहिला साधू धीर करुन उठून उभा राहिला, ''पण ... पण आम्ही तर मरण्यासाठीच इथं आलो आहोत. बस, एक छोटीशी गोष्ट तुला विचारायची होती.''

लंगड्या साधूने त्याला धुडकावून लावलं, '' अरे भल्या माणसा यात विचारण्यासारखं काय आहे ? मी जे तुला सांगतोय, तेच...''

एकाएकी नवल माघारी वळली - कदाचित काय प्रकरण आहे ते जाणून घेण्यासाठी नाहीतर त्यांना घालवून देण्यासाठी ! ती खाटेपाशी येऊन उभी राहिली आणि म्हणाली, '' हं, विचारा काय विचारायचं आहे ते !''

पहिल्या साधूची खरंच घाबरगुंडी उडाली. ही काही रुपयापैशांची बाब नव्हती की झटपट हिशोब करुन स्वस्थ बसता यावं. म्हणून तो अडखळला. ''विचारायचं आहे की....पण तू जरा निवांतपणे बैस तर ...''

लंगड्याला त्याची ही बोलण्याची पद्धत मुळीच आवडली नाही. तो म्हणाला, ''असं आडून बोलण्यापेक्षा सरळ...'' आणि मग आपल्याकडे बघणाऱ्या नवलला त्याने स्वतःच विचारलं, ''माझं म्हणणं आहे की यानं इथं रहावं आणि मी...''

नवल उद्विग्न झाली - ''अरे देवा ! तुम्ही नाहीतर हे कुणीही राहिलं तरी पोलिस पकडून नेणारच. दुर्दैवाची गोष्ट ही की पोलिस सोडाच पण गावचंदेखील कुणी तुम्हा दोघांना ओळखत नाही. म्हणून जो कुणी धरला जाईल तोच चोर ठरेल. मी तुमच्या पाया पडते.'' आणि खरंच नवल पाया पडायला वाकली. मग पहिल्याकडे पाहून म्हणाली, ''आता निघा म्हणते ना ...''

''अगं, पण मी काय म्हणतोय ऐक तरी. मी स्वतः होऊन पोलिसांच्या तावडीत जायचं म्हणतोय, मग याला कोण...'' लंगड्याचं बोलणं मध्येच खोडून काढीत पहिल्यानं नवलकडे पहात म्हटलं, ''हे शक्य नाही. हा लंगडा झाला आहे म्हणून याला कुणीही ओळखणार नाही. मीच पोलिसांकडे जाऊन सारा गुन्हा माझ्यावर

घेईन. ...''

लंगडा आपल्याच विचारात दंग होता. नव्हे अतिशय व्याकुळलेला होता. आपलं म्हणणं पुढं मांडीत तो नवलसमोर गयावया करु लागला- '' खरी गोष्ट अशी आहे की दोन दोन पती जिवंत असताना तू या रानात एकटं राहायचं म्हणजे ? म्हणूनच तर...''

''थांब बघू ! म्हणत पहिला उठून उभा राहिला, '' मी आता पोलिस चौकीवर जातो...''

हे एकून लंगडा चिडला - ''हे आता विसरा म्हटलं राव. खून मी करायचा आणि पकडलं जायचं तू ! स्वप्नातदेखील हे शक्य होणार नाही.''

नवल अगोदरच गोंधळलेली होती. त्यात या लोकांनी साधु-हट्ट धरला. ती विव्हळ होऊन म्हणाली, ''तर मग काय वाटेल ते करा !'' आणि असंच काहीसं बडबडत, रडत, पाय ओढीत ती आत निघून गेली. जणू उन्मळून गेली असावी.

मावशी दारात उभ्या उभ्या हा सारा तमाशा बघत होती. ती बडबडत बाहेर आली ''मेल्यांनो, जात का नाही इथून ?'' आणि जवळ येऊन म्हणाली, ''तुमचे दादले (पोलिस) आले तर दोघांना धरुन घेऊन जातील. जा चालते व्हा.'' आणि ती पण निघून गेली.

पण मग तिला काय सुचलं कुणास ठाऊक ? ती परत आली पहिल्या साधूच्या कानात कुजबुजून म्हणाली, ''काय करायचं अन् काय नाही ते आपल्या मनावर असतं.यात नवलला विचारण्यासारखं काय होतं ?'' आणि जाता जाता लंगड्याला पण सांगून गेली- ''जे करायचं असेल ते करुन टाका म्हणजे कटकट नाहीशी होईल.''

दार धाडकन बंद झालं तेव्हा चकित झालेल्या त्या दोघा व्यक्तींना निरुपायाने तिथून उठावं लागलं.

वाटेत दोघांचं बोलणं झालं आणि धुनीपाशी पोचेपर्यंत तर एकमताने निर्णयही घेऊन टाकला- ''पोलिस ज्याला धरुन नेतील तेच खरं.''

अर्थात लंगड्याला हे म्हणणं मान्य नव्हतं. पण करणार काय ? पहिल्याने त्याला नवलची शपथ घालून त्याचं तोंड बंद केलं होतं. पहिल्याने त्यालादेखील पटवून दिलं होत की नवलला माझ्यापेक्षा तूच जास्त सुखी करु शकशील. आणि लंगड्याला ते मान्यही करावं लागलं होतं.

पण झालं काय दुसऱ्या दिवशी साहेबांसाठी कोंबडी शोधणाऱ्या एका शिपायाची नजर या दोन कोंबड्यांकडे गेली. त्याने बघितलं की दोघे प्रादेशिक भाषेत बोलताहेत

आणि मावशी, मावशी असंही काहीसं म्हणताहेत. तो दोघांना पकडून घेऊन गेला.

ओट्यावर बसलेल्या नवलने त्यावेळी आपले अश्रू मोठ्या मुष्किलीने आवरले होते. त्या लोकांचा तिला रागही खूप आला होता आणि तिने तो मावशीसमोर व्यक्तही करुन टाकला- ''अखेर माझ्याच उरावर येऊन. ...'' पुढे तिच्या तोंडून शब्द फुटला नाही.

पण मावशीला मात्र आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. ''काही का असेना या प्रश्नाचा एकदा सोक्षमोक्ष तरी लागेल.'' आणि जणू त्या गावचेच नाही, आपण कुणालाही ओळखत नाही असा बहाणा करीत ती म्हणाली, '' चला झालं ते बरंच झालं. आता भीक वाढायची कटकट नाही. आणि त्या लुच्च्यांना 'जय सीताराम' तर काय तुरुंगात बसल्या बसल्यादेखील करता येईल.'' मनातल्या मनात मावशी हिशोब करीत होती की दोघांपैकी कोण जास्ती कामाचा आहे.

पण असा पक्षपात करणं नवलला मात्र अवघड जात होत. वात्रक आपल्या दोहोंकिनाऱ्यांपैकी कुणाप्रती पक्षपात करणार ? नवलच्या दृष्टीने तर दोन्ही डोळे सारखेच होते-डावा फुटला तरी वाईट आणि उजवा फुटला तरी वाईट- दोन्ही डोळे तरी आपलेच असतात ना ?

म्हणून पोलिसचौकीवर ती प्रत्येक प्रश्नाला 'नाही' असचं उत्तर देत राहिली. ''अशा तऱ्हेचे साधू मी जन्मात कधी पाहिले नाहीत साहेब. मग यांना ओळखणार कसं काय ?

पण सहा महिन्यांनी लंगडा सुटून आला. आणि पहिल्या निर्दोष माणसाला आजीवन कारावासची शिक्षा झाली. मावशी जेव्हा हा निकाल सांगत होती तेव्हा समोर उभ्या असलेल्या नवलला जाणवलं की तिचं पहिल्यावरच जास्त प्रेम होतं. त्याचा सौम्यपणा, देखणं रुप, त्याचा उग्र स्वभाव. त्याचं सारं काही तिला आवडत होत.

आता आपले अश्रू फार वेळ आवरता येणार नाहीत हे तिनं ओळखलं आणि घागर उचलून ती घराबाहेर पडली. ओसरीवर तिचा लंगडा पती दयनीय चेहेरा करुन डबडबल्या डोळ्यांनी तिच्याकडे पाहात बसला होता. पण नवलने त्याच्याकडे ढुंकूनही पाहिले नाही. झपझप पावलं टाकीत ती टेकडीवरुन खाली उतरली.

नदीकाठी पोचायच्या आतच तिच्या अश्रूंचा बांध फुटला. पाण्यापाशी पोचेपर्यंत तर तिचे घट्ट मिटलेले ओठदेखील विलग झाले. आणि मग तर जवळजवळ विलाप करीत नवल स्वतःलाच दूषणे देऊ लागली- '' अरेरे, अभागे, जगात तोच काय तो

तुझा होता ! इतक्या वर्षांनी तुझ्या दारी आला ... खाऊपिऊ घालायचं तर दूरच राहिलं. सुखदुःखाचे दोन शब्द तू त्याला विचारले नाहीस...''

बिचारा लंगडा ! त्याला काय ठाऊक होतं नदीकाठी हे असं काही होणार आहे ? नाहीतर तो नवलच्या पाठोपाठ आलाच नसता. त्याला तर एकान्तात आपलं व्यथित हृदय खुलं करुन दाखवायचं होतं-म्हणायचं होतं ''न्यायालयात मी खूप प्रयत्न केला पण त्या बडबड्याने मला बोलूच दिलं नाही. सरकरी माणसांनीदेखील माझं ऐकून घेतलं नाही. उरली सुरली उणीव या लंगड्या पायाने करुन टाकली. खरचं सांगतो. आयुष्यात मी कधी काही चांगलं केल नाही, आणि कदाचित पुढेही कधी करणार नाही. पण...''

यातलं किती बोलू शकला असता कोण जाणे, पण समजा तो काहीच बोलला नसता, बोलूच शकला नसता तरी नवलसाठी त्याची अश्रुपूर्ण डोळ्यांची बापुडवाणी आकृती काय कमी होती ?

पण अरेरे ! नवलनेही हे सारं पाहिलं नाही की त्या शरमेल्या माणसानेही धीर धरला नाही. धीर धरलाही कसा असता ? मृत भावांची आठवण काढून रडणाऱ्या नवलने त्या दिवशी त्याच्या बुद्धीचाच ताळतंत्र नाहीसा केला होता पण आजच्या या क्रंदनाने त्याचं विदीर्ण करुन टाकलं.

त्याने नदीकाठच्या पलाश वृक्षाला धरलं. त्याला वाटलं जणू त्याचा दुसरा पायही तुटून पडला आहे. त्याचं अंगोपांग नव्हे- त्याचा आत्मासुद्धा थरथरला. जणू चुकून त्याचा पाय एखाद्या फुलासारख्या नाजुक मुलावर पडला असावा. त्याच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडले '' अरे - रे- रे- चूक झाली.''

आणि जणू या अक्षम्य चुकीचं प्रायश्चित घेण्यासाठी म्हणूनच की काय त्याने तो तुटका पाय उचलला आणि तो तिथून निघाला. असं वाटत होत जणू नदीकाठच्या त्या पलाश वृक्षाला 'राम राम' करुन तो त्याचा अखेरचा निरोप घेत होता.

नदीकाठी बसून अजूनही अश्रू ढाळणाऱ्या नवलला कोण सांगणार की बघ, तुझ्या हाती आलेलं सौभाग्य निसटून चाललं आहे.

त्याने नदीचं वळण ओलाडलं... लंगडत टेकडीवर चढला... दुसऱ्या बाजूला उतरु लागला. आणि .... आणि... तो क़ाय उतरुनही गेला !

आता एकच आशा होती. कदाचित पुढं गेल्यावर गुरं चारणाऱ्या मावशीची भेट होईल आणि त्या त्याला माघारी घेऊन येतील.

# रक्ताचं नातं

□ ईश्वर पेटलीकर

शेजारपाजारचे, नात्याचे, ओळखीचे लोक मंगूला वेड्यांच्या इस्पितळात पाठवायचा सल्ला अमरतकाकीला द्यायचे तेव्हा ती आपले एकच उत्तर द्यायची- "मी आई असूनही जर हिची सेवा करू शकले नाही तर वेड्याच्या इस्पितळातल्या लोकांना हिच्यासाठी काय वाटणार आहे?" हे तर लंगड्या गुराला पांजरपोळात सोडून येण्यासारखं होईल."

अमरतकाकीच्या मनची ही गोष्ट कळल्यापासून आता कुणीही तिच्याशी या बाबतीत बोलत नव्हतं. जन्मापासून वेड्या आणि मुक्या असलेल्या मुलीचं ती ज्याप्रकारे पालनपोषण करीत होती, ज्याप्रकारे तिची सेवा आणि तिचं कोडकौतुक करीत होती ते पाहून लोक तिची प्रशंसा करायचे की वेड्या पोरीचं असं संगोपन करणं अमरतकाकीलाच काय ते शक्य आहे. दुसऱ्या कुणाच्या घरी असती तर केव्हाची उपाशीतापाशी मरून गेली असती ! आणि जिवंत जरी राहिली असती तरी शरीर असं दणकट नक्कीच झालं नसतं.

अमरतकाकीला मंगू खेरीज आणखी तीन मुलं होती. दोन मुलं आणि एक मुलगी. मुलं शिकून शहरात धंद्याला लागली होती. मुलगी लग्न होऊन सासरी गेली होती.अमरतकाकीचं संपूर्ण मातृत्व मंगूवरच पाझरत होतं जणू बाकीच्या तीन मुलांना ती विसरूनच गेली होती. म्हणून सुट्टीत जेव्हा मुलं घरी यायची आणि तिचं घर छोटया छोटया नातवंडांनी भरून जाऊन हसू लागायचं, तेव्हादेखील आजीच्या रूपात अमरतकाकी हर्षविभोर होत नसे. ती क्वचितच कधी नातवंडांना आपल्याजवळ बोलवायची, त्यांना भरवायची, त्यांचे लाड करायची.

आईच्या या वागणुकीनं मुलांना जरी नसलं तरी सुनांना मात्र खूप वाईट वाटायचं. दोन्ही सुनांची आपापल्या नवऱ्यापाशी एकच तक्रार होती- "मुलांची लेकरं कुसळासारखी यांच्या डोळयानां खुपतात आणि त्या वेडीला मात्र क्षणभर आपल्यापासून दूर करवत नाही."

मातृत्वाच्या संकुचित भावनेनं अमरतकाकीवर अन्याय करायच्या. नाहीतर तिचं

वर्णन मात्र लेकीच्या मुलांप्रतीसुद्धा तसंच होतं. फरक फक्त इतकाच होता की सुना नवऱ्यांपाशी बडबड करायच्या तर लेकं आईच्या तोंडावरच तिला सुनवायची- "मंगूचे इतके जास्त लाड करून तूच तिला आणखी वेडी करून टाकल आहेस. सवय लावली तर हगायमुतायचं जनावरालासुद्धा समजू लागतं. बारा वर्षाची मुलगी किती का वेडी असेना, सवय लावली तर काय इतकंदेखील समजणार नाही? ती मुकी आहे पण सांगितलेलं ऐकायला न येण्याइतकी काही बहिरी नाही. एखादे वेळी विसरली तरी दोन ठेवून दिल्या म्हणजे दुसऱ्या वेळी आपोआप लक्षात ठेवील."

मुलीसमोर काही बोलायच्या आतच अमरतकाकीचे डोळे पाझरू लागायचे. मुलीचं अंतःकरणदेखील भरुन यायचं. पण उरावर धोंडा ठेवून ती आपल्या मनातील मळमळ सांगून टाकायची- " आई, तुला वाटतं की लेकीचे लाड करुन तू तिला सुखी करीत आहेस. पण लक्षात ठेव तूच तिची वैरीण आहेस. तू काही कायम राहणार नाहीस. वहिनींच्या पदरी पडली म्हणजे रोज रोज हिचे गूमूत धुवायचे कष्ट कोण उपसणार आहे ? त्यावेळी ही दुःखी होईल." जरा थांबून ती खालच्या आवाजात सांगायची, " म्हटलंय ना सोनारानेच कान टोचावे लागतात. खरं आहे ते. वेड्यांच्या इस्पितळातसुद्धा बरी झाली नाही तर न का होईना; निदान हगायमुतायची आणि कपड्यांची शुद्ध तर येईल. देवानं भावांकडे खायला प्यायला भरपूर दिलं आहे. आणि भावजयादेखील इतक्या काही हलक्या कुळातल्या नाहीत की हिला खायला घालायच्या नाहीत."

वेड्यांच्या इस्पितळाची पांजरपोळाशी तुलना केल्यावर इतर मंडळी अमरतकाकीला जे सांगू शकत नसत ते मुलगी सांगून टाकायची, "वेड्यांचं इस्पितळ पांजरपोळ का असेना. आणि समजा तिथं जाऊन मंगू मेली तरी काय बिघडणार आहे? कुटुंबाची सुटकाच होईल."

अमरतकाकीदेखील मंगूच्या मरणाला सुटकाराच समजत होती, पण ते नैसर्गिक मृत्युला. उपेक्षा करुन जाणूनबुजून मृत्युच्या पाशात ढकलण्याची कल्पनासुद्धा तिला असह्य होती. स्वार्थापायी तर सगळेच आप्त बनतात. पण निःस्वार्थ भावाने जवळ राहणारा आप्त तो खरा आप्त. मुलगे मिळवते झाले. मुलगी सासरी ताटावरुन पाटावर आणि पाटावरुन ताटावर करते. आता मी आई मेले तरी काय होणार आहे? पण मी मंगूची खरी आई होऊन राहिले तरच तिचं माझं रक्ताचं नातं खरं आहे. म्हणून मुलंमुली कुणीही कितीही सांगोत अमरतकाकी काही मंगूला वेड्यांच्या इस्पितळात धाडून मरणाच्या दारी ढकलायला तयार नव्हती.

मुलांनी आईची ही विचारसरणी ओळखली होती म्हणून ते कधीही या विषयाला हात घालत नसत. शिवाय जास्त काळजी करुनही काही फायदा नव्हता. कारण तीन अनुभवी इंग्रज डॉक्टरांनी एकमुखाने निर्णय देऊन टाकला होता की मंगूचा रोग असाध्य आहे. ती बरी होणे अशक्य आहे. मुलांच्या मनात फक्त एकच आशा होती की एखाद्या शिक्षित नर्स वा डॉक्टरांच्या देखरेखीखाली मंगूला ठेवल्यास कदाचित तिला हगण्यामुतण्याची व कपडयांची शुद्ध येईल. पण तशी सोय घरात करणे कठीण होते. म्हणून ते गप्प राहिले.

तरी अमरतकाकी मात्र आपल्या भोळ्याभाबड्या श्रद्धेनुसार उपचार करवीत होती. इलाज करणारे आपणहून येऊन धडकत होते. मंगू वेडी आहे, हे कळताच हिंग किंवा शिलाजित विकणारे छातीवर हात ठेवून सांगू लागत की त्यांना औषध ठाऊक आहे. आणि अमरतकाकीचं मत होत की हजारो उपचार करावेत तेव्हा कुठे एखादी मात्रा लागू पडते. म्हणून इतरांना मूर्खासारख्या वाटणाऱ्या गोष्टीदेखील ती लक्षपूर्वक ऐकायची आणि तसं करुन बघायची. ज्योतिषी आणि देवऋषीदेखील यदाकदा मदतीला धावून यायचे. एका ज्योतिषाने सांगितले होते की येत्या मार्गशिर्षापासून मंगूचे ग्रह पालटत आहेत, तेव्हा ती बरी होईल. झालं. त्या दिवसापासून मार्गशीर्ष महिना अमरतकाकीचं आराध्य दैवत बनला.

मार्गशीर्षात मंगू चौदा वर्षाची होणार होती. म्हणून कुठल्याही समजूतदार माणसाच्या मनात येणार नाहीत असले विचार अमरतकाकीच्या मनात येत होते. म्हणायची, '' कमूला चौदा पुरी होताच तिचं लग्न लावून टाकलं होतं. मंगू शहाणी असती तर आज हिचंही लग्न ठरलं असतं. बघायचं, मार्गशीर्षात ही जर बरी झाली तर... मेली दिसायला कशी सोन्यासारखी आहे. बघताच कुणीही पसंत करील.''

आणि जणू काही मंगू खरचं बरी झाल्यासारखी ती तिच्या लग्नाचे बेत करु लागायची. म्हणायची, '' कमूच्या लग्नाच्या वेळेला घरची स्थिती काही तितकीशी चांगली नव्हती. पण आता तर दोघा भावांनी शहरात चिक्कार पैसा कमावला आहे. पाण्यासारखा पैसा खर्च करतात. आता मंगूच्या लग्नात मला खाली बघायला नको.''

एकदा मंगू शहाण्यासारखी गटाराशी मुतायला बसली त्यावर अमरतकाकी इतकी खूष झाली की कित्येक दिवस सर्वासमोर त्याच गोष्टीचं पारायण करीत राहिली. '' ज्योतिषाचं भाकित खरं ठरणारसं दिसतंय, आजपर्यंत कधी असं घडलं नव्हतं आणि आज पहिल्यांदा मंगू स्वतः होऊन गटारावर मुतायला बसली.''

ऐकणाऱ्यांना यावर विश्वास ठेवणे कठीणच जात होते. कारण त्यांच्यासमोरच

मंगू मुतल्यानंतरची ओली माती बोटानं उकरीत असायची. हे पाहून अमरतकाकी शहाण्या मुलीला समजावावं तशा सुरात म्हणायची, " मंगू बाळ अशी घाण करु नये !"

मंगू आपल्याच नादात उठून उभी राहिली तर त्यांना बोलायला एक नवा विषय मिळायचा, " पाहिलंत, मी सांगितलं, तर कशी शहाण्यासारखी उठून उभी राहिली."

अशाप्रकारे अमरतकाकीचा आशाआकांक्षांनी भरलेला मार्गशीर्ष महिना येऊन ठेपला. तरीसुद्धा मंगू काही बरी झाली नाही. उलट शहरातल्या मुलींच्या शाळेत शिकणाारी, त्याच गावची कुसुम नावाची दुसरी एक मुलगी मात्र वेडी झाली. मंगूसारखचं तिचंही नित्य दैहिक कामाचं भान हरपलं. अमरतकाकीला वाईट तर वाटलचं. पण दुःखातही याच गोष्टीचं समाधान वाटलं की जर चांगल्या शहाण्यासुरत्या मुलीची वेड लागून अशी अवस्था होऊ शकते तर जन्मतःच वेड्या असलेल्या बिचाऱ्या मंगूला कशाचं भान नसल्यास त्यात नवल ते काय ?

कुसुमला वेड्यांच्या इस्पितळात पाठवायचं ठरलं हे जेव्हा अमरतकाकीच्या कानावर आलं तेव्हा तिला अतिशय वाईट वाटलं- " आज तिची आई असती तर तिने कुसुमला वेड्यांच्या इस्पितळात पाठवलं असतं का? आईची माया आईलाच ठाऊक. खरंय, एका आईखेरीज सारं जग सुनं !" त्याचबरोबर, आपले डोळे मिटताच आपली मुलंही मंगूला वेड्यांच्या इस्पितळात सोडून येतील या नुसत्या कल्पनेनं अमरतकाकीचा जीव कासावीस झाला.

एक महिन्यानंतर बातमी मिळाली की कुसुमची तब्येत बरीच सुधारली आहे. अगोदर तिला बांधून ठेवावं लागायचं. पण आता ती मोकळी हिंडते फिरते आणि तरी काही त्रास देत नाही. दैहिक कर्मांचीदेखील शुद्ध आली आहे. वेडेपणाची फक्त इतकीच खूण राहिली आहे की दिवसभर ती नुसती गात राहते. पण डॉक्टरांचं म्हणणं आहे की पुढच्या महिन्यात हेदेखील ठीक होऊन जाईल.

पुढच्या महिन्यात कुसुमचं वेड नाहीसं झालं. तरी डॉक्टरांनी सांगितलं की एखाद महिना ती आणखी इस्पितळातच राहिल्यास उत्तम ! म्हणून तिसऱ्या महिन्यातही कुसुम तिथंच राहिली. आणि ती जेव्हा घरी परतून आली तेव्हा अवघा गाव तिला बघायला लोटला. सर्वांत पुढे होती अमरतकाकी !

कुसुमचं वेड बरं झालेलं पाहून गावचे सर्वजण अमरतकाकीला सल्ला देऊ लागले- "काकी, तुम्हीदेखील एकदा मंगूला वेड्यांच्या इस्पितळात ठेवून बघा तरी ! नक्की ती बरी होईल."

आयुष्यात पहिल्यांदा अमरतकाकीने वेड्यांच्या इस्पितळाला विरोध नाही. मुकाट्याने लोकांचा सल्ला ऐकत राहिली. दुसऱ्या दिवशी तिने कुसुमला आपल्या घरी बोलावलं. तिला जवळ बसवून ती इस्पितळाविषयी चौकशी करु लागली. आणि आईच जर दयाळूपणाने सेवा करु शकली नाही तर मोलाचे नर्स डॉक्टर कसली करताहेत ही तिच्या मनातली गाठ त्या दिवशी उकलली. नर्स वा डॉक्टरला एखाद्या वेड्याने थप्पड लगावली तरी ते मनावर न घेता त्या वेड्यावर ते रागवत नाहीत हे ऐकून तिला वेड्यांच्या इस्पितळाविषयी मनापासून श्रद्धा वाटू लागली. तिच्या मनात नवी आशा जागी झाली. कुणी सांगावं कदाचित मंगूच्या नशिबातदेखील इस्पितळात जाऊन ठीक व्हायचं लिहिलं असेल. इतके उपचार करुन बघितले. त्यात आणखी एकाची भर! बरी झाली नाही तर काय परत आणता येणार नाही ?

अखेरीस अमरतकाकीनं मंगूला वाड्यांच्या इस्पितळात पाठवायचं ठरवून टाकलं. यासाठी तिनं थोरल्या मुलाला घरी येण्याकरिता पत्रही टाकलं. तरीसुद्धा हा निर्णय घेतल्यापासून तिची झोप उडाली. तिला आपल्या मनावर दडपण आल्यासारखं वाटू लागलं. जणू नाईलाजानंच तिला हे काम करावं लागत आहे. इस्पितळाविषयी वाटणारी श्रद्धा एक बहाणा फक्त होता. पण अंतर्मनात मात्र दुसरंच एक कारण डोकं वर करताना तिला दिसत होतं.

मंगू वयात येऊ लागली होती. आणि अमरतकाकीचं वय वाढत चाललं होतं. सुना काही आपली सेवा करणार नाहीत हे तिला माहीत होतं. कारण दोघींपैकी एकाही सुनेनं अजूनपर्यंत तिला आपल्याकडे रहायला बोलावलं नव्हतं. आणि हल्लीची मुलं आपापल्या बायकांना दबून असतात हे तर तिला घरोघरी रोज दिसत होतं. म्हणून पोटच्या पोरांचीदेखील तिला फारशी आशा नव्हती. अशा परिस्थितीत तिला वाटत होतं, की देवाच्या दयेन मंगू बरी व्हावी. आणि जरी बरी झाली नाही तरी ती स्वतःच मंगूला वेड्यांच्या इस्पितळात दाखल करुन जाईल. म्हणजे मरताना निदान हे समाधान राहिल की लेकीची देखरेख करणारं कुणी तरी जगात आहे खरं!

हा सर्व विचार करता करता अमरतकाकीच्या डोळ्यांतून इतके अश्रू वाहायचे की बिछाना ओला होऊन जायचा. तिचं मन आक्रंदन करायचं- '' कुठलं का निमित्त पुढे करेनास, खरी गोष्ट हीच आहे की तू देखील लेकीचं करुन करुन दमलीस.'' अमरतकाकी झोपेतून दचकून जागी व्हायची. म्हणायची, '' काय म्हटलं ? मी दमलेय ?'' आणि मन जोरानं म्हणायचं, '' हो, हो, एकदा नाही हजारदा म्हणीन !''

अमरतकाकीला वाटलं, आपण मुलाला पत्र पाठवून चूक केली, इतक्या थंडीच्या

दिवसांत हिला वेड्यांच्या इस्पितळात ढकलायची काय घाई होती? रात्री कितीदा उठून मी हिच्या अंगावर पांघरुण घालते. तिथं कोण रात्रभर हिच्याकडे लक्ष देणाार ? उन्हाळ्यात पाठवणंच बरं राहिलं असतं.

पण मुलगा पत्र मिळताच येऊन ठेपला. मॅजिस्ट्रेटकडून इस्पितळात प्रवेश देण्यासाठी हुकूमदेखील घेऊन आला. आठवड्यानं मंगूला पाठवायचं ठरलं. आता मात्र अमरतकाकीची खात्री झाली की वेड्या बहिणीला वेड्यांच्या इस्पितळात धाडून आपल्या उरावरचं ओझं कमी करायला मुलगा उतावीळ झाला आहे. तसं नसतं तर तो पत्र मिळता क्षणीच कसा काय धावून आला असता? दादापुता करुन डॉक्टर व मॅजिस्ट्रेटची लगेच परवानगी मिळावायचा अर्थ काय? मंगूला आता नव्हे तर उन्हाळ्यात पाठवायची तिची इच्छा होती. पण मुलाला हे सांगायचा धीर तिला होत नव्हता. मोठया मुष्किलीने तो सुट्टी घेऊन आला असेल. दाखल करायची व्यवस्था देखील त्यानं करुन टाकली आहे. आता नकार दिल्यास त्याला वाटेल आईला दुसरं काही कामच नाही. उगाच हेलपाटे घालायला लावते.

मंगूला ज्या दिवशी इस्पितळात घेऊन जायचं होत त्या रात्री अमरतकाकीच्या डोळ्यांना डोळा लागला नाही. आपण तिच्याबरोबर न गेल्यास बरं राहील असाही एक विचार सकाळी तिच्या मनात आला. इस्पितळात पोरीला माझ्यापासून घेऊन जातील ते मला सहन होणार नाही. पण जोवर खुद्द आपल्या डोळ्यांनी इस्पितळाची व्यवस्था पाहून घेत नाही तोवर चैन कशी पडणार ?

म्हणून ती मंगूला सोडायला जायला तयार झाली. पण मंगूला घेऊन घराबाहेर पडताना मात्र तिला ब्रह्मांड आठवलं. डोळ्यांतून श्रावणसरी ओघळू लागल्या. नजर मंगूवर खिळून राहिली, ती तिच्यावरुन हटेनाच. मंगू तिला नेसवलेल्या नव्या कपड्यांचे रंग न्याहाळीत होती. अमरतकाकीकडे बघून ती हसलीदेखील. जणू खूष झाली होती. हे बघून अमरतकाकीच्या मनाचा थरकाप झाला. खुंटाला बांधलेल्या जनावरालादेखील जर कुणी सोडवून नेऊ लागला तर नव्या मालकाच्या घरी जायला तो खळखळ करतो. मंगूला तेवढीदेखील शुद्ध नाही हे बघून अमरतकाकी उभ्याउभ्याच कोसळली. बिचाऱ्या अजाण पोरीचं जगात कुणी नाही. सख्खी आईदेखील तिची नव्हे !

मुलाचं हृदयदेखील भरुन आलं. आईकडे बघायचं धैर्य त्याच्यात नव्हतं. जितका उशीर होत होता, गाडी पकडायची वेळ तितकीच कमी होत चालली होती. गल्लीच्या बाहेर गाडीला जुंपलेले बैल चालायच्या उतावळीत पुनःपुन्हा पाय आपटीत होते.

आईकडे न बघताच लटपटत्या पायांनी पुढे होत मुलगा म्हणाला,'' उशीर होतोय, आता निघायला हवं.'' आणि गल्लीतून बाहेर पडता पडता त्याने हळूच धोतराच्या सोग्याने डोळे टिपले.

शेजारच्या बायका मंगूचा हात धरुन तिला बैलगाडीपर्यंत घेऊन आल्या. काही बायकांनी अमरतकाकीलादेखील आधार दिला. अखेर कडू घोट आतल्या आत गिळून गुडघ्यावर हात ठेवून ती उठून उभी राहिली. दोघजणींनी धरुन तिला बैलगाडीत चढवलं.

आगगाडीतल्या प्रवाशांना जेव्हा समजलं की मंगू वेडी आहे तेव्हा त्यांना मनोरंजनाचं एक साधन आयतचं मिळालं.

''अशा सुरेख धडधाकट मुलीला वेड्यांच्या इस्पितळात टाकलं तर महिन्यातभरात सुकुन चिपाडं होईल. तिथं तर गुरांना चारा घालतात तसं काहीबाही खायला देतात झालं !''

''आमच्या गावच्या एका म्हातारीनं गेल्या पाच वर्षापासून आपला मुलगा वेड्यांच्या इस्पितळात टाकून ठेवलाय. पण अजूनतरी काही फायदा झालेला नाही. गावचं कुणी भेटायला गेलं तर बिचारा रडायला लागतो. पाय धरुन म्हणतो- ''मला इथून घेऊन चला. पण आजकालची मुलं आहेत. त्याला घरी आणतच नाहीत.''

''आईबाप अशा मुलांना कशासाठी इतकं मोठं करतात ?''

''मुलं तशी चांगली आहेत. पण हल्लीच्या सुना ! माहीत आहे ? नटूनथटून फिरायला तेवढं हवं त्यानां ! म्हणून घरात इतर कुणी त्यांना खपतच नाही.''

''या मुलीला आई नाही का ?''

हा घाव अमरतकाकीला असह्य झाला. डोळे बडबडले, गळा दाटून आला. मस्तक शरमेनं खाली झुकलं. यावरुन तीच त्या मुलीची आई असल्याचं जाहीर झालं. ''बाप रे ! तुम्ही आई असून हिला घालवताय ? मग इस्पितळाला नावं ठेवून काय उपयोग ?''

अमरतकाकी एकटी असती किंवा मुलाला वााईट वाटण्याची भिती नसती तर उलट पावली मंगूला घेऊन परतली असती. पण आता काही उपाय नव्हता. म्हणून जड अंतःकरणानं व जड पावलांनी वेड्यांच्या इस्पितळात दाखल झाली.

भेटीची वेळ होती म्हणून मधल्या हॉलमध्ये रुग्ण आणि त्यांचे नातेवााईक वेगवेगळे गट करुन बसले होते. कित्येक जण नातेवाईकांनी आणलेला डबा खात काही लोक फळं खात होते. एक वेडी स्त्री नवऱ्यापाशी घराची आणि मुलाबाळांची

चौकशी करीत होती. एक तक्रार करीत होती-''या हडळी मला चांगले कपडे नेसू देत नाहीत.''

अमरतकाकी परिचारिकांकडे पाहात हाती. त्या बाईची परिचारिका हसून म्हणाली, ''आता मी तुम्हाला सर्व काही देईन बरं. तुमचे पती तुमच्यासाठी चांगलंचुंगलं खायचं घेऊन आले आहेत. एकदा खाऊन घ्या बघू.''

ती वेडी आणखी नखरा करीत म्हणाली, ''मी अजून तोंडदेखील धुतलेलं नाही, दातही घासलेले नाहीत.''

अमरतकाकीने पाहिलं की तिचं तोंड धुतलेलं आहे. तरीसुद्धा त्या परिचारिकेनं जराही न कुरकुरता पाण्याचा तांब्या आणून तिचं तोंड पुन्हा धुऊन दिलं. टॉवेलने तोंड पुसलं. अमरतकाकीच्या जिवाला चैन पडलं. इथं काम करणारे लोक प्रेमळ आहेत तर !

डॉक्टर आणि महिला वॉर्डची मेट्रन येऊन ठेपली. अमरतकाकीच्या मुलानं मॅजिस्ट्रेटचं पत्र त्यांना दिलं. आईला समाधान वाटावं म्हणून तिच्या कानावर जाईल अशा बेतानं नीट देखरेख करण्याकरिता त्यांना बजावलं. मेट्रनने म्हटलं, ''या बाबतीत तुम्ही अगदी निश्चिंत असा.''

अमरतकाकी मध्येच म्हणाली, ''बाई, काळजी एवढ्याचसाठी वाटते की ही पोर वेडी आहे. कुणी जवळ बसून भरवलं नाही तर जेवत नाही.'' बोलता बोलता तिचा गळा भरुन आला आणि वाक्य अपुरं राहिलं. दूर उभ्या असलेल्या परिचारिका धावत जवळ आल्या. एक म्हणाली, ''बाई, तुम्ही काळजी करु नका आम्ही हिला आमच्या हातांनी भरवू.''

अश्रूंमुळे अवरुद्ध झालेल्या कंठाने अमरतकाकी म्हणाली, ''मला हेच सांगायचं होतं बाई. हिला मोरीवर वगैरे जायची पण शुद्ध नाही . तेव्हा कपडे ओले केले तर लक्ष ठेवा. नाहीतर ओल्या कपड्यातच रात्रभर झोपून राहील आणि आजारी पडेल.''

दुसरी परिचारिका म्हणाली, ''रात्री पाच सात वेळा आम्ही सर्वांना बघत असतो.''

''रात्री दिव्याच्या उजेडात हिला झोप येत नाही.''

''ज्यांना झोप येत नाही त्यांना आम्ही झोपेचं औषध देतो.''

''आणि बघा. दुसरी वेडी माणसं हिला मारणार तर नाहीत?''

''तशा दंगामस्ती करणाऱ्या लोकांना वेगळं ठेवण्यात येतं. रात्री सर्वांना वेगवेगळया खोल्यामधून झोपवण्यात येतं.''

भेटायला आलेली मंडळी गेली म्हणजे रुग्णाला आत घेऊन जाताना आपल्या

बाजूचं दार थोडं किलकिलं व्हायचं. संधी पाहून अमरतकाकीने दोन तिनदा आत जर टाकली. केस विखुरलेल्या, अस्ताव्यस्त कपड्यातल्या तीन चार बायका आत इकडेतिकडे फिरताना त्यांना दिसल्या. एकीचं काकीकडे लक्ष जाताच ती ऊर बडवू लागली आणि तिने असे काही डोळे वटारले की काकी भेदरलीच, म्हणून आत जाऊन रुग्णांच्या राहण्याची जागाही एकदा बघून यावं असं तिला वाटलं. ती म्हणाली, "मंगूला ज्या खोलीत ठेवणार आहेत ती मला बघायची आहे."

मेट्रनने उत्तर दिलं, "आत कुणालाही जाऊ देत नाहीत. तसा कायदा आहे."

या नव्या जगाकडे गोंधळून बघणाऱ्या मंगूने अमरतकाकीच्या कुशीत तोंड लपवलं. तिच्या मस्तकावर हात फिरवून अमरतकाकी रोजच्या सारखी तिला 'बाळ' म्हणणार होती. पण याऐवजी तिचा आवाज फुटून एक मर्मभेदी किंकाळी तिच्याा तोंडून बाहेर पडली. अवघं इस्पितळ तिच्या रुदनात बुडून गेलं. मुलाच्या डोळयांतूनही अश्रुधारा वाहू लागल्या. अशाप्रकारच्याा क्रंदनाची सवय असलेल्या डॉक्टर, मेट्रन आणि परिचारिकांची हृदयंदेखील भरुन आली. भिंतीदेखील जणू थरारल्या. एखाद्या वेड्यावर इतकी माया करणारा नातेवाईक त्यांनी आजवर कधी पाहिला नव्हता.

हातातला रुमाल दाखवीत मंगूचं लक्ष आपल्याकडे ओढून घेत एक परिचारिका म्हणाली, "हवाय तुला ?"

रुमाल घेण्यासाठी मंगू आईची मांडी सोडून उभी राहिली. रुमाल तिला देऊन तिचा हात कुरवाळीत एक परिचारिका गोड आवाजात म्हणााली," तू माझ्यापाशी राहशीलना? मी तुला छान छान पदार्थ खायला देईन. आणि नवे नवे कपडे नेसवीन." मंगू तिच्या तोंडाकडे बघत राहिली. त्या क्षणाचा उपयोग करीत परिचारिका म्हणाली, " चल, देते." असं म्हणून ती मंगूला बरोबर घेऊन गेली. दार अर्धवट उघडलं आणि बंद झालं.

"मंगू ... मंगू !" जिवाचा थरकाप उडवणारी हाक अमरतकाकीच्या तोंडून बाहेर पडली.

डॉक्टरांनी सांत्वन करीत म्हटलं,"आजीबाई, " आणि जवळ उभ्या असलेल्या मुलाकडे इशारा केला, "मला पण तुमच्या या मुलासारखंच समजा. मुलीला इस्पितळात नाही तर मुलाच्या घरी सोडून जाताय तुम्ही !"

बालपणीच विधवा होऊन या क्षेत्रात आलेल्या प्रौढ मेट्रनने आश्वासन देत म्हटलं. " आजवर एकट्या तुम्हीच हिच्या आई होत्या. आजपासून मी हिची नवी आई झाले आहे."

अमरतकाकी हुंदके देत म्हणाली, "तिला मुक्या प्राण्याइतकंही समजत नाही हो. आजवर कधी मी तिला माझ्यापासून दूर केलं नाही. कुसुम तुमच्या इस्पितळात राहून बरी होऊन गेली, म्हणून काळजावर दगड ठेवून मी..." पुढचे शब्द तिच्या गळ्यातच अडकले.

मेट्रन म्हणाली. "कुसुमसारखीच ही पण थोड्याच दिवसांत बरी होईल."

अमरतकाकीचे हुंदके थांबले. तरी तिची नजर मात्र त्या बंद दाराला भेदून मंगूला पाहात होती. मग पुन्हा आठवण झाल्यासारखी ती म्हणाली, " ती कोरडी पोळी खात नाही. संध्याकाळी तिला दुधात पोळी कुस्करुन देत जा. दूध नसलं तर आमटीत भिजवून देत जा."

अमरतकाकीच्या करुण डोळ्यांला डोळा भिडवण्याची शक्ती जणू मेट्रनमध्ये नव्हती. ती खाली पाहात म्हणाली, "बरं." " तिला दही खूप आवडतं. रोज जमलं नाही तर निदान दोन दिवसांनी तरी देत जा. हा वरचा खर्च आम्ही देऊ. जी तिची नीट देखरेख करील तिला पण मी खूष करीन."

अमरतकाकी आणि तिचा मुलगा मंगूला इस्पितळात सोडून बाहेर आले तेव्हा शोकामुळे त्यांचे चेहरे काळवंडलेले होते. दोघेही मुकाट्याने बाहेर उभ्या असलेल्या टांग्यात जाऊन बसले.

आगगाडीच्या डब्यात पाय ठेवताच अमरतकाकाला आठवलं, इस्पितळात झोपण्यासाठी खाटा असतात की नाही ? मंगू कधी जमिनीवर झोपली नाही. म्हणून खाट नसली तर तिला झोप यायची नाही. आत जाता आलं असतं तर ही गोष्ट सांगायला ती विसरली नसती असं तिला वाटलं. खोलीत खाट दिसली नसती तर लगेच आठवलं असतं.

वेड्यांच्या इस्पितळात काम करणारे लोक प्रेमळ असल्याची खात्री अमरतकाकीला पटली होती. पण तिला आत जाऊ दिलं नाही याचा थोडासा किंतु तिच्या मनात राहिला होता. आत आम्हाला न आवडण्यासारखं काहीतरी असलं पाहिजे अशी शंका तिला वाटू लागली होती. आणि या शंकेला खतपाणी घालत होता तो बंद दरवाजा. त्या दरवाजा आड भुतासारख्या हिंडणाऱ्या घाणेरड्या, अस्ताव्यस्त उपाशी मरणाऱ्या भयंकर वेड्या स्त्रिया ! त्याचबरोबर अमरतकाकीला भास झाला की आईजवळ नाही हे पाहून मंगू रडतेय. तिचे डोळे वाहू लागले. जवळ बसलेल्या बाईने विचारपूस केली- "काय झालं ? का रडताय अशा ? कुणी वारलं का ?"

रात्री पावणे अकराला अमरतकाकी घरी पोचली तेव्हा शेजारपाजारच्या व

नात्याच्या बायका तिची वाट पाहात बसलेल्या होत्या. त्यांनी स्वैपाक वगैरे तयार करुन ठेवला होता. पण दोघांनी जेवायला नकार दिला. घरचं कुणी मेल्यावर बाहेरची माणसं जसा जास्त आग्रह करु शकत नाहीत. तसंच त्या शेजारच्या बायकांचं झालं.

अमरतकाकीच्या मनात सारखी एकच गोष्ट येत होती. मंगू यावेळी काय करीत असेल ? क्षणाक्षणाला हा विचार तिचं हृदय पिळवटून काढीत होता. थंडी किती आहे ! तिला कुणी पांघरुण घातलं असेल की नाही ? बिछाना ओला केला असल्यास तिचा घागरा आणि बिछाना बदलला असेल का ?

जणू काही मंगू तिचं बोलणं ऐकतेय अशा आवाजात ती पुटपुटली, '' बाळ कपडे ओले करु नकोस हं ! ओढणी काढून फेकून देऊ नकोस.'' हे शब्द ती नेहमी झोपताना मंगूला बोलायची. पण मंगू तसं कधीच वागायची नाही. रात्री ती बिछाना ओला करायची. आणि अमरतकाकी तिचा घागरा व बिछाना बदलायची. मंगू मोठी झाली होती तरी, अमरतकाकी तिला आपल्यापाशीच निजवायची. तिने बिछाना ओला केला तर लगेच कळावं, जाग यावी आणि मंगूला ओल्यात पडून रहावं लागू नये म्हणून !

मंगूखेरीज अमरतकाकीला आपला बिछाना ओकाबोका वाटू लागला. मनातल्या मनात ती म्हणाली- ''तिला माझ्याबरोबर झोपायची सवय आहे. एकटीला झोप येईल ?'' त्याचबरोबर मंगू भयभीत डोळ्यांनी आपल्याला शोधत असल्यासारखं तिला वाटलं. तिने डोकं आपटलं- '' मी आई असून तिला वेड्यांच्या इस्पितळात टाकून आले ?'' अमरतकाकी ओक्साबोक्सी रडू लागली.

बाहेरच्या खोलीत निजलेल्या मुलालादेखील झोप आली नव्हती. आईचं मंगूवर जितकं प्रेम होतं त्याचा शतांश हिस्सादेखील त्याला तिच्याबद्दल वाटत नव्हतं. तरी पण त्याच्या छातीवरही वेदनेची अवजड शिळा येऊन पडली होती. आईचे हुंदके ऐकून त्याच्याही डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. मला जर इतकं दु:ख होतय तर आईला किती होत असेल ? मुलाला आयुष्यात पहिल्यांदाच आईच्या हृदयाचे क्रूरपणे लचके तोडणारे दु:ख दूर केलं पाहिजे. तिच्या पोटचा मुलगा असल्यामुळेच त्या व्यथेची जाणीव झाली. त्याचं हृदय आक्रंदून उठलं ''कसंही करुन आईचं हे जर मी इतकंसुद्धा केलं नाही तर धिक्कार असो माझ्या आयुष्याला ! त्याचबरोबर त्याने मनातल्या मनात प्रतिज्ञा केली- '' मी मंगूचा आजीवन नीट सांभाळ करीन. बायकोनं तिचं मलमूत्र धुवायला नकार दिला तर मी धुवीन.'' त्यानंतर वेदनेची ती जड शिळा छातीवरून दूर झाली.

अमरतकाकीचे हुंदके जर पुन्हा ऐकू आले असते तर मुलाने त्याचवेळी आपली प्रतिज्ञा सांगून तिचं सांत्वन केलं असतं. पण ती झोपी गेल्यासारखं त्याला वाटलं. म्हणून सकाळी उठल्यावरच बोलायचं त्यानं ठरवलं. आणि झोपण्यासाठी डोळे मिटले. थोड्याच वेळात तो झोपी गेला.

पहाटे जात्याचे आणि दूध दही घुसळण्याचे स्वर गावात निनादत असतानाच अवघं गावभर अमरतकाकीच्या किंकाळ्या ऐकू येऊ लागल्या- " धावा ... धावा... माझ्या मंगूला मारुन टाकलं हो...."

मुलगा बिछान्यातून ताडकन उठला. शेजारी धावून आले. जात्याचे आणि रवीचे आवाज स्तब्ध झाले. ज्यानं ऐकलं तोच धावून आला आणि जो आला तो हैराण होऊन गेला. अमरतकाकी मंगूच्या रांगेत जाऊन बसली होती.

# वाऱ्याने झोडपलेली कोकिळा

□ चुनीलाल मडिया

गेल्या वर्षी रवा पटेलला मनासारखी पेरणी करता आली नव्हती. म्हणून यावर्षी त्यानं मोठं धैर्य करून चार बिघे जमिनीत, दोन दोन डोळे असलेली उसाची पेरं लावली. अच्छे पेटेच्या भरपूर पाणी असलेल्या अजस्त्र विहिरीतून पाणी उपसून उपसून त्याने उसाला पाणी दिलं. नवरात्र संपता संपता चार चार बोटं जाडीचे ऊस वाफ्यातून बाहेर पडून वेडेवाकडे पडू लागले आणि दिवाळीपर्यंत तर ते लांबलचक ऊस असे काही वाढले की ते खाली पडू नयेत म्हणून त्याच्या चारी बाजूला बांबूचं कुंपण घालावं लागलं.

व्यापाऱ्यांनी रवा पटेलला खूप समजावलं की मुठीत न मावणाऱ्या या जाड जाड ऊसाला चरकात पिळून काढण्यापेक्षा कापूस जवळच्या शहरातल्या मंडईत विकून ये. पण रवा पटेल अखेरपर्यंत चारी बिघे जमिनीतील ऊस पिळून काढायच्या आपल्या निश्चयापासून ढळला नाही.

शहरातल्या बाजारात मिळणारा नफा सोडून चार बिघ्यातला ऊस घरातच चरकात पिळून काढायचा हट्ट उगाच काही नव्हता. खरी गोष्ट ही होती की आपल्या वृद्ध आणि आंधळ्या वडिलांची, नेणसी भगतची एक असामान्य इच्छा पुरी करायचं निश्चय रवा पटेलने केला होता.

नेणसी भगतला रवा पटेलखेरीज दुसरे अपत्य नव्हते आणि रवा पटेलचं वयदेखील वाढत होतं. पण पहिल्या बायकोपासून झालेल्या संततीखेरीज आणखी मूलबाळ झालं नव्हतं. रवा पटेलने तीन तीन लग्नं केली पण मुलाचं तोंड काही याला पाहायला मिळालं नाही. म्हणून संतीलाच सर्व गुण संपन्न मुलगी आणि मुलगा सारं काही समजून त्याला समाधान मानून घ्यावं लागलं होतं. नेणसी भगतचे डोळे गेले आणि वार्धक्य आलं तरीदेखील संतीच्या जन्मानंतर त्याच्या एकुलत्या मुलाच्या, रवा पटेलच्या घरी कोणतंही मंगलकार्य निघालं नव्हतं. नेणसी भगत या गावाच्या अंगाखांद्यावर वाढले होते. परस्पर सहकार्याच्या आधारावर टिकून असलेल्या समाजरचनेचे पालन करीत होते, सामाजिक कर्तव्य व जबाबदाऱ्या पेलत होते. त्यामुळे अनेक प्रकारच्या ऋणांनी

ते दबून गेले होते. त्या ऋणांची फेड करणाऱ्या प्रसंग त्यांच्या घरी येत नव्हता आणि त्यामुळे ते मनातल्या मनात कष्टी राहात होते.

म्हणून योग्य संधी पाहून रवा पटेलने ऊस लावला होता आणि नेणसी भगतने वैशाखात संतीच्या सासरी पाठवण्याच्या प्रसंगाशी ऊस पिळणाऱ्या प्रसंगाची सांगड घालून टाकली होती. अशा तऱ्हेने पुत्रविहीन रवा पटेलच्या घरी पुत्र विवाहासारखी धामधूम होणार होती.

चार बिघे जमिनीत पसरलेल्या उसाच्या हिरव्यागार पात्यांवर दक्षिणोत्तर वारा वाहू लागला म्हणजे एकमेकांच्या अलिंगनात बद्ध होऊन उभ्या असलेल्या उसांच्या मोरपंखी रंगाच्या समुद्रात जणू सागरी लाटांसारखे तरंग उत्पन्न व्हायचे. पाहणाऱ्यांची दृष्टी त्यावर खिळून राहायची आणि ते म्हणायचे - "धरतीनं भांडार खुलं केलं आहे. धुळीतून पीक तयार होतंय."

रवा पटेलनेदेखील दिलखुलासपणे सर्वांना आमंत्रण दिले होते. सारे सोयरेधायरे, मित्रमंडळी, गणगोत, व्याही-जावई झाडून साऱ्यांना बोलावणं पाठवतानाच निरोप धाडला होता की येताना सर्वांनी चांगल्यापैकी बैलजोडीदेखील बरोबर घेऊन यावं, ऊस पिळण्यासाठी लावलेला तो दृष्ट लागण्यासारखा अगडबंब चरक एका वेळी चार बैल लावले तरच चालू होई. त्यातून दोन धारांमध्ये वाहणारा मधासारखा गोड रस आटवून त्याचा गूळ तयार करण्यासाठी रवा पटेलने पंचक्रोशीत विख्यात असलेल्या गोवा हलवायाला भरपूर बिदागी द्यायचं कबूल करून बोलावलं होतं.

गोवा तरुण होता. त्याच्यात तारुण्याची रग आणि रंगेलपणाच फक्त नव्हता तर तरुण वयातच साधना करून मिळविलेल्या गूळ आटवण्याच्या विलक्षण कलेनं जणू त्याचं संपूर्ण व्यक्तिमत्व भारून टाकलं होतं. तो रसाचे हंडेच्या हंडे कढईत ओतत असो, उसाची चिपाडं टोपल्या भरभरून भट्टीत टाकत असो, नाहीतर ढेपाळ्यात गोठवलेला गूळ चपट्या खुरप्याने हलक्या हाताने अगदी सहजपणे सोडवून घेत असो त्याच्या प्रत्येक हालचालीतून डोकावणारी कसबी पाकशास्त्रज्ञाची कलात्मकता सर्वांना मुग्ध करून टाकीत असे.

आंधळे नेणसी भगत उसाजवळच्या मोकळ्या जागेत एक जुनीपुराणी मोडकी खाट घालून त्यावर बसून चोवीस तास राम नामाचा जप करायचे. गावकरी म्हणायचे "भगत, उसाचं पीक तर सोळा आणे खरे आलं होतं, पण रस जर इतका गोड निघाला नसता तर सर्वांवर बोळा फिरला असता."

"रस चांगला आहे ना ?" भगत पुन्हा विचारायचे.

"चांगला ? अहो इतका उत्तम आहे की रवाळ म्हैसूरपाकाहूनही उत्तम गूळ तयार होतोय."

'छान. छान ! खाणारे दुवा देतील. खूप खा, प्या आणि मजा करा. सीताराम ! सीताराम !"

संती लहानपणापासूनच आपल्या आजोबांनी सेवा करीत आली होती. म्हणून भगतला आपल्या विरक्तावस्थेतदेखील त्या मुलीच्या कामाची इतकी सवय जडली होती की संतीच्या सासरी पाठवणीची वेळ येऊन ठेवली तरी तिच्याशिवाय त्यांना आपली रुद्राक्षाची माळ, पायातले जोडे, हातातली काठी आणि अफूच्या गोळीची डबी शोधणे जड जात होते.

रवा पटेलने संतीला मुलीसारखं नव्हे तर मुलगाच समजून अतिशय लाडात वाढवलं होतं. म्हणून तिने कधी कधी जरा जास्तच सूट घेतली तरी कुणी काही बोलत नसे. तिचं लहानपणचं लालनपालन पाहून गावकरी म्हणायचे की रवा पटेल संतीला अजिबात कसला त्रास होऊ देत नाहीत, आणि तिची प्रत्येक इच्छा पुरी करायला तयार असतात. पण मुलीच्या जातीला इतकं कोडकौतुक बरं नव्हे, एखादे दिवशी पश्चात्ताप करायची वेळ यायची. संतीला मिळालेलं स्वातंत्र्य बऱ्याच जणांच्या डोळ्यांना खुपायचं आणि त्यांच्यातला एखादा वडिलकीच्या अधिकाराने पटेलला दोन शब्द सांगू लागला तर रवा पटेल हसून उत्तर द्यायचा, "संती माझी मुलगी नाही, ती तर वाऱ्याने झोडपलेली कोकिळा आहे ! मागच्या जन्मीच काही ऋण राहिलं असेल म्हणून माझ्या घरी उडून आली आहे. एक अशुभ दिवस येईल आणि हिच्या सासरची मंडळी येऊन हिला घेऊन जातील. माझी ही कोकिळा उडून जाईल ...."

आकाशाकडे पाहात रवा पटेल हे अखेरचे शब्द बोलू लागला की कधी त्याचे डोळे भरून यायचे. पण झालं काय की रवा पटेलच्या वात्सल्यातील हा बारकावा गावकरी समजू शकले नाहीत आणि कित्येक रंगेल तरुणांनी, जे आपल्या पात्रापात्रातेचा विचार न करताच बऱ्याच दिवसांपासून प्रेम करण्याच्याा खटपटीत होते, त्यांनी रवा पटेलच्या भाबडेपणाने बोललेल्या शब्दांपैकी (वाऱ्याने झोडपलेली कोकिळा) फक्त कोकिळा शब्द नेमका तेवढा नेमका उचलला आणि संतीच्या नावाशी जोडून टाकला.

गावच्या या तरुणांना काव्य माहीत नव्हतं. तरी पण त्यांनी दिलेल्या या नावात भरपूर काव्य सामावलेलं होतं हे मात्र करायलाच हवं. संती भल्या पहाटे शेतावर जायला निघाली, किंवा दुपारची न्याहारी घेऊन जाऊ लागली, किंवा संध्याकाळी

डोक्यावर हारा घेऊन परतू लागली की तिच्या पावलांच्या चाहुलीनं गावच्या सीमेचं यौवन जागं व्हायचं. अंगातून अस्पष्ट तारुण्याची प्रभा फाकीत ती सुकुमार देहलता अवघ्या सीमेच्या वातावरणाला ताज्यातवान्या आल्हादाने आप्लावित करून टाकायची.

एका चैत्रातील गोष्ट आहे. शेताकडे जाणाऱ्या वाटेवरील आमराईतील वृक्ष आंब्याच्या फळभाराने लवले होते. कोकिळा कुहू कुहू करून तक्रारीच व्यथित स्वरात गात होत्या. जणू बारा महिने राखण केल्यावर आता झाडांना आंबे आले तर त्यांचीच दाढ दुखू लागली असावी. त्यादिवशी तिसऱ्या प्रहरी नेणसी भगतला अफू देण्यासाठी जात असताना संती नकळत गाऊ लागली.

"चैतर चंपो म्होरियो ने म्होर्या दाडम दाख, !

कोयलडी टूहोका करे कांई बैठी आंबाडाल !"

(चैत्र मासात चाफा फुलला आहे. डाळिंब आणि द्राक्षं मोहरली आहेत. ही कोकिळा का म्हणून आंब्याच्या फांदीवर बसून कूजन करीत आहे?)

आणि आंब्याच्या फांदीवर कूजन करणाऱ्या कोकिळेला छेडण्यासाठी संतीने 'कुहू कुहू" चा स्वर तोंडून काढला त्यावेळी तिच्या अजिबात ध्यानीमनीही नव्हतं की गावचा उडाणटप्पू मुलगा वीर्या लपत छपत तिच्या पाठीमागे येतोय आणि तिच्या या सहज कृतीचं तो इतकं भांडवल करील की गावच्या शेंबड्या पोरापर्यंत सर्वांना हे माहीत होईल व गावाने रसिकपणाने दिलेलं 'कोकिळा' हे नाव सार्थक सिद्ध होईल.

चरक चालू झाले तेव्हापासून शेतात धामधूम राहू लागली. रवा पटेलच्या शेतात चार छप्परं तर अगोदरच टाकलेली होतीच. आता लहानसहान पाच छप्परं आणखी घालावी लागली. शिवाय दोन खोपटं देखील उभारावी लागली. चांगल्या धष्टपुष्ट बैलांच्या दहा जोड्या आलेल्या होत्या. म्हणून चरक सतत चालू रहात होता आणि रस पिणाऱ्यांची देखील सकाळपासून संध्याकाळपर्यत रीघ लागलेली रहायची.

खाऊ पिऊ घालायच्या बाबतीत नेणसी भगत सुरुवातीपासूनच उदार असल्याचे प्रसिद्ध होते. रवा पटेलचीदेखील त्याच्या सढळ हातामुळे आणि मोकळ्या स्वभावामुळे लोक "राजा" म्हणून प्रशंसा करू लागले होते. शेताला पाणी द्यायच्या वेळी एखादा अनोळखी माणूस जरी आला तरी तो रवा पटेलच्या शेतीतील काकडी, हरबरा किंवा ऊस खाल्ल्याखेरीज क्वचितच परत जायचा. परिणामी, चरक सुरु व्हायची महान सुसंधी येताच रवा पटेलचं शेत आणि घरदार सारं देवाचा दरबारच बनलं.

मांडव तर सदोदित कुशलक्षेम विचारायला येणाऱ्या लोकांनीच खच्चून भरलेला

राहू लागला. रवा पटेलने येणाऱ्या पाहुण्यांसाठी गाद्या घातलेले पलंग आणि खूपशा खाटा घालून ठेवल्या होत्या. इतकंच नव्हे, तर पाहुण्यांनी उसाच्या गंडेच्या करून खात रहावं म्हणून त्याने बरेचसे अडकित्ते देखील आणून ठेवले होते. ज्या लोकांना ऊस खात येत नव्हता त्यांच्यासाठी उसाचा ताजा रस पिण्याकरता तांब्या, फुलपात्रे हजर होती. रसावर घालण्यासाठी सुंठीची पूड देखील तयार असायची.

मांडवातून ज्यावेळी चसूचस् आवाज करीत गंडेऱ्या चोखल्या जायच्या किंवा घुटुक घुटुक करीत रस घेतला जायचा त्यावेळी प्रसन्न होणाऱ्या लोकांना बघून रवा पटेलचे डोळे समाधानकारक मिटले जायचे. नेणसी भगत आंधळे असूनही जणू नेत्रकूपांनी सारे दृश्य पिऊन टाकायचे आणि त्यांना सारं काही जाणवायचंही. मग डोळ्याने संकेत करीत ते तृप्तपणे म्हणायचे. "या बंधूनो आणि प्या. अगदी पोटभर प्या. ही सर्व धरतीचीच माया आहे. धरतीच्या लेकरांखेरीज आणखी कोण याने तृप्त होणार आहे ? धरती जितकं पाजील तितकं पिऊन घ्या. उद्याचं कुणी पाहिलं आहे ?"

असे म्हणत भगत उजव्या हाताची बोटं नाकपुडीपाशी धरत, जोराचा वास घेत आणि अशा तऱ्हेने जणू साऱ्या वातावरणातील नैसर्गिकता पारखून, संतुष्ट होऊन मग ते आपली जपमाळ ओढू लागत.

भगतना बरेच लोक साधू समजत होते. जगात राहूनही ते विरक्त होते म्हणून कित्येकांना विश्वास होता की ते कुणीतरी सिद्ध साधक आहेत. डोळे नसूनही केवळ बोटांचा वास घेऊन ते माणूस ओळखायचे म्हणून अनेक नास्तिकांची देखील भगतवर श्रद्धा होती.

गेल्या वर्षी ज्याप्रमाणे भयंकर कडक उन्हाळा पडला होता, पावसाळ्यात संतत मुसळधार पाऊस कोसळला होता, त्याचप्रमाणे यंदा हिवाळ्यात गोठवून टाकणारी कडाक्याची थंडी पडली होती. पण रवा पटेलच्या घरीदारी उडालेल्या गडबडीने अशी काही उष्णता निर्माण केली होती की, त्यामुळे हाडांचा थरकाप उडवणाऱ्या मकर संक्रातीच्या थंडीची देखील कुणालाच पर्वा वाटत नव्हती.

संतीला घेऊन जाण्यासाठी तिच्या सासरची मंडळी वीस माणसांचे वऱ्हाड घेऊन आली होती. म्हणून विशेष काम असल्याखेरीज संती शेतीकडे फिरकत नव्हती - नाही म्हणायला, भगतच्या अफूच्या डबीतील अफू कमी झाली की ती भरायला तिला जावं लागत होतं. कधी संध्याकाळी स्वैपाकाला उशीर झाला आणि गडी लवकर निघून गेला तर भगतचं जेवण द्यायलाही ती शेतावर जायची. माहेर सोडायचं दुःख

आणि सासरी जायचा आनंद अशा संमिश्र भावनांमध्ये सध्या ती तरंगत होती.

तिच्या सासरी जायच्या आदल्या दिवशी संध्याकाळी सत्यनारायण पूजा करायचं रवा पटेलनं ठरवलं आणि त्या दिवशी चरक बंद ठेवला.

थेट संध्याकाळी नेणसी भगतना आठवलं की आज अफू मागवायची राहून गेली. म्हणून एका मजुराहाती त्यांनी घरी निरोप पाठवला. संती त्यांना अफू द्यायला आली. त्यावेळी चरक बंद व्हायला आला होता. पण शेताच्या एका तुकड्यातील निम्म्या हिश्श्याचा ऊस तोडला गेला होता आणि निम्म्या भागातला अजून उभा होता. म्हणून आणखी थोडा वेळ लागेना का पण काम पुरं करावं असं ठरवण्यात आलं. मजूर चपळपणे काम करण्यात गुंतले होते. एकीकडे फटाफट ऊस कापला जात होता. दुसरीकडे त्यांचे शेंडे तोडून अलग केले जात होते आणि तिसरीकडे कापले छाटले गेलेले ऊस चरकात सुलभतेने सरकवता यावेत म्हणून त्यांना मोगरीनं बडवून चपटं करण्यात येत होतं. संती पण चटकन घागरा आवरून तिथं जवळच ऊस बडवायला बसली.

शेजारीच काम करणाऱ्या एका कामकरी बाईनं संतीला म्हटलं, ' काय संतीताई, आज तर अगदी कोरा करकरीत घागरा नेसला आहात ! ''

उत्तरादाखल काही बोलायच्या ऐवजी हर्षाविभोर संतीने आपल्या नेहमीच्या सवयीनुसार गायला सुरुवात केली -

''फूल-फगर नो घाघरो शीवडाव्यो शुकरवार,
पहेर्यो ने वळी पहेरीशुं कांई सासर ने दरबार
के आणी आव्या रे मोरां रे ॥

(हा बेलबुट्टीवर घागरा मी शुक्रवारी शिवून घेतला होता. आज नेसले आहे आणि सासरी जाऊनही नेसेन. कारण सासरची मंडळी मला घेऊन जायला आली आहेत.)

विलक्षण मार्दव असलेल्या स्वरात गायिलेल्या या ओळी ऐकून जवळच्या मांडवात चुलाण्यावरून कढई उतरून गरम गूळ बादलीत ओतणाऱ्या गोवाचे हात थांबले. कान टवकारले गेले. चमकून त्यानं संतीकडे बघितलं. रसरशीत लालबुंद चेहऱ्यावर समोरच्या पिंपळाच्या पानांमधून झिरपून येणारी सूर्याची अखेरची किरणं चकाकत होती. गोवासारख्या रसिक तरुणास हे दृश्य असह्य झालं. त्यानं तशाच मधुर स्वरात गायला सुरुवात केली -

''मारा वाडा मां गलछोडवो कोयलडी रंगभीनी ।
ई तो फाल्यो लचकालोळ कोयलडी रंगभीनी !''

(रंगेल कोकिळे माझ्या वाडीतील आंब्याच्या वृक्षांना फळं आलेली आहेत. रंगेल कोकिळे, ते वृक्ष फळभाराने लवले आहेत.)

तोवर समोरच्या क्षितिजावर सूर्य अस्तास गेला होता आणि सारे मजूर आपलं काम संपवून निघून गेले होते. गोवा गुळाच्या ढेपा तयार करू लागला.

संतीच्या डोक्यात "रंगेल कोकिळे" घोळत होते. वातावरणात सायंकाळची उत्तेजक मादकता भरली होती याच मादकतेने जणू भारावून संती विहिरीच्या काठाशी जाऊन उभी राहिली आणि ओठांवर आलेलं गीत जाऊ लागली -

"कूवाने कांठे ऊग्यो केवडो, गळियारा !
केवडो लणी लणी जाय रे, गळियारा !
केवडो लणी लणी जाय रे, गळियारा !'

(अरे गवळ्या, विहिरीकाठी केवडा उगवला आहे बघ तर, या केवड्याचा सुवास किती गोड आहे. अरे गवळ्या हा केवडा लवलवतो आहे.)

गोवाच्या हातातलं काम जिथल्या तिथं राहिलं. दूर कित्येक कोसांवरचं आपलं घर, आपली तरुण पत्नी - सारं काही त्याला आठवलं आणि परकं गाव, परकी शेतं परके लोक - साऱ्यांचा त्याला विसर पडला. भावनांच्या उद्रेकानं त्याला उन्मुक्त करून टाकलं आणि तो गाऊ लागला.

"रंगभीना रे ! अमे परदेशी पोपटा,
रंगभीना रे ! तमे ढळकतां ढेलडी,
रंगभीना रे ! अमे कळायेल मोरला,
रंगभीना रे ! तमे छो सरवर-नीर !
रंगभीना रे ! अमे परदेशी पंखीडां,
रंगभीना रे ! पंखीडांनी न्होय प्रीत,
रंगभीना रे ! पंखीडां उडी उडी जाय,
रंगभीना रे ! ऊडे एना न्होय ओरता !"

(रंगेल साजणे, मी परदेशी पोपट आहे, तू नाचणारी लांडोर आहेस, तर मी पिसारा फुलवलेला मोर, तू सरोवराचं पाणी आहेस आणि मी परदेशी पाखरू. पाखराशी प्रीत करायची नसते. कारण पाखरं उडून जातात. उडून गेल्यावर ते परतून येत नाहीत.)

दूर उसाच्या शेताजवळ खाटल्यावर पडल्या पडल्या नेणसी भगतने घाईघाईने संतीला दोन तीन हाका मारल्या. पण उत्तर आलं नाही. ते अस्वस्थ झाले आणि

सवयीनुसार आपली बोटं नाकाशी धरून हुंगू लागले.

संती म्हाताऱ्याची हाक ऐकू येण्याइतपत जवळपास नव्हती. आणि असती तरी गाण्याच्या नादात तिला कुठे काही ऐकू जाणार होतं !

"चासटिये चडीने रे में डोंया पंखीडां,

गंठेल गोफणिये रे में टोयां पंखीडां !"

(अरे, मी तर शेताच्या बांधावर चढून पाखरांना उडवून टाकलं. गाठीच्या गोफणीने मी पाखरांना उडवून लावलं.)

गात गात संती गोवाच्या मांडवापाशी जाऊन पोचली. सूर्याच्या मावळत्या किरणांनी गुलाल फासलेल्या तर सुंदर गुलाबी चेहऱ्याकडे गोवा थोडा वेळ भान हरपून बघतच राहिला.

मागल्या बाजूने तंबूच्या आत डोकावत संतीने म्हटले, " एकटेच गूळ बनवताय ? एकलकोंडे !"

गोवाने वळून बघितलं. तो हतप्रभ झाला. काय बोलावं तेच त्याला उमजेना. एव्हाना सारे नोकर चाकर, गडी माणसं जेवायला निघून गेली होती. काही क्षणांपूर्वी लोकांनी गजबजलेलं ते शेत यावेळी एकदम रिकामं वाटत होतं. फक्त उसाच्या बाजूने भगतच्या खोकण्याचा आवाज ऐकू येत होता. गोवाने नम्रपणे पण अर्थपूर्ण उत्तर दिलं, "एकटा माणूस एकलकोंडाच राहणार. दुसरा जोडीदार कुठनं आणणार ? ऐकून संती लाजली. या अपरिचित माणसापासून दूर पळून जावं आणि दूर खाटेवर निजलेल्या आजोबांपाशी पोचावं असं संतीच्या मनात आलं. तिचे भरदार वक्षःस्थळ धपापू लागलं. वायुगतीने धावणाऱ्या हरणाच्या पाडसासमोर अचानक शिकारी आल्यास तो जसा भेदरून जातो तशीच गोवाला पाहून संतीची घाबरगुंडी उडाली. ती अस्वस्थ झाली. झटपट निघून जाण्यासाठी तिने घागरा आवरला आणि भट्टीवर ठेवलेल्या कढई व तिच्या जवळच उभा असलेल्या गोवाच्या मधून वाट काढीत ती चालू लागली. तोच गोवाच्या हाताचा तिच्या उघड्या कंबरेला स्पर्श झाला संती थरारली. हृदयाची धुकधुकी आणि देहाचा थरकाप कमी करण्यासाठी समोर थंड होण्यासाठी ठेवलेल्या गुळाकडे पाहून ती जणू बोलायला हवं म्हणूनच बोलल्यासारखी म्हणाली, " गूळ तर अगदी सोन्यासारखा सुरेख झालाय."

शेतांमध्ये संध्या छाया पसरल्या होत्या. समोरून पडणारं फिकट चांदणं संतीच्या चेहऱ्यावर विलसत होतं.

गोवा आपल्याच खुमारीत उद्‌गारला "खाणारे काय कमी सुंदर आहेत ?"

विजेचा धक्का बसल्यासारखी संती दोन पावलं मागं सरकली. तिच्या आत काही तरी सणकन थरारून गेलं. गोवाचे शब्द ऐकून नजर खाली करून संती आपल्या हातावर मनगटापासून कोपरापर्यंत गोंदलेल्या गोंदण्याकडे सहज बघू लागली.

गोवादेखील तिच्या हाताकडे एकटक पाहात होता. त्याने विचारले, "कुणाकुणाची चित्रं गोंदून घेतली आहेत ?"

तो साधा प्रश्न ऐकून संतीच्या जिवाची धुकधुकी आणि घबराट शांत झाला. भोळेपणाने तिने उत्तर दिले, "हे तर मी लहान होते तेव्हा चारजणांनी जबरदस्तीने मला धरून ठेवून चिमणीचं चित्र गोंदून टाकलं होतं. गोदणारी वाघरीण (वाघरीण जातीची बाई) आपली भाल्यासारखी टोकदार सुई मंजिष्ठात बुडवून खच्‌खच् टोचायची." सांगता सांगता संतीच्या तोंडून अस्पष्टसा सीत्व... बाहेर पडला.

गोवाने थोडी जवळीक वाटून म्हटलं, " मोठी नाजुक कळीच होती नाही का ? जराशी सुई टोचलेली देखील सहन झाली नाही ?"

संती मोकळेपणाने म्हणाली, "होय बाई. मी तर आहेच मुळी नाजुक कळी. गोंदणारी बाई खच्चखच सुई टोचत होती. पण ती मात्र डोळे गच्च मिटले होते. अखेर जेव्हा माझे हात पाय सोडले तेंव्हा मी डोळे उघडून पाहिलं तर सबंध हातावर रक्ताचे थेंब भरलेले होते, आणि मी जेव्हा हातावरून ते रक्त पुसून टाकले तेव्हा हातावर एक मजेदार चिमणी बसलेली मला दिसली."

संतीने गोवाच्या जवळ जाऊन त्याला हातावरचं चित्र दाखवलं. कुतुहलाने गोवाने तो हात जवळ धरून चांदण्याच्या उजेडात गोंदलेलं चित्र बघितलं.

मकर संक्रातीच्या थंडीच्या वेळचं रक्त गोठवून टाकणारं दव पडायला सुरुवात झाली होती. चंद्रोदय होऊन फार काळ लोटला नव्हता. तरी पण थंडीच्या दिवसातल्या प्रदीर्घ रात्रीमुळे असं काही वातावरण झालं होतं. जणू मध्यरात्र उलटली असावी. आपल्या हातावरच्या गोंदण्याची गोष्ट गोवा संतीला सांगत होता.

तिकडे अफू द्यायची वेळ टळून गेली होती म्हणून भगतचं अंग दुखू लागलं होतं. डोक्यात घण बसू लागले होते. त्यांनी संतीला खूप हाका मारल्या पण कोण ऐकतंय ? उसाचे राखणदार तर बरीच रात्र उलटल्यावर यायचे. नेहमी शेतात राहणाऱ्यांचे देखील अजून जेवणखाण आटोपलं नव्हतं. ते ही अजून आले नव्हते. भगतना संतीची काळजी वाटू लागली आणि दोन्ही बोटं नाकाशी धरून ते साऱ्या वातावरणाचा थांग घेऊ लागले.

त्या दिवशी संध्याकाळी रवा पटेलने शिऱ्याचा बेत केला होता. तो तयार व्हायला

वेळ लागल्याने रात्रीच्या जेवणाला बराच उशीर झाला होता. भरीला वऱ्हाडातल्या इतक्या लोकांची मेजवानी होती ! म्हणून पाव्हण्यांच्या नंतर घरच्या मंडळींना आणि त्यानंतर व्याह्यांच्या गडी माणसांना, गाडीवानांना खाऊपिऊ घालता घालता बराच उशीर झाला.

भटजींनी सांगितलं होतं की सासरी पाठवायला सकाळचाच मुहूर्त चांगला राहील. म्हणून रवा पटेल व्याह्यांच्या गाड्यांची आणि बैलाची व्यवस्था बघत होते. उद्या सकाळी लेक सासरी जाणार. तिच्या वियोगाचं दुःख त्याच्या चेहेऱ्यावर पसरलेलं होतं. वऱ्हाडी मंडळी जेवून खाऊन त्यांच्यासाठी गाद्या घालून अंथरलेल्या खाटांवर जाऊन निजली होती.

घरात त्यावेळी संतीला दिलेले कपडे नीट लावून ठेवले जात होते. एक खास महाग ओढणी अजून आत ठेवली नव्हती. कारण संतीच्या मैत्रिणींचं म्हणणं होतं की सकाळी गाडीत बसायच्या वेळेला संतीला ती ओढणी नेसायला लावायची. अचानक एका मैत्रिणीने संतीची विचारपूस केली तेव्हा शेतात राहणाऱ्या एका माणसाने सांगितलं की संतीताई तर भगतना अफू देण्यासाठी शेतावर गेली आहे.

हे ऐकून घरच्या लोकांना आश्चर्य वाटले. पण रवा पटेलने त्यांना धमकावीत म्हटलं, ''संतीचं घरातल्या इतर कुणाहीपेक्षा आपल्या आजोबांवर जास्त प्रेम आहे, आज बिचारी आजोबांना पोटभर भेटून घ्यायला गेली आहे. उद्या ह्यावेळी तर माझी कोकिळा उडून कुठल्या कुठं जाऊन पोचेल. ती बिचारी तर वाऱ्यानं झोडपलेली कोकिळा आहे.''

हे ऐकून संतीच्या तरुण मैत्रिणीनी एकमेकींकडे पाहिलं आणि तोंड वळवून त्या हसल्या. एकीने तर रवा पटेलला ऐकू अशा बेताने म्हटलं देखील - ''उद्या तर यावेळी ताई मजेत . . . त्यावेळी आमची कुणाची आठवण देखील होणार नाही.'' रवा पटेलने विषय बदलीत शेतावर काम करणाऱ्यांना तेथे परत पाठवीत म्हटले, ''लवकर जा. आणि संतीला लगेच पाठवून द्या.''

शेतावरची माणसं रोजच्यासारखी गोवाचं जेवण घेऊन शेताकडे निघाली. शेत शुभ्र चांदण्यात शांत स्तब्ध होतं. संतीला खूप हाका मारूनही उत्तर न आल्याने भगत गप्प झाले होते आणि पुनः पुन्हा बोटं नाकाशी धरून हुंगत होते. दिवसभर गोंगाट करणारे पक्षी दमून भागून घरट्यात विसावा घेत होते. संध्याकाळी मिरच्यांना पाणी दिल्यावर निथळण्यासाठी विहिरीच्या काठाशी सोडलेली मोटदेखील एव्हाना निथळली होती आणि विहिरीत ओघळणाऱ्या थेंबाचा टपटप आवाजदेखील बंद झाला

होता. रातांधळे खेकडेदेखील विहिरीच्या दोन पुरुष खोल भिंतीच्या सांध्यात एकमेकांना चिकटून झोपी गेले होते. फक्त विहिरीवरच नव्हे तर अवघ्या शेतमळ्यात निस्तब्धता पसरली होती.

पूर्वेकडून शेतात जाण्यायेण्यासाठी दोहो बाजूंना खुंट रोवून तयार केलेल्या रस्त्यावर कुणीतरी खाकरून घसा स्वच्छ केला आणि पावलांची चाहूल लागली तशी संती ताडकन उठून उभी राहिली आणि भगतकडे धावत सुटली. आजोबांना जी अफूची गोळी देण्यासाठी ती आली होती. ती अजून तिच्या चोळीत तशीच असल्याचे तिला आठवले. झटपट तिने ती पुडी बाहेर काढली आणि अफू डबीत ठेवून ती डबी भगतना देण्यासाठी ती त्यांच्यापाशी पोचली.

संतीमध्ये आज अकस्मात काही तरी बदल झाल्याचं आंधळ्या भगतना जाणवले. तसं पहिल्यास रोज त्यांना संतीच्या नवविकसित कुंदकळीसारख्या अस्पष्ट देहातून कोरड्या धरणीवर पावसाचे थेंब पडल्यावर ओल्या मातीचा सुवास यावा तसा सुवास यायचा. पण आज पहिल्यांदा त्यांना तिच्यापासून घामाचा आंबट-कुबट असा वास आला.

त्यांनी पुन्हा बोटं नाकाशी धरून वस्तुस्थितीचा अंदाज घ्यायचा प्रयत्न केला.

बिंग फुटल्यावर अपराध्याला जो ओशाळेपणा, शरम, पश्चाताप आणि घबराट वाटू लागतो तोच संतीला वाटू लागला. यंत्रवत ती एक पाऊल मागं सरली.

भगतनी अफू घेण्यासाठी हात पुढं केला. पण संती तिथं नव्हती. त्यांनी पुन्हा बोटं हुंगली. संतीची घाबरगुंडी आणखी वाढली. तिचं हृदय विदीर्ण होऊ लागलं. आजोबासमोर ती मुकाट्याने उभी राहिली.

अफू घेण्यासाठी भगत पुढे झाले. त्यांनी हात पुढे केला. पण संती आणखी मागे सरकली. काय होतंय ते भगतना समजेना. ते पुन्हा बोटं हुंगू लागले. संतीला हे सारं असह्य होतं. पट्दिशी तिने खाटेपाशी ठेवलेल्या माठातून थोडंसं पाणी पेल्यात काढलं आणि अफूची गोळी त्यात मिसळली.

थोड्या वेळानं भगतांनी विचारलं, ' संती बेटा, अफू आणली आहेस ना ?''

संतीच्या डोळ्यात एक अवर्णनीय चमक आली आणि अदृश्य झाली. तिला जीवनाचा मार्ग सापडला. धैर्यपूर्वक तिने उत्तर दिलं, ''दादा, अफू आणायला तर मी आज - विसरलेच.''

इतकं बोलून दूर उभ्या उभ्याच तिनं तो अफूचा पेला ओठांशी लावला आणि घटाघटा पिऊन टाकला. मग अवाक्षर न बोलता रिकामा पेला फेकून देऊन ती घाईने

घराकडे निघाली.

गावकऱ्यांना दुसऱ्या दिवशी आश्चर्याचे एक, दोन नव्हे तर तीन तीन धक्के बसले. सर्वांना वाटलं होतं की, उषःकालाच्या शुभ्र मुहूर्तावर रवा पटेलची संती भारीपैकी ओढणी नेसून, सजविलेल्या बैलांच्या रथात बसून सासरी जाईल. पण त्या ऐवजी त्याच ओढणीत लपेटलेला तिरडीवर ठेवलेला मृतदेह चार जणांच्या खांद्यावर बाहेर पडला आणि सासरच्या दिशेने जायच्या ऐवजी पश्चिमेच्या स्मशानाकडे जाऊ लागला.

तिसऱ्या प्रहरी वेशीकडून परतणाऱ्या ताक मागून नेणाऱ्या बायकांनी बातमी दिली की कुठल्या तरी अशुभ घटकेला आंधळ्या नेणसी भगतचं डोकं फिरलं आहे. रात्रभर त्यांचा डोळ्याला डोळा लागला नाही आणि ते मोठमोठ्यांदा खी खी करीत राहीले आहेत. शेजारच्या शेतात राहणारे लोक जेव्हा संतीच्या मृत्यूचा शोक व्यक्त करण्यासाठी त्यांच्यापाशी गेले तेव्हा भगत वेड्यासारखे म्हणू लागले, ''इंद्राची अप्सरा जोगिणीचा वेष घेऊन क्रीडा करण्यासाठी या मृत्यूलोकात अवतरली होती. मूर्तिमंत कुंकवासारख्या अप्सरेचं तेजस्वी रूप पाहून मानवदेहधारी कुणीतरी माणसाने आंधळं होऊन चुकून तिच्या पदराला स्पर्श केला. त्याचा स्पर्श होताच ती कुंकवाची मूर्ती राखेचा ढीग होऊन कोसळली. - खी खो खी ! अगदी पांढरी शुभ्र राख ! भस्मच समजा ! स्मशानात चिता पेटल्यानंतर प्रेताची राख पाहिली आहे ? त्यांच्यापेक्षाही जास्त पांढरी ! फक्त राख ! हो हो हो ! एकदम रोगी राख !''

भगतचा हा प्रलाप ऐकून जाणते लोक म्हणाले की काल संध्याकाळीच कोणत्या तरी वेळी भगतचं डोकं फिरलं असावं.

या दुसऱ्या आश्चर्यातून गावकरी सावरतात न सावरतात तोच तिसरी बातमी आली. गूळ बनविणाऱ्या गोवाचा कुठे काही पत्ता नव्हता !

# कुरुक्षेत्र

□ सुरेश जोशी

रात्री दोन वाजता मी घरात पाय ठेवला. गल्लीतल्या दिव्यांच्या प्रकाशाची डोळ्यांत शिरलेली कणी घरातल्या अंधारात खुपायला लागली. घरातल्या एका कोपऱ्यात मंद करून ठेवलेल्या कंदिलाची वात मी पुढे सारली. त्याच्या फुटक्या काचेतून वारं आत शिरलं तशी वात थरथरू लागली. तिच्या थरथरीबरोबरच घरातल्या सर्व वस्तूंच्या सावल्यादेखील थरथरू लागल्या. आणि सारं घरच वादळात सापडलेल्या एखाद्या जहाजाप्रमाणे हेलकावे खात असल्यासारखं मला वाटलं. वरच्या दांडीला धरून मी जरा वेळ तसाच उभा राहिलो. शहरातल्या गल्लीत भटकणारा अंधार श्वासाबरोबर आत शिरून हळूहळू जड होत शरीराच्या कुठल्या तरी तळाशी साचू लागला. त्याच्या ओझ्याने माझे पाय लटपटू लागले. एखादी सिगारेट फुंकावी असं मनात आलं. पण एकही सिगारेट शिल्लक उरली नव्हती. बिछान्यापाशी ठेवलेल्या तांब्यातून पाणी काढून प्यायलो. बिछान्याच्या काठाशी बसून मी इकडं - तिकडं पाहिलं. दुसऱ्या खोलीच्या दाराशी धोतराने तोंड झाकून म्हातारा झोपला होता. - सरळ सपाट, जणू आता तिरडीवर घालायलाच काय तो अवकाश आहे. आपल्या आयुष्याच्या खडबडीत पासष्ट वर्षांना चितेतील लाकडांसारखे एकावर एक रचल्यानंतर तो स्वतः जणू त्यावर आडवा झाला होता. आई आणि वहिनी स्वैपाक घराच्या वास मारणाऱ्या दमट वातावरणात निजल्या होत्या. थोरल्या भावाची आज 'नाईट' होती म्हणून मधल्या खोलीत आज आम्ही गृहस्थाश्रमाचा उपभोग घेणार होतो. निद्रारूपी दुःशासनाने वहिनीचे कपडे विस्कटून टाकले होते. आईचं बोळकं तोंड तिच्या तपकिरीच्या डबीसारखंच अर्धवट उघडं होते. आणि माझ्याशेजारी अंथरुणावर माझी बायको झोपली होती - इतकी लहान की 'बायको' शब्दाचं ओझंदेखील पेलवणार नाही. सोमवारच्या व्रत-कथेचं पुस्तक तिच्या उशाशी पडलेलं होतं. तिचं तोंड आणि डोळे अर्धवट उघडे होते आणि ती गाढ झोपली होती. का कुणास ठाऊक माझ्या मनात आलं की मेल्यावरही हिचा चेहरा असाच दिसेल आणि मला हिचं तोंड व डोळे बंद करावे लागतील !

मी बाहेरून तो गारवा घेऊन आलो होतो तो आतल्या उकाड्यात नाहीसा झाला आणि कंदिल कमी करून मी अंथरुणावर निजलो. जवळ निजलेल्या बाईच्या अबोध चेहऱ्याकडे मूर्खासारखं पाहता पाहता मला हसू आलं.

हिनं अजाणता किती मोठ्या जबाबदारीचं ओझं शिरावर घेतलं आहे. क्षणोक्षणी हजारो तऱ्हेनं हजारो तुकड्यात भंगून, तुकडे तुकडे होऊन भटकणाऱ्या मला ती आपल्या छोट्याशा गर्भाशयात एकत्र जुळवून पुन्हा उत्पन्न करू पहात होती. किती बेफिकिर झोपली होती ती ! सोमवारच्या व्रताचा आधार घेऊन ती निश्चिंत होती !

कंदिलाची मंद वात घोरपडीच्या जिभेसारखी वळवळत होती. थोड्याच वेळात उंदरांनी धाडस करून आपलं कार्य सुरू केलं. मी डोळे मिटून घेतले. दिवसभरात पाहिलेल्या अनेक दृश्यांचे तुकडे, अंतराळात निसटलेल्या ग्रहांसारखे इकडून तिकडे भटकत आपसात एकमेकांवर आदळू लागले. दिवसभरात ऐकलेले अनेक आवाजदेखील हळूहळू ऐकू येऊ लागले. हे सर्व माझ्या पाचवीलाच पुजलेलं आहे. झोपेतदेखील हे सर्व माझ्या आजूबाजूला घोटाळत असतं. पण आजूबाजूच्या गप्पा ऐकतांना किंवा त्यात भाग घेताना माझं तिकडं लक्ष नसतं. माझं मन त्यापासून दूर गेलेलं असतं. म्हणून कित्येकदा मी मुद्दाम उसना वितंडवाद घालत बसतो. क्षुल्लक गोष्टींवरून अटीतटीवर येऊन झुंजायची मला सवयच जडली आहे. - मग ते पेलाभर पाणी पिण्यासाठी का असेना !

म्हणूनच तर आज मी मनुभाई मास्तरांच्या चंद्रकांताला थप्पड लगावली. मी गौरीची गीते लिहितो. म्हणून ती माझ्या नादी लागली आहे. माझं काय. मी थोडे शब्द जुळवतो. उदा. - फाल्गुन आणि श्रावण, राधा आणि कृष्ण आणि त्या शब्दांतच माझी भूकही लपवून टाकतो. चंद्रकांता ती गाणी गाऊ लागली की बरं वाटतं. मग, माझ्या सवयीनुसार मी भावनांना आणखी जोरात खेचतो - तेरा वर्षाच्या चंद्रकांताची हनुवटी धरून म्हणतो - ''चंद्रा, तू इतकं गोड गाणार असशील तर मी तुझ्यापुढे गीतांचा ढीग लावीन. अगदी पारिजातकाच्या फुलांसारखा.'' ही आकस्मिक प्रणययोक्ती ऐकून चंद्रकांता वेंधळ्यासारखी माझ्याकडे पहातच राहते. खाली तिच्या मैत्रिणी धिंगाणा घालीत असतात, गात असतात, नाचत असतात, उड्या मारीत असतात आणि चंद्रकांता किंकर्तव्यविमूढ होऊन बसलेली असते. एकाएकी माझ्या मांडीवर डोकं ठेवून ती तिच्या डोळ्यांनी माझ्याकडे बघते आणि का कुणास ठाऊक मी अस्वस्थ होतो. अवेळी केलेल्या तिच्या या प्रेमचेष्टेनं माझ्या मनात जुगुप्सा निर्माण होऊ लागते. विजेचा धक्का बसल्यागत मी उठून उभा राहतो. चंद्रकांता' खाली पडते

आणि माझे पाय धरते. मी खाली वाकतो - तिचा हात धरून तिला उठवायला, पण तिच्या डोळ्यातील विव्हलता, तिच्या हाताच्या पकडीत असलेली लोलुपता मला उत्तेजित करून टाकते आणि मी' तिला एक थप्पड लगावून निघून येतो.

कंदिलाची ही फिकट ज्योत डोळ्यांच्या बंद पाण्यावर लवलवत राहते. चंद्रकांताच्या त्या विव्हल हातासारखी विळखा घालत राहते. मला राहवत नाही. मी कंदिल मालवतो. बस्स, आता तोंडात एक सिगारेट असती तर काय मजा आली असती - अंधारात तिचा निखारा फुललेला पाहात राहायला बरं वाटतं. पण बिछान्यावर निजताना बायकोचा हात माझ्या पाठीखाली दबतो. आणि मला केतकी मेहता आठवते. 'हॅव मोर' मध्ये कपात चहा ओतताना तिचा हात कसा थरथरत होता ! तिच्या हातावरची विरळ लव, कोपरापासून वरच्या भागाचा गुळगुळीत मांसलपणा .... जराशी शंका येताच तिच्या चेहऱ्यावर कशी लाली फुलायची ! मी चहाची धार पहात होतो, टयूब लाईटच्या प्रकाशाने ओथंबलेला तो हात पहात होतो, चहाच्या गरम वाफेबरोबर येणाऱ्या तिच्या रेशमी साडीच्या सुवासाचा आनंद घेत होतो आणि काही बोलतही होतो. मग तो हात तिच्या साडीत लपला. आणि मी विमनस्क झालो. कोणत्याही स्त्रीला मी पुरती संपूर्ण पाहू शकत नाही. मला वाटतं की त्या स्त्रीचं व्यक्तित्व शरीराच्या एका विशिष्ट भागातच असतं आणि स्त्रीला पाहताच तो भाग ओळखू येण्याइतकी पारख मला आहे. कुणी पाय हलवते, कुणी उगाचच मान तिरपी करून पुनः पुन्हा मागं वळून बघते. कुणी थोड्या थोड्या वेळानं केसांत बोटं फिरवते, कुणी ओठं मुडपीत असते. बस् ! त्यानंतर या स्त्रीमध्ये पाहण्यासारखं मला काही दिसत नाही. पण माझी बायको झोपेत आपल्या पतीच्या स्पर्शाचा आनंद घेऊ शकत नव्हती. लहान, मातृविहिन बालिकेसारखी ती अस्पष्टसे काहीतरी बडबडते आणि पुन्हा कूस बदलून शांतपणे झोपी जाते. तिच्या मैत्रिणींनी नवऱ्याला मुठीत ठेवण्यासाठी तिला ज्या काही सूचना दिल्या असतील त्या सर्व या झोपेपायी वाया जातात आणि किशोरावस्थेतील सृष्टीच्या स्वप्नांत विहार करीत पडून राहते. अंधारात तिच्या शरीराच्या रेखाचा पुसट आभास फक्त दिसतो आणि म्हणूनच तर अंधारात माझी कल्पना अधिक सक्रिय होत असते. रीटाने मोठ्या नखऱ्याने बांधलेल्या केसाचा 'पोनी टेल', रेखाचं बोलणं बोलता बोलता मध्येच थांबायची आणि डोळे मिचकावून पुन्हा संभाषणाचं सूत्र शोधायची तिची लकब, तिचा आवाज - सारे काही मला आठवायला लागतं. रेखाचं बोलणं तिच्या आवाजासाठीच फक्त मी ऐकत असतो. तिच्या बोलण्यातून फारसं काही निष्पन्न

होत नसतं. तिच्या आवाजाला गोड म्हणता येणार नाही, तरी पण ती मला आवडते. तो आवाज एक प्रकारची वातावरण - निर्मिती करतो. तो आवाज ऐकतांना वाटतं जणू याने आपल्या चारी बाजूंना एक अर्धपारदर्शी पडदा टाकला आहे. त्या आवाजाला रुची आहे - पीच फळासारखी, ज्यात गोडी असते पण त्याचबरोबर कडवटपणाही असतो. म्हणूनच तो अधिक रुचकर लागतो. हूं ! रेखाचा आवाज, मीनलच्या एवढ्या तेवढ्यावरून वक्र होणाऱ्या भुवया ... शीलूला उगाचच आपल्या शरीराला हेलकावे घ्यायची सवय आहे. जणू वृक्षाच्या फांद्या हवेत झुलत असतात. हे सर्व तुकडे मी अंधारात गोळा करीत राहिलो. त्या सर्वांची मी अंधारात एक नारी मूर्ती घडवू लागतो. माझ्या जवळ झोपलेल्या नारीदेहाच्या रेखाकृतीत या सर्व तुकड्यांना जोडून पहावं असं माझ्या मनात येतं. झोपमोड झाल्याने डोळे चुरचुरु लागतात. नसांमधून रक्ताची धडधड कमी होते आणि माझ्या शेजारी झोपलेल्या शरीराच्या हृदयाची धकधक मला ऐकू येऊ लागते. नुकतंच अंगणातल्या फरशीच्या स्तब्धतेला माझ्या पायांनी अशाच धकधकीनं हादरून टाकले होते. आवाजदेखील कधी कधी एकदम पाठी लागतात - डिवचलेल्या मधमाश्यांसारखे चहूबाजूंना घोंगावू लागतात.

निद्राभाराने दबलेल्या माझ्या बायकोच्या देहाला मी माझ्याकडे ओढून वळवलं. झोपेत तिचा एक पाय अर्धवट वर उचललेलाच राहिला. थोडा वेळ तसाच राहिल्यानंतर तो पाय माझ्या दिशेनं खाली येऊ लागला. अखेर एका झटक्यानिशी तो माझ्यावर येऊन कोसळला. आपल्या मनात एकत्र केलेल्या त्या तुकड्यांना पुनश्च पारखायचा मी प्रयत्न केला. शीलूचा वाऱ्यावर झुलणाऱ्या वृक्षाच्या फांदीसारखा उगाचच हेलकावे खाणारा देह - पण त्या पायामुळे त्या देहावरचा झोपेचा भार माझ्यावरही कोसळू लागला. तरी मी विवश झाल्यासारखा उत्तरोत्तर वजनदार होत चाललेल्या पायाखाली पडून राहिलो. त्याचवेळी म्हातारा खोकत खोकत उठून बसला. पुढचा दरवाजा उघडून बाहेर गेला. बाहेरचा वारा आत आला. गल्लीतल्या दिव्याचा उजेडदेखील दारातून वळवळत आत आला आणि माझ्यावर पडलेल्या पायाला बाजूला करण्याचे साहस मी करून टाकले.

दार पुन्हा बंद झाले. बाहेर पळून जाऊ पाहणारी घरातील बंद हवा आतच डोकं आपटीत राहिली. आतला उकाडा पुन्हा वाढू लागला. त्या उष्ण हवेबरोबरच पत्नीच्या केसांतून धूपबत्तीचा वास आला आणि माझा जीव गुदमरू लागला.

अशा प्रकारे अनेक शत्रूंशी एकट्यानेच लढा देणाऱ्या पौराणिक वीरासारखा मी

बिछान्यावर पडल्या पडल्या झुंजू लागलो आणि या झुंज देण्याच्या नादात जवळच निजलेल्या पत्नीच्या शरीराला मी हिसडा दिला. ती पुन्हा काही पुटपुटली - ''अं - अं - कोण आहे ?'' मी उत्तरलो - ''मी आहे.'' आणि ती सरळ उठून बसली. मी विचारलं - ''काय करतेस ?'' ती म्हणाली, ''तुमच्यासाठी दूध ठेवलंय ते घेऊन येते.'' मी म्हटलं, ''राहू दे, मला नको.''

ती काही बोलणार तोच मी अचानक तिचा हात धरून तिला जवळ ओढली. माझ्या चेहऱ्यावरची अस्वस्थता तिला अंधारात दिसली नाही, म्हणून ती भाबडी बिचारी याला प्रेमक्रिडाच समजली. ती माझ्या आणखी जवळ सरकली आणि असहाय्य शिशूसारखी माझ्या छातीत तोंड लपवू लागली. ती जवळ आल्याने माझी क्षुब्धता वाढू लागली. आणि माझा श्वास गुदमरू लागला. बाहेर गल्लीत पळून जावंसं मला वाटू लागलं. पण आता त्या दोन्ही हातांचा विळखा माझ्या अवतीभवती पडलेला होता. गावात झाडाची फांदी धरून झोका घेणारे हात, विहिरीतून पाणी काढणारे हात, अंगणात गोवऱ्या थापणारे हात, त्याच वेळी शेजारच्या दामू काकांना खोकल्याची उबळ आली, त्यांनी कफ थुंकला, गुळण्या केल्या आणि चार वेळा 'हे प्रभू' म्हटलं. त्यानंतर पुन्हा शांतता पसरली.

तो अंधार आणि निस्तब्धता .... आणि त्यांच्या तळाशी धाकधूक करणारे दोन जीव. आम्ही दोघंही काही निर्माण करू इच्छित होतो. मोडक्या तोडक्या संसारातून जडणघडण करून काही रचना करण्याची माझी इच्छा होती. पण सृष्टीरचना अंधाराच्या गर्भातच होत असते. मातेच्या गर्भाशयाच्या अंधारातच बाळाचं पोषण होत असतं. माझ्यापाशी इतका अंधःकार नव्हता. म्हणून तर ती पुनःपुन्हा अंधाराकडे पाहात होतो आणि माझ्या जवळची ती स्त्री माझ्या छिन्नभिन्न अंशामधून अर्क पिळून काढून त्याला आपल्या गर्भात कसला तरी आकार देऊ इच्छित होती. मातेच्या गर्भाशयात अंधाराची कमतरता नव्हती. तो तर जन्म जन्मांतरापासून चालत आलेला आहे. मी धुमसू लागलो. तिला असे धारदार तुकडे देईन की जे गर्भाच्या अंधारातही जोडले जाणार नाहीत आणि तिच्या शरीराच्या प्रत्येक नसानसाला विच्छिन्न करून टाकतील. या विचारासरशी मी आपलं शरीर तिच्या बाजूला झोकून दिलं. या घरचं मौन, या घरचा संताप, या घरात तुकड्यासारखे विखुरलेले प्राणी - सर्वांना आठवत मी माझं शरीर तिला सोपवून टाकलं. आई पाणी प्यायला उठली. माझ्या बायकोचे दोन्ही हात माझ्या कमरेला जळवांसारखे चिकटले. आम्हा दोहोंच्यामध्ये चेंगरल्याने उकाडा आणखीनच असह्य झाला. तो उकाडा लाव्हा

रसासारखा शरीरातून वाहू लागला. डोळे अधिक चुरचुरु लागले. पावसाळी किड्यांसारखं माझं शरीर हजारो पायांवर चालू लागलं. एकाएकी मी घसरून पडलो. जणू झोपेच्या पुरासमोर बांधलेला बांध फुटला असावा.

त्या तंद्रीत माझ्या मनासमोर एक चित्र तयार होऊ लागलं. विस्तीर्ण रणक्षेत्रात पडलेल्या शरीरांच्या ढिगांमध्ये मी पडलो आहे. मी संपूर्ण नाही. माझा एक हात इथं पडलाय. दुसरा दूर कुठंतरी आहे. डोकं तिसऱ्याच जागी कुठंतरी हरवलं आहे. त्याच वेळी माझी बायको मशाल हाती घेऊन मला शोधत माझ्या जवळ येते. ती माझे अवयव गोळा करते. तिच्या भांगेत सिंदूर आहे. हातात कुंकू आहे. ती स्वतःच्या हातांनी चिता पेटवते आणि मला मांडीवर घेऊन त्यात प्रविष्ट होते. आगीच्या ज्वाळा आम्हाला गिळून टाकतात आणि मी जळतच राहतो. अखेर मला सहन होत नाही आणि मी डोळे उघडतो. बाहेर ऊन पडलंय. त्याचे काही टोकदार किरण माझ्या डोळ्यांवर पसरले आहेत. मी उठून बसतो. डोळ्यांची अजून आग होत असते. उठून मी स्वैपाक घरात जातो. माझ्यासाठी ठेवलेला चहा गरम करून आई मला देते. त्याला धुराचा वास येतोय. तो अमृतासारखा पीत मी बसून राहतो आणि अंगणातल्या चुलीच्या राखेवर विखुरलेल्या उन्हाच्या चकाकत्या तुकड्यांकडे बघत राहतो. अचानक कवितेची ओळ स्फुरते - कुरुक्षेत्रावर एकोणिसाव्या दिवसाचा सूर्य उगवला आहे. सौभाग्यवतीच्या भग्न कंकणासारखा प्रकाश विखुरलेला आहे. सतीच्या हातातून ओघळणाऱ्या कुंकवासारखा तो पूर्वेकडच्या क्षितीजाच्या हातातून निसटत आहे.

बाहेर बसलेला माझा धाकटा भाऊ पाढे घोकतोय. माझ्या काव्याच्या ओळी त्याच्या आवाजात गुंतून जातात. आजूबाजूच्या आवाजांमधून मी माझ्या लहानग्या कवितेला बाहेर घेऊन जाऊ लागतो. असं वाटतं जणू एखाद्या लंगड्या बाळालाच चालवतोय. कारण माझी कविता अजून चालायला शिकलेली नाही.

बाहेरच्या प्रखर प्रकाशात तिचे डोळे उघडत नाहीत. मिटल्या डोळ्यांच्या त्या कवितेला मनातच कुठंतरी लपवून मी पुन्हा रात्रीच्या निस्तब्ध अंधाराची वाट पाहू लागतो. त्या अंधारात माझी कविता डोळे उघडील, या उत्साहाने दिवसाच्या दुसऱ्या टोकांपर्यंत पोचायचं साहस मी गोळा करू लागतो.

# तुम्ही याल ना ?

□ चंद्रकांत बक्षी

पावणे पाचच्या ट्रॅममध्ये तुम्हाला बरेच वेळा पाहिलं आहे. विशेषतः थंडीच्या दिवसात. थंडीत पहिली ट्रॅम बहुधा रिकामीच असते. तुम्ही 'मिशन रो' च्या पाशी चढता-कित्येकदा धावत पळत सुद्धा आणि एस्प्लेनेडवर उतरता. तुम्ही मला पाहिलं नसेल. किंवा पहिलं असलं तरी कदाचित ओळखलं नसेल. कारण सकाळी तुम्ही चष्मा लावत नाही आणि मी दुसऱ्या वर्गात असतो. तेवढेच माझे तीन नवे पैसे वाचतात. शिवाय खिडक्या बंद असलेला तो डबा दूधवाल्यांच्या जांभयांमुळे गरमही राहतो. तुम्हाला हसू येतंय ? पण माझ्याजवळ बसून कुणी जांभई घेऊ लागला तर मला कसं उबदार वाटतं. त्याचे कारण मला माहीत नाही.

तुम्ही मला पाहिलं नाही ? जाऊ दे. काही हरकत नाही - गेली दोन वर्षे दर हिवाळ्यात मी याच ट्रॅमने येतो. आणि धुक्यात धावतो. ढेरी कमी करण्यासाठी नाही बरं का ! मला ढेरीच नाही. जेव्हा भूक लागते तेव्हाच फक्त देवानं आपल्याला पोट दिलं असल्याचं मला कळतं. पण मला धावायची हौस आहे. वर्षानुवर्ष मी धावतोय. तुम्हाला मेमोरियल जवळच्या सरोवराकाठी बसायची आवड आहे ना तशीच मला ही हौस आहे. तुम्ही तिथे बसलेले असता, धुक्यात टॅक्सी गाड्या उभ्या असतात, वाऱ्यांमुळं शरीरावर रोमांच फुलत असतात आणि ज्या थोड्या बहुत सावल्या दिसत असतात त्यांचा रंगही एक सारखाच असतो. रंग पालटतात - ऊन आल्यावर गवत आणि पानं चकाकू लागतात. आणि थरथरणारी कुत्री पार्क केलेल्या गाड्यांच्या खालून बाहेर निघतात. आपल्या कानांवर आणि डोक्यावर गुंडाळलेला मफलर काढून लोक तो गळ्यात घालतात आणि माझ्या अशक्त डोळ्यातून झिरपणारं पाणी सुकू लागतं. तुम्हांला तर सर्व माहितच आहे.

चला, उठू या का ? रेड रोडने जाऊ या. डलहौसी स्क्वेअरची कार्यालयीन दुनिया जशी दुपारी गरम असते तशीच रेड रोडची दुनिया सकाळी गरम असते. गाडी चालवणं शिकायला मडमा इथं येतात. योगसाधना करणारे लोक गनमेटलच्या घोड्यावर स्वार किचनेर, ऑउट्रम यांच्या पुतळ्याखालच्या पायऱ्यांवर शीर्षासन

करीत असतात. शेठ लोक कापऱ्या हातांनी वर्तमानपत्र उघडून शेअर बाजाराचे भाव बघतात. भरलेला ट्रक थांबवून मैदानाच्या कठड्याकडे जाण्याचा आव आणत एखादा लठ्ठसा ट्रक ड्रायव्हर ट्रकच्या दुसऱ्या बाजूला जाऊन लघवी करायला बसतो.

या सर्व वैचित्र्यासाठी मी इथं येत नाही. पूर्वी आखूड पँट घालून हॉकी खेळायला येणारी एक ॲंग्लो इंडियन मुलगी मला रोज इथं भेटायची. पण आता मला तिचा चेहरा आठवत नाही. तुमचा चेहरा माझ्या लक्षात आहे. कारण तुमचा चेहरा या मुलीच्या चेहऱ्यापेक्षा जास्त मोहक आहे. माणसाच्याच चेहऱ्यात इतकी अधिक विविधता का असते ? सारे सिंह मला सारखेच वाटतात - चित्रातले, सर्कशीतले, प्राणि-संग्रहालयातले. संत्री पण सगळी सारखीच दिसतात. मुलांचे चेहरेदेखील एकाच छापाचे भासतात. मला वाटतं चेहऱ्यामधला फरक विचाराच्या फरकावर अवलंबून असावा. माणूस जसजसा मोठा होत जातो तसतसा त्याचा चेहरा बदलत जातो. खरंय ना ? सिंह, संत्र, गुलाबाची उमललेली फुलं - हे विचार करू शकत नाहीत म्हणून यांच्यात बदलही होत नाही. तुमचं काय मत आहे ?

छे, मी काही मानसशास्त्राचा प्राध्यापक नाही. कलाकारदेखील नाही. कलाकार कोण ? जो सौंदर्य पाहू शकतो तो ? हे पाहा, मला नेहमी सौंदर्यात क्रौर्यच दिसलं आहे. एखाद्या मुलीचं नाक जरा अपरं असलं तर ती नकटी, कुरूप समजली जाऊ लागते. तिच्याकडे बघून कुणाला स्फूर्ती मिळत नाही. हा सर्व क्रूरपणाच नाही का ? पण क्रौर्याविषयी माझी काही तक्रार नाही.

कितीतरी गोष्टींविषयी माझी तक्रार नाही. अरेच्या, तुम्ही कंटाळला तर नाही ना ? कंटाळा म्हणजे विनम्र विरोध. विनम्र की नपुंसक ? नपुंसक विरोध की सभ्य विरोध ? हे सर्व एक आहे आणि वेगवेगळे देखील आहे. आता दुसरी गोष्ट. कंटाळा निरोगीपणाचं लक्षण आहे की रोगटपणाचं ? या गोष्टीने तुमचा फायदा होतो की नुकसान ? हा कशासाठी असतो ? याची काय गरज ? आपल्या मज्जातंतूशी याचा काय संबंध आहे ? पाळीव प्राणी देखील कंटाळतात का ? आणि रानटी जनावरं ? मुलं ?

तुम्ही कंटाळला नाहीत, हे एकापरीनं बरंच आहे, मला स्वतःला अजून कंटाळा म्हणजे काय ते समजलेलं नाही आणि याचं शास्त्रीय विश्लेषण मिळालेलं नाही. बाकी गोष्ट आहे मोठी मजेदार - मनोरंजक, आकर्षक ! पण दुसऱ्यापाशी असेल तेव्हाच बरं का !

दोन दिवसांपासून पावसाळी वातावरण झालंय. मला वाटतं, नक्कीच कुठेतरी

पाऊस पडला असावा, नाहीतर आता पडणार असावा. तसं पाहिलं तर या मोसमात पाऊस पडत नसतो, पण अवेळी पावसाची मौजच काही और असते. इतरांना तो कंटाळवाणा होत असेल पण मला ...

पहा, माझा एक मित्र होता. वसतिगृहात आम्ही एकत्रच रहात होतो. रोज सकाळी उठल्यावर मी त्याला पडलेली स्वप्नं सांगायचो. मला रोज रात्री स्वप्नं पडतात चांगली असोत, वाईट असोत ! वाईट जास्त पडतात. तुम्हाला स्वप्नं पडत नाहीत ? खरंच मानसशास्त्रानुसार वेड्यांना झोपेत स्वप्नं पडत नसतात.

घाबरलात तुम्ही ? असो. पण हे मात्र नक्की की वेड्यांना स्वप्नं पडत नाहीत. ते लोक कदाचित जागेपणीच स्वप्नं पहात असावेत. हा... हा... हा....

मानसिक स्वास्थ्यासाठी वाईट स्वप्नं फार जरूरी आहेत. वाईट म्हणजे ज्याची तुम्हाला भीती वाटेल अशी. मरायची, बुडायची किंवा भाजायची भिती वाटते. कधी एखादा नातेवाईक तडफडताना दिसतो, कधी घाणीत अडकल्याचं दिसतं, किंवा जागेपणी लाज वाटावी अशी लैंगिक स्वप्नं दिसतात. लाजू नका. हा एक 'प्रोसेस' आहे. जवळजवळ प्रत्येकालाच अशी स्वप्न पडतात. रिफ्लेक्सेस, कॉंप्लेक्सेस. हे जग सारं असंच आहे.

हं. आम्ही काय बोलत होतो ? वाईट स्वप्नाविषयी ! हो, ठीक आहे. माझ्या मित्राला देखील स्वप्नं पडत नसायची आणि मी त्याची चेष्टा करायची की तू वेडा होशील आणि तुमचा विश्वास बसणार नाही. पण तो खरंच वेडा झाला.

नंतर एकदा मी त्याला भेटायला पागलखान्यावर गेलो होतो. तो मारपीट करीत नव्हता. मी खास सुट्टी घेऊन त्याला भेटायला गेलो होतो. पण त्याला बघून मला दुःखच झालं. बाहेर सुपरिटेंडेंटनी मला सांगितलं, की तुमचा दोस्त 'नॉर्मल' होतोय. पण अजून अधूनमधून त्याचा तोल जातो. मी विचारलं, " ते कसं काय ?" त्यांनी उत्तर दिलं, की एके दिवशी संध्याकाळी तो कपडे काढून नागवा होऊन खिडकी बाहेर बघत बसला होता. त्याला जेव्हा विचारलं की कपडे का काढलेस तर त्याने उत्तर दिलं की मी देवानं घडविलेलं जग बघतोय. पशू, पक्षी, झाडं, झुडपं, आकाश, खडक सर्व नग्न आहेत आणि मी कपडे घातले आहेत. मला त्या सर्वांसारखं 'नॉर्मल' व्हायचंय. सुपरिंटेंडेंटच्या बरोबर मलाही हसू आलं. जगात हसावंच लागतं. हसणं सहनही करावं लागतं. मग काय करायचं ?

तुम्ही दमलात वाटतं. चला तलावाकाठी जाऊन बसू या. ट्रॅमचा स्टॉप दूर आहे आणि काठावर गारवा असेल. पण ती लठ्ठ माणसं उठून गेलीत ना त्यांची जागा

अजून गरम असेल. बसा. तुम्हाला माझं बोलणं आवडू लागलं. हे आश्चर्यच आहे. धोकादायक आहे हं हे !

मी कुणाशीही अगदी सहजपणे बोलू शकत नाही. ऐकणारा थोडा वेळ ऐकून उठून जातो, त्याचा परिणाम असा झाला की मी स्पष्ट आणि सुसंगत बोलूच शकत नाही. बोलता येणं ही एक मोठी कला आहे. आणि बोललेलं ऐकता येणं हे तर मला दैवी देणगीसारखं वाटतं. आपण पुन्हा 'कंटाळा' या मुद्यावर येत आहोत असं मला वाटतं. हो ना ? असो. जाऊ दे.

मी थोडं फार शिकलो आहे. थोडं म्हणजे खूप जास्त. सारं सुरु करून सोडून दिलं. सात वर्षे अभ्यास केला; पण एकही पदवी पदरी पडली नाही. ज्ञान अपुरं असतं नाही ? आणि ज्ञानाचा उपयोग तरी काय ? माणसाचं अपूर्णत्व दाखविणं. मला माझं अपुरेपण जाणवलं म्हणून मी शिक्षण सोडून दिलं. पुन्हा भटकंती सुरु केली. ब्रह्मचर्याश्रम आणि गृहस्थाश्रम यांच्यामध्ये आणखी एका आश्रमाची गरज आहे असे मला नेहमी वाटतं. यात भ्रमंतीचा देखील समावेश आहे. आणि स्त्रियांविषयी वाटणाऱ्या आकर्षणाचा देखील ! असो. मी खूप भटकलो. खूप म्हणजे थोडा. तुम्ही असे काय माझ्याकडे बघताय ? माझ्यात तुम्हाला काही विक्षिप्तपणा दिसतोय का ? खूपचा अर्थ थोडा हाच असतो. या इतक्या मोठ्या जगात आणि आइन्स्टाइनचा सापेक्षतावादाचा सिद्धांत लक्षात घेता मी ज्याला 'खूप' म्हणतो तो किती 'थोडा' असतो ! प्रकाश वर्षाच्या तुलनेत माझ्या काही वर्षाची काय गणती ?

मी थोडा भटकलो आणि दमून गेलो. मी अक्कलहुशारीनं काम केलं.दमण्याचा आणि अकलेचा काय संबंध ? तोच जो पुष्पपात्रातील पाण्याचा आणि त्यात असलेल्या फुलांच्या सुवासाचा आहे. हा आपला माझा दृष्टिकोन आहे. जगात सारं व्यक्तिगत आहे. आणि सारं 'रिलेटिव्ह' (सापेक्ष) आहे. आईन्स्टाइनने मोठं मजेदार काम केलं. त्यानं 'रिलेटिव्ह' शब्द नीट समजावून दिला. पण शास्त्राच्या माध्यमाने मला 'रिलेटिव्ह' शब्द समजतो - मानसशास्त्राच्या माध्यमाने.

हे 'रिलेटिव्ह' तुमच्या लक्षात आलं ? कित्येकदा वाटतं की नाही आलं. तुम्ही एक दृष्टान्त घ्या. काळी मुलगी लिओनार्दो दि हिंब्सी किंवा बोटीचेलीपासून रिव्हेरा वा मीरोपर्यंत सर्व चित्रकारांमध्ये काळ्या मुली शोधून पहा. कुठे काळी असेल. कुठं निळी, कुठे लाल ... कुठे मुलगी असेल तर कुठे नसेल. कुठे फक्त रेखा, तुकडे, डाग, टिंबं .... रंगीत आणि रंगविहिन पण काळी मुलगी तुम्हाला शोधून कुठे सापडायची नाही. एखादी गोष्ट पाहिल्यावर कलाकाराच्या मनावर जो परिणाम होतो

तोच तुम्हाला पहावा लागतो. कलाकाराची दृष्टी कशी का असेना. त्याच्यावर परिणाम झाला, कमी झाला, वा अजिबात झालाच नाही - हे सर्व व्यक्तिगत आणि सापेक्ष आहे. दृष्टी सापेक्ष होतात कारण ध्येय एकच आहे.

मला सुसंगत बोलता येत नसल्याचं मी तुम्हाला म्हटलं होतं ना ? हे 'सर्व' 'काही' आणि 'थोडं' सारं सापेक्ष आहे. हृदय, पैसा, सौंदर्य सारं काही सापेक्ष आहे. माणसाला मूर्ख बनविण्यासाठी. रोजर बॅनिस्टरसाठी एक मैल चार मिनिटात आणि एखाद्या आजारी म्हाताऱ्याकरिता अर्ध्या तासात ! एक रुपाया केवढा असतो ? माझ्यासारख्या बेकारासाठी तो तीनशे नवे पैसे असतो आणि डॉज गाडी चालवणाऱ्यासाठी दहा पैसे असतो. तुम्हीच सांगा, ही शंभर नव्या पैशांची कल्पना बेवकूब बनण्यासाठीच केलेली आहे ना ? रिक्षावाल्यांकरिता तर हजार नव्या पैशांनीदेखील एक रूपाया होत नसतो. एक वर्षाचा अर्थ तीनशे पासष्ट दिवस नसतो. एक तासाचा अर्थ साठ मिनिटं असा होत नसतो. चंद्र, सुर्य, ग्रह आणि कोट्यावधी नक्षत्रांवर वर्ष आणि तासाची व्याख्या वेगवेगळी असते. अहो, सौंदर्यासारख्या साध्यासुध्या गोष्टीचंच तुम्ही घ्या ना ! युरोपात काळे केस आणि आपल्याकडे सोनेरी केस. अमेरिकेत लांब पाय, चीनमध्ये मांड्या, जपानमध्ये मान, लॅटिन अमेरिकेत वक्षःस्थळं आणि आपल्याकडे डोळे .... स्त्रीच्या सौंदर्याविषयी किती भिन्नभिन्न धारणा आहेत. सौंदर्य, मर्यादा, नैतिक मूल्ये - सारं काही सापेक्ष दृष्टीनं पाहणं शक्य आहे. फार काय माझं मत आहे, की माणूस शहाणा आहे की वेडा, हे देखील नेमकं सांगणं कठीण आहे. ते देखील सापेक्ष ....

तुम्ही हसू शकता. छान आहे हे. पण हास्यासारखा निर्मळ गोष्टीनंदेखील नुकसान होणं शक्य आहे. फॅशनच्या जगातील मंडळी म्हणतात की जास्त हसल्याने डोळ्यांच्या कोपऱ्यांशी व गालांवर सुरकुत्या पडतात. आणि त्याने चेहेऱ्याचा तजेला कमी होतो, चेहरा सुंदर राहात नाही, म्हातारपण येतं. तुम्हाला काय वाटतं ?

आता मी आपल्या मूळ पदावर येतो. मी सरळ चालत नाही, हो ना ? त्याचं एक कारण आहे. मी एकाच वेळी तीन-चार प्रकारच्या गोष्टींचा विचार करू शकतो. मी शतावधानी नाही. फार काय एका वेळी एक कामही करू शकत नाही. पण पाहा ना. स्वतःविषयी बोलणं देखील मला जमत नाही. तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टींचा एकाच वेळी विचार करताना मला मुळीच त्रास होत नाही. तुम्ही प्रयत्न करून पहा. दमून जाल. तुम्हाला वाटेल हे कसं शक्य आहे ? तर ऐका - त्यासाठी तुम्हाला एक रीत सांगतो. अगोदर तुम्ही सरळ बसा, चुपचाप आणि मग डोक्यातून सगळे विचार

काढून टाका. याला योग समजा, जैनमत समजा, बुद्धमत समजा, वाटेल ते समजा. मुख्य ध्येय हे आहे की ध्येय ठेवायचं नाही. कुठल्याही गोष्टीचा विचार करायचा नाही. किती मोठी गोष्ट आहे की ! विचारच करायचा नाही. हे तर शरीरातलं रक्ताभिसरण थांबवण्यासारखं अवघड काम आहे. पण आहे मात्र करून पाहण्याजोगं ! तुम्ही प्रयत्न करा.

हं तर, मी शिकलो, भटकलो आणि लग्न केलं नाही. लग्न केलं नाही याचा काय अर्थ ? सर्व लोकांनी मिळून एका गोऱ्यापान मुलीशी माझं लग्न ठरवलं होतं. मुलगी पसंत करताना रेसचा घोडा खरेदी करीत असल्यासारखी किंवा एखाद्या कंपनीला 'कॉर्नर' करू पहात असल्यासारखी विचारपूस, चौकशी तपासणी करू नये. कंपनीला आत्मा नसतो आणि घोड्याला अक्कल नसते. मुलीमध्ये आत्मा आणि अक्कल दोन्ही असतं. पण माझं ज्या मुलीशी लग्न ठरलं होतं तिच्यात आत्मा असला तरी अक्कल नव्हती.

तिच्यात पुसटशी अक्कल आल्यासारखं एकदाच मला वाटलं होतं. तीन वर्ष तो संबंध राहिला. मग त्या मुलीनं लग्नाला नकार दिला. त्यानंतर मग लग्न केलं नाही. आणि 'खाना, पीना, मजा करना' असा राहतोय.

तुम्ही सिगारेट ओढता ? मी ओढतो. तुमची हरकत नसेल तर सिगारेट शिलगावू ? तुमची काय हरकत असणार आहे म्हणा ! कोट्यवधी लोक सिगारेट ओढतात. आणखी एका माणसाने ओढली तर यात जगाचं वा तुमचं काय नुकसान होणार आहे ? हायड्रोजन बॉंबचा धूर सहन होतो. पण सिगारेटचा धूर मात्र अजून सहन होत नाही. हा - हा - हा - ...

आज पाऊस पडेलसं वाटतं. तुमचं म्हणणं आहे की नाही पडणार. मी म्हणतो पडेल. मैदानात खेळणारी ती मुलं दिसताहेत ना तुम्हाला ? ती सर्व खूप हसताहेत, खिदळताहेत. ती हसताहेत कारण पाऊस पडणार आहे. मुलांना पाऊस खूप आवडतो.

पावसातही तुम्ही फिरायला येता. मे महिन्यात देखील ? कमाल आहे तुमची. तुम्ही का येता फिरायला ? तब्येत सुधारण्यासाठी ? वाईट सवयींनी जशी तब्येत खराब होते तशीच चांगल्या सवयींनी तब्येत सुधारते. पण सवयी या एकूण शरीरासाठी वाईटच. फिरायला जाण्यासाठी सकाळी लवकर उठायची सवय करावी लागते. कुठल्याही सवयींवर माझा विश्वास नाही.

पण गेली दोन वर्षे मी रोज फिरायला येतोय आणि कुणाशी बोलत नाही. फिरून

निघून जातो. आता मला सुखदुःख काही वाटत नाही. आता सुख आणि दुःखाच्या मधली स्थिती आहे - बुद्धीचं 'नॉर्मल टेम्परेचर !'

आज खूप उशीर झाला तुम्हाला. चहा घ्यायचा असेल - घरीच जाणार ना ? वर्तमानपत्र वाचलं ? मला तर काल संध्याकाळच्या आणि आज सकाळच्या वर्तमानपत्रात फारसा फरकच वाटत नाही. जाऊ दे. आता आपण बोलणं थांबवू या. तुमचे आणि माझे परतायचे रस्ते वेगवेगळे आहेत. मी रोजच येतो. आज आपल्या मनपसंत माणसाला भेटून खरंच खूप आनंद झाला. पण आता जाता जाता एक गोष्ट सांगू का ? मी एक चुकीची गोष्ट तुम्हाला सांगितली आहे. खोटं बोललो आहे. माझ्या मित्राच्या वेडेपणाविषयी मी तुम्हाला सांगितलं होतं ना, ते सारं खोटं होतं, ती माझीच गोष्ट होती आणि म्हणूनच माझ्याशी लग्न ठरलं होतं ना, त्या मुलीनं लग्नाला नकार दिला होता. हा ..... हा ...... हा ......

हे काय, लगेच उठलात ? पण ऐका तर, उद्या मी इथंच तुमची वाट पाहीन .....

तुम्ही याल ना ?

# कंसाच्या आत नाही की बाहेर नाही

□ सरोज पाठक

" . . . येणार आहे !"

सर्वजण खिदळत होते. हसता हसता बऱ्याच गप्पागोष्टी चालल्या होत्या. असं हसता-हसताच घरात गीती आली. सुगीती आली, नीती आली आणि अखेरीस सुनीती देखील आली. वातावरणात, नात्यागोत्यात, मित्रांत आणि दिव्य तथा शुचीच्या मुखावर - मनावर हे मनमोकळं हास्य, सौम्य हास्य व मूक हास्य विलसत होतं.

दिव्य बहुधा अशाच प्रकारे येऊन सांगायचा. " आफ्रिकेहून नगीनचंद येणार आहे. तू ओळखायची नाहीस. पण . . ." किंवा "पारुल येणार आहे, माझ्या मित्राची प्रेयसी." किंवा "सुंदर येणार आहे," वा "जीतू येणार आहे" किंवा संतोकताई येणार आहे." नाहीतर "वसुमती अक्का येणार आहे . . .

एखादा मित्र, एखादा शेजारी, एखादा बालमित्र, एखादा गावचा, एखादा ओळखीचा, एखादा ओळखीच्यांच्या ओळखीचा, कुणी ना कुणी येणार आहे.

"कुणी येणार आहे" ची घोषणा घरात कित्येकदा निनादली आहे आणि शुचीने या घोषणेचं सहर्ष स्वागत केले आहे. फक्त जेवायसाठी ? राहायसाठी ? किती दिवस ? किती तास ? केव्हा ? का ? हे सारे प्रश्न कुठलीही काळजी व्यक्त करीत नसत. उलट या आनंदी सुखी कुटुंबाच्या अन्य दिवसांच्या मैफिलीसारखेच कार्यक्रम बनून जात. शुचीचं हास्य कधी मावळत नाही, तिचा हसरा चेहरा कधी कोमेजत नाही. तिच्या अंगचा उत्साह कधी कमी होत नाही. तिचा प्रेमळपणा, तिची प्रसन्नता, स्वागत करायची पद्धत, यात कधीही नापसंती वा अनोळखीपणा नसतो. असंच काहीसं वाटायचं. बातम्या तर कानांवर यायच्याच ...

" . . . येणार आहे.

"कोण ? "

. . . आणि नाव, व्यक्ती, परिचय .... , परिचय आणखी स्पष्ट व्हायचा आणि शुची अच्छा' म्हणून कामाला लागायची - "बस, एवढीशी गोष्ट आहे ? मला तर

'वाटलं होतं की . . . छे, छे, काही नाही, काही नाही. हे लोक येणार आहेत, इतकंच ना ? तर काय झालं ! काही का असेना. आपल्या घराला, घराण्याला आणि संस्कारांना शोभून दिसेल असं स्वागत मनापासून करायला हवंच.''

प्रत्येक पाहुण्याला, आगंतुकाला शुची अगत्यपूर्वक बोलवायची, बसवायची, जेवू घालायची आणि नित्य नव्या प्रकारांनी त्यांना खूष करता करता दमून जायची. मग 'अरे देवा'. म्हणून आपला थकवा व्यक्त करायची. ''मी तरी काय करू ? सवयच अशी होऊन गेली आहे. आमच्याकडे असलं काही नाही . . . घर खुलं आहे, कुणीही यावं ...''

''गीती बेटा, आज बॅडमिंटन खेळण्यात जास्त उशीर करू नकोस हं ! आणि सुगीती, तुला थोडं बाजारात जावं लागेल. आणि ऐकलंत का ? तुम्ही तेवढा टेलिफोन करून टाका. कळलं ? फारच बाई विसरभोळे आहात तुम्ही ! गजरा, अग ए गजरा ... कुठे गेली ही ? बघ आज संध्याकाळी तुला घरी जायला उशीर होईल. इथंच जेव. त्यात काय झालं ? पाहुणे हे यायचेच ... या इथं तेच तर एक सुख आहे. निश्चिंतपणे घरबसल्या होणारं मनोरंजन आहे ते ! काय आहे नीती ? का उगाच ओरडतेस ? दोन वेण्या घाल. आणि हो, कपडेदेखील नवे घाल. मळके होऊ देऊ नकोस, बरं का. माझी सोनुली, माझी बाहुली . . . अग अजयकाकांनी पाहिलं तर काय म्हणतील ? कॅडबरी हवं ना ? सुनीती, केसांना अजिबात तेल न लावायची तुझी ही फॅशन मला मुळीच पसंत नाही. पारुलताई काय म्हणत होती ? आठवतं ? डोळे बिघडतात काय ? आज तेल लाव. बाहेरच्यांच्या समोर अशी केसांच्या जटा करून फिरू नकोस. ऐकलंस का ? सिगारेटचं पाकीट अगोदरच आणून ठेवा म्हटलं. मला हे मुळीच आवडत नाही. पाहुणे असोत नाही तर आणखी कुणी असो. मुलींनी असली कामं करणं शोभत नाही. एकदा सांगून टाकलं. हे नेहमी लक्षात ठेवा म्हणजे झालं ... त्यात हसण्यासारखं काय आहे ? विसरलात तर . . . मी खिसे चाचपून पाहीन. गीती आठवण कर . . . हो बाळ, तूच माझी खरी शहाणी मुलगी आहेस. आठवण कर, आपण पप्पांना छान वठणीवर आणू. खरं ना ?''

अशा प्रकारे हास्याला, आनंदाला उधाण यायचं. ते कधी वाढायचं तर कधी समतोल रहायचं. घरात गोंगाट तर व्हायचाच. इतकं मोठं कुटुंब ... स्वैपाकघरात नेहमीच गडबड असायची. पाहुणे येणार नसले तरी बैठकीत सोंगट्या, पत्ते, कॅरम, गप्पा-गोष्टी, संगीत काही ना काही चालूच असायचं आणि घरच्या, बाहेरच्या लोकांच्या हास्याच्या फवाऱ्यानं सारं वातावरण चिंब होऊन जायचं. त्या विशाल

प्रवाहात अनेक विषय सामावलेले असायचे, ते आनंदाने ऐकले जायचे आणि इतके सहज करून टाकले जायचे जणू विशेष काही घडलंच नसावं -

"काय म्हटलं ? लग्न केलं ? चला, बरं झालं. बिचारा जिकिरीस आला होता."

" दिल्लीला बदली झाली ? इथलं घर विकून टाकलं ? बढती मिळाली ? खरं ?"

"चंदू इंजिनिअरिंगला तिसऱ्यांदा नापास झाला ? त्याचे वडील ऐकतच नाहीत तर कोण काय करणार ? ही लाइन त्याला योग्य नाही. हो. सध्या बडोद्याला आहे."

"लव्ह मॅरेज आहे, लव्ह मॅरेज ! बायको देखणी आहे हा एक योगायोगच म्हणायचा ? नाहीतरी राजाला पसंत पडेल तीच खरी राणी !"

"काय ! पेइंग गेस्ट म्हणून राहू लागलाय ? त्याची बायको खूप आजारी असते. छे, छे. तो ठीक आहे. संसार म्हटला की पैशाची गरज आलीच."

" मॅच बघायला गेलाय ? बापापाशी भरपूर डबोलं आहे ना ? खूप इंटरेस्टिंग आहे हे खरं, पण खिशात ..."

"मला मनुमामांनी सांगितलं होतं. ते मोठे पडतात. म्हणून मी जास्त काही विचारलं नाही. आपल्याला काय करायचंय ? "अरे व्वा ! हाऊ लव्हली ! ग्रेगरी पेकचं कोणतंही पिक्चर मी सोडत नाही. डिटेक्टिव्ह पिक्चर ? ओ, आय एम क्रेझी !" 'आमच्या बाईचं लग्न आहे. सर्वांनी दोन-दोन रुपये वर्गणी देऊन त्यांना प्रेझेंट द्यायचं वर्गात ठरलंय."

"यावर्षी काश्मीरला नक्की जायचं पप्पा. मी पण येणार आहे हं ! आता मी मोठी झालेय. आता माझे केसदेखील मीच विंचरते. वाटल्यास बॉबकट् करून टाका. पण काश्मीरला न्यावंच लागलं. सांगून ठेवते."

"मम्मी, फेमिनामध्ये आलेलं पुलओव्हरचं नवं डिझाइन बघितलंस का ? वाचून माझ्यातरी काहीच लक्षात आलं नाही."

" .... येणार आहे. ऐकायला येतंय का कुणाला ?"

असाच गोंगाट चालू असता एके दिवशी दिव्यने येऊन म्हटले. शुची त्यावेळी, त्या डिझाइनमध्ये कोणकोणते रंग घालते आणि तो स्वेटर कसा और तऱ्हेचाच तयार झाला ते हसत हसत सांगत होती. और तऱ्हेचाच तयार झाला हे सांगताना ती अशी काही हसत होती जणू फार मोठं हसण्यासारखं काही घडलं होतं. बैठकीत त्या वेळी हसण्याला असा काही ऊत आलेला होता, जणू कुणाला मोठं घबाडच दिलं असावं आणि त्याला श्रीमंत करून सर्वांना खूप आनंद झाला असावा. त्या कल्लोळात दिव्यचं बोलणं" . . . येणार आहे.' कुणालाच ऐकू गेलं नाही.

" ए वेडे, ऐकून तर घे. नाही तर मग म्हणशील अगोदर का नाही सांगितलं म्हणून !"

हसता हसता शुचीच्या डोळ्याला पाणी आलं. ते पुसत ती म्हणाली, "होय महाराज, ऐकलं बरं का ! तुमचं एखादं भूत येणार आहे हेच ना ?"

शुची थट्टेनं पाहुण्याला 'भूत' म्हणायची आणि त्याला जेवू घालण्यासाठी करण्यात येणाऱ्या थाटामाटाला 'भूतभोजन' म्हणायची. म्हणून अशा पाहुण्यासाठी केलेला स्वैंपाकाला ती विशिष्ट मानायची. गप्पांच्या ओघात पुन्हा स्वतःला झोकून द्यायला तयार होणाऱ्या शुचीचा हात धरीत तिला आपल्याकडे ओढल्यासारखे करी दिव्य सांगू लागला, "पण तो 'भूत - भोजन' करणार नाही समजलं ? फक्त इथल्या स्टेशनवरून गाडीतून जाणार आहे. म्हणून मी आपल्याला स्टेशन वर घेऊन जाऊ इच्छितो. समजलं बाईसाहेब ? आणि हे बघ, त्यांच्याशी तुझी ओळख आहे. माझं तर म्हणणं आहे, की आपण त्याला आग्रह करून उतरायला लावू या आणि घरी घेऊन येऊ या. तो आहे मोठा माणूस. त्याला तर क्षणाची उसंत नसते. पण तू सांगितलं तर तो ऐकणार नाही असं कुठं शक्य आहे ?"

मोकळेपणाने हसत असता अचानक पाठीत कुणीतरी गुद्दा मारल्यासारखं शुचीला वाटलं. रोजच्यासारखीच चेष्टा समजून ती हसू लागली. पण दुसऱ्याच क्षणी ज्या जागी गुद्दा बसला होता तिथल्या त्वचेची आग होऊन वेदना होऊ लागली. मुका मार बसल्यास माराची जाणीव होत रहाते, पण शोधून पाहिल्यास माराची नेमकी जागा गवसत नाही. शुचीच्या बाबतीत असंच घडलं होतं. शुची दिव्यकडे वळली. नीट लक्ष देऊन ऐकायला हवं होतं. कान टवकारले गेले होते. जणू "हूं, आता बोला. काय म्हटलं ?" असंच सांगत् होते. शुचीची विचारशक्तीदेखील ताळ्यावर आली होती.

" .... येणार आहे ... आगगाडीतून इथून जाणार आहे... तू सांगितलं तर .... क्षणाची उसंत नसते."

"कोण ?"

"कोण ?"

"कोण ?"

" ... येणार आहे ?"

हास्य आणि आनंदाच्या भिंतींना तडा गेला. सुंदर सजवलेल्या दिवाणखान्यात विटा, चुना आणि धुळीचा ढीग कोसळू लागला.

शुचीचं मन फुसकारलं.

'हूँ ! अमूक येणार आहे. म्हणून सांगून टाकलं आणि जणू किस्सा संपला. कितीदा सांगितलं की ... मला हे सर्व पसंत नाही. या भुतांना खायला घालता घालता निम्मं आयुष्य गेलं. आता मी थकले आहे. (येऊ तर दे त्याला एकदा ! त्याला वाटत असेल . . .) स्वागतासाठी जणू शुची तयार होऊ लागली. (इकडे ये तर खरं ! बघ, बघ, बघ हरामखोरा ! मी किती गरीब आहे, किती वाळले आहे. बघ. एकदा नाही शंभरदा बघ. चार-चार पोरं होऊन सुद्धा माझा देह दगडासारखा टणक आहे. आणि तुझ्या पथरासारख्या हृदयाला विदीर्ण करायची ताकत त्याच्यात आहे. हो, हो. माझ्या दिव्यवर माझं प्रेम आहे. त्याचं घर, त्याचे नातेवाईक, त्याची मुलं सारं मला हवंसं वाटतं. या साऱ्या मुलांना बघ. मूर्खा, कान उघडून सर्वांची नावं ऐक. तुला कदाचित वाटत असेल की तुझ्या नावावर कुणाचं नाव ... चल हट ! ही तर चारच मुलं आहेत. लागोपाठ बारा जरी झाली असती तरी तुझ्या नावाचं अक्षर सोडाच मात्रा देखील त्यात देऊ दिली नसती. समजलं ?) आणि दिव्य तुम्ही असे कातावता का ? इकडे माझ्यापाशी बसा. जरा शांतपणे ऐका.' शुचीने मोठ्या प्रेमाने दिव्यकडे पाहिलं. तिला प्रेमाचा उमाळा आला होता. (उद्या सकाळीच येणार आहे ना तो !)

त्या रात्री दिव्यपाशी खास जाऊन त्यांच्या छातीवर हलकेच थोपटून तिनं म्हटलं, "तुम्ही उगाच अस्वस्थ होता. स्वतःच्या तब्येतीकडे सुद्धा लक्ष देत नाही. पहा ना हल्ली... ते काही नाही. आता यापुढे मी तुमचं काही एक ऐकणार नाही. दुसऱ्यांसाठी हे असं . . . ! किती धावपळ करावी लागते ! आता मी सांगेन तसं करायचं. आपण काही अजून म्हातारे झालो नाही. खरंच नाही. चार मुलं झाली म्हणून काय झालं ? .... काय झालं ? काय झालं ?"

काही सुद्धा झालं नाही. त्या रात्री दिव्यला उमजलं की काही सुद्धा झालं नाही. अत्यधिक सुख लाभून सकाळी दिव्यने म्हटलं, " शुची कमाल आहे तुझी ! खरंच कमाल आहे ! कमाल आहे ! शुची, काहीच झालं नाही, शुची !"

कंबर कसून लढायला तयार होत असल्यासारखा शुचीने "ये तर खरं, बघून घेईन तुला, " अशा आविर्भावात सारी रात्र घालविली होती ( क्षणाची उसंत नाही काय ? नालायका, तुला वाटत असेल की मी तुझ्या वाटेवर पापण्यांच्या पायघड्या घालून बसले आहे !) "गीती, सुगीती, हे काय ? हा थाट कशासाठी ? निळा फ्रॉक कशाला घातलास ? काढ बघू. मी म्हणते ना काढ तो फ्रॉक. काही जरुर नाही नवे कपडे घालायची ( तो येतोय म्हणून माझ्या घरात काही बदल व्हायला नको, काही वेगळं

दिसायला नको.) गजरे, ए गजरे, माझा हात चाकूनं कापला. तुलाच लिंबू पिळावं लागेल. बटाटेवडे ? हो तेच कर.'' कच्च्या कैरीची कढी-बनवलीय. वाटेल तितकं तोंड वेडवाकडं करू देत. त्याला वाटलं असेल की त्याच्या आवडीचा स्वैंपाक करून, हातात पंखा घेऊन मी त्याची वाट पाहीन. इथून जाणार आहे ! मोठा माणूस आहे ! काय बिशाद आहे माझ्या गावाहून तो असाच निघून जाईल ? कान धरून घरी आणीन आणि दाखवीन ....)

त्याच्या आगमनाच्या विचाराने शुची घरची सारी व्यवस्था बदलून टाकीत होती. उसासे टाकीत होती आणि दात ओठ खाऊन म्हणत होती, '' फ्लॉवर पॉटमध्ये फुलं लावायची काय जरुर आहे ? मोगऱ्याची फुलं तर मुळीच लावायला नकोत. नीतीला केसात माळू देत ती ... नाही, काही गरज नाही.'' खुर्ची सरकवून त्यावर बसणाऱ्या माणसाला सुनावण्यासाठी ती वाक्य जुळवू लागली. (कोण ? या. हे माझे पतिदेव. माझे, या घराचे, या मुलांचे, वातावरणाचे, सर्वस्वाचे अधिष्ठान. समजलं हलकटा ? आणि तू ? तू कुणीही नाहीस, कुणीही नाही. मूर्खा, या घराच्या उंबरठयाच्या दृष्टीने तू एक बाहेरचा परका माणूस आहेस. फक्त भूत. अनेक भूतांपैकी एक भूत ! होय. मुलं एक दोन नव्हे चार आहेत. मी वांझोटी थोडीच आहे ? पण तू कोण विचारणारा ? आणखी चार होतील. आता बोल. मी काही म्हातारी झालं नाहीय. फॅशनवर माझा विश्वास नाही. कुटुंबनियोजनावर सुद्धा नाही. हो. सर्वजण फिरायला गेलेत. परतायची वेळ होईल तेव्हा येतील परत. तुझ्यासमोर ओळीने उभं करून तुला सलामी थोडीच द्यायची आहे ?)

''नीती, सुनीती अग हे काय ? गीती, तुम्ही सर्वजणी अशा गप्पा का बसला आहात ? आजच मुकाट्यानं फिल्मफेअर वाचायचं तुला सुचलं का ? आणि काय ग ? तुला देखील आजच अभ्यास करावासा वाटला ना ? रेडिओ ऐकायचा नाही ? आवाज मोठा कर. मला स्वैंपाकघरात ऐकू येईल इतका मोठा. काही हॉटेल, रेस्टॉरंटसारखं वाटणार नाही. मजा करा. हसा-खेळा. असे गंभीर चेहरे करून नका फिरू. हो मी स्वैंपाकघरात आहे (आता त्याला वठणीवर आणते. अशी भाजी करीन, जणू मिरच्यांचा ठेचाच ! डोळ्याला चटकन पाणी आलं पाहिजे. गोवारीच्या शेंगा तर जनावरांना खायला घालतात. तू देखील जनावरच आहेस. आज तुझा हिशोब चुकता करीन !) ''कुठं निघालात तुम्ही ? तो - ते सिगारेट ओढत नाहीत.'' ''कदाचित ओढत असतील.''

''महागडी आणायची जरुर नाही.'' (असेना का मोठा माणूस ? आम्हाला काय

त्याचं ?) पनामा घेऊन या. काय म्हटलंत ? आणि हे पहा, मी स्टेशनवर येणार नाही. (जणू मीठं-मोहऱ्याच ओवाळायच्या आहेत त्याच्यावरून) बस. माझा निरोप सांगा म्हणजे झालं. (मी वाट पहातेय म्हणून नका सांगू. माझा हुकूम आहे म्हणावं) माझ्यातर्फे आग्रह करा. आल्यावाचून राहणार नाही.

(येऊ तर दे जरा ! डोसकंच फोडीन . . . काय ? थांबणार आहे ? इतके तास हो - होहो - हो ! जणू काही तास दान करायलाच निघालाय. मोठा माणूस असल्याची घमेंड आहे ? पण मूर्खा, ऐक ! मी ... मी .... मला तुझे दान नकोय. मुळीच नको. आज जाणार असलास तर आताच निघून जा. आता, या क्षणी, लगेच ! छे, छे.पाणी देखील देणार नाही. तू काही गर्भारशी बाई नव्हेस. चल ऊठ ... ऊठ ... ऊठ ! चालता हो इथून. कोण तुला बोलवायला गेलं होतं. म्हणून तू इथं आला आहेस ? तू तमाशा पहायला आला आहेस ना ? मला कसं बेवकूब बनवलं हेच तुझ्या मनात आहे ना ? त्यावेळी इतक्या तासांचे दान देता आलं नाही ? लबाड ! खोटारडा !)

(गाडी स्टेशनवर आली असेल.) "नीती बाळ इकडे ये बघू, ये जरा माझ्या जवळ बैस, तुझी कविता ऐकव मला. जरा मोठ्यानं बरं का !" (कुली मिळाला. नसेल. अगदीच मूर्ख आहे. यांना ओळखील की नाही ? मोठा माणूस झालाय ना तो !) "अरे वा, रमेशभाई, जरा हे दुध्या भोपळ्याचं रायतं तर चाखून पहा. दुध्या किसून, वाफून मग ... आणि यात माझ्या नावच्या मोहऱ्या .... तुम्हीदेखील ? माझ डोकं ...." (टॅक्सी करायला कितीसा वेळ लागणार आहे ? त्या पढतमूर्खाला तंडत बसायची देखील खूप सवय आहे. आलिया भोगासी सादर होईल तर ना ? .. हो - नाही करण्यातच वेळ घालवतो ...) "गजरा, ए गजरा, जरा पंखा लाव बघू काय गरम होतंय. आणि बघ, इराण्याच्या हॉटेलातून चार आण्यांचा बर्फ घेऊन ये नीती, गीती, सुनीती .... कुठं गेल्या सगळ्याजणी ? इकडे या. सर्वजणी इथे स्वैंपाकघरात बसा आणि मला काम करू लागा. मी सांगते तसंच करा. इथंच थांबा, इथं .... इथं...माझ्याजवळ, माझ्या आजूबाजूला ... 'तुमचे पप्पा ....."

दिव्य आला.

कित्येकदा दिव्य असाच येऊन हाका मारायचा. स्टेशनवरून येऊन त्याने हाक मारली. शुचीला तो अशीच हाक मारायचा. हाक द्यायचे आणि हाक ऐकायचे क्षण आपसात गुंतून गेले. स्वैंपाकघराशी पोचायच्या आतच दिव्यने गीतीला धमकावलं, 'ए पडशील की ! काय चालवलंय ?"

" घड्याळाला किल्ली देतेय. पहा ना सारखं सारखं ... नुकतं कालच तर ...." गीतीनं उत्तर दिलं.

दिव्य शुचीला सांगू लागला - "त्याचा कार्यक्रमच रद्द झाला. त्याच्या माणसाने चिठ्ठी दिलीय. बिचाऱ्याने खास माणूस पाठवून चिठ्ठी धाडली आहे आणि स्वतः येऊ शकत नाही. म्हणून खेद व्यक्त केला आहे. नीती माझं हे घड्याळ जरा टेबलावर ठेव बघू."

"किती वाजले ? वेळ नीट लावून देऊ ?"

"अग, अगोदर पुरती किल्ली तर दे."

दिव्य सांगत राहिला, "किती मोठा माणूस आहे ! पण जरा देखील गर्व नाही. नाहीतर माफी मागायची त्याला काय गरज होती ? तरी बिचाऱ्याने मागितली. तुझीही आठवण केलीय !"

काय ?

काय ?

काय ?

नाही आला ? नाही आला ? नाही आला ? मला पुन्हा मूर्ख बनवून गेला !

शुचीचं हृदय पिळवटणं. पूर्ण चावी दिल्याने घड्याळाची स्प्रिंग सर्रर्र-छन्नच्या आवाजासरशी तुटली आणि काटे फिरत राहिले, फिरतच राहिले.

"पप्पा, बघा तर हे ... "

"गीती मोतीकाकांना घड्याळ घेऊन जायला सांग. इतक्या जुन्या घड्याळाची स्प्रिंग तुटणारच. विकून टाकलं तरी काही हरकत नाही ..."

तिवईवर तिवई ठेवून गीती त्यावर चढली होती. ती खाली उतरू लागली तशी त्रिकोणी चावी तिच्या हातून निसटली, तिवईवर आदळली आणि वर उसळून शुचीच्या डोक्यावर पडली.

"अग आई ग.... " म्हणत शुची डोकं धरून खाली बसली.

"खूप जोरात लागली रे .... " तिच्या दाटून आलेला, रडका स्वर हळूहळू मोठा होत गेला. दिव्य बघतच राहिला. एवढीशी किल्ली लागल्याने ही इतकी ओक्साबोक्शी का रडत आहे ? कितीही झालं तरी चार मुलांची आई आहे ! त्याला आदली रात्र आठवली आणि त्याच्या चेहेऱ्यावर स्मित झळकलं "शुची खरंच कमाल आहे तुझी !" तो सद्‌गदित झाला. गीती विचार करीत होती - "आईला खूपच लागलं का ? रक्त

तर काही आलं नाही .... मग ?''

शुची डोकं धरून उठून उभी राहिली आणि विचार करू लागली.

तो आहेच मुळी हरामखोर ! पण ...बरं झालं ..... नाही तर पुन्हा 'भूतभोजन घालायचा आणि ''येणार आहे'' च्या बातम्या कान लावून ऐकायचा.... एक महत्वपूर्ण कार्यक्रम आयुष्यातून कदाचित कायमचा नाहीसा झाला असता. जीवनाचा - हृदयाचा किती मोठा भाग रिता झाला असता.

# चिंता

□ रघुवीर चौधरी

आगीवर राख साचली आहे. राखेचा वरचा थरही थंड होऊन जावा अशाच कडाक्याच्या थंडीत मध्यरात्र कुडकुडत आहे. जीवन गुडघ्यात मान घालून बसला आहे. घुबडाच्या घूत्काराचा आवाज इथून येत होता. तो शेताचा पश्चिमेकडचा कोपरा जीवनाच्या पापण्या चाचपडू लागला. थिजत चाललेल्या डोळ्यांनी त्याने पश्चिमेकडे पाहिलं आणि थंड होत चाललेल्या आगीला अखेरपर्यंत फुलवून ठेवायचा तो विचार करू लागला. त्याने जोरात एक फुंकर मारली. राख उडाली. पुन्हा फुंकर घातली. आग दिसू लागली. पुन्हा फुंकर मारली तशी ठिणग्या उडू लागल्या. ठिणग्या उडू लागल्या तसा जीवन विचारात पडला.

आज एक तरुण स्त्री मरण पावली होती. स्मशान अजून पेटलेलं होतं. अर्ध्या तासापूर्वी जीवन पुन्हा बघून आला होता. साऱ्या लाकडांनी पेट घेतला होता. काहीसुद्धा ठिकठाक करायची जरूर उरली नव्हती. मोठमोठ्या ओंडक्यांमधून निखारे निखळून पडत होते. निखाऱ्यांच्या मधली रिकामी जागा धगधगत होती. स्मशान गरम झालं होतं. पण हळूहळू आता राख गोळा होत जाईल आणि सकाळपर्यंत तर खालची जमीनच काय ती तेवढी गरम राहील. काही मजबूत निखारे कदाचित कोळसा होऊन शिल्लक उरतील त्यांच्यामध्ये अस्थींचे काही अवशेष असतील काही झाकलेले, काही बाहेर दिसणारे. दोन-तीन दिवस जीवनची दृष्टी त्या राखेच्या ढिगाच्या आसपास नकळत घुटमळत राहील. तो ढीगही मग विखरून जाईल आणि मग त्या मरणाऱ्याला त्याच्या पूर्वीच्या अन्य लोकांपासून वेगळं ओळखता येण्यासारखी कोणतीही खूण उरणार नाही. अनेकांच्या अविभक्त अवशेषांमध्ये हे अवशेषदेखील मिसळून जातील. जीवन हे सर्व पहात राहील आणि विचार करीत राहील.

जीवनचं शेत खूप मोठं आहे. स्मशानापेक्षा कितीतरी मोठं. स्मशान फार तर वीस बिघ्यांचं असेल. त्यातही उत्तरेला बाभळीची झाडी आहे, पूर्वेला तलाव आहे आणि दक्षिणेला आहे जीवनचं शेत. स्मशानाचं हे दक्षिण टोक जीवनच्या शेतात आतवर

शिरलेलं आहे. – जणू एखाद्या लांब-रुंद चौकोनाला एक त्रिकोण छेदत असावा. इथूनच शेतात जाण्या-येण्याची वाट आहे. दोन गावांना जोडणारा हमरस्ता स्मशानाच्या मधूनच जातो. म्हणूनच शेतावर येताना निम्मं स्मशान ओलांडून जीवनला यावं लागतं. कधीकधी कुंपणामधल्या वाटेवर पाय ठेवता ठेवता तो थबकतो. पाठ वळवल्याशिवाय मागे बघतो. त्याची नजर स्मशानाचा वेध घेऊन दुसऱ्या टोकापर्यंत पोचू बघते. एके रात्री त्याला स्वप्नात दिसलं होतं की त्या टोकाला पिंपळाच्या व जांभळाच्या झाडांनी गुंफलेली एक जाळी आहे. झाडं अजिबात हलत नाहीत. वारा जुन्या खोडाजवळून वाहात जातो आणि मधल्या खोल तळ्यात गोल गोल पिंगा घालत राहातो. त्या तळ्याच्या पश्चिम काठावर उभ्या असलेल्या पिंपळाला मधून कापून टाकलेलं आहे आणि कापलेल्या बुंध्याचे ढलपे तळ्यात विखुरलेले आहेत. त्याच्यावर एक झोपडी आहे. तिला छप्परच नाही. त्या झोपडीत जीवनला एक मुलगा दिसला. त्याच्या आसपास कुणी नव्हतं. सोनेरी केसांनी त्याचे डोळे झाकलेले होते आणि गालावर ओघळलेल्या अश्रुधारा सुकून गेल्या होत्या. उजव्या हाताची करंगळी धरून ते मूल बसले होते. ते वर पहातच नव्हते. आता काय करावं ? त्याला हाका माराव्याश्या जीवनला वाटलं. पण तेवढं धाडस झालं नाही .... ते स्वप्न होतं. पण जीवनची नजर स्वप्नात पाहिलेली ती जागा अजून हुडकीत असते. अखेर तो मनाला समजावतो आणि शेतात निघून जातो.

हो, त्याचं शेत स्मशानाहून खूप मोठं आहे. शेताचं उत्पन्नदेखील भरघोस आहे. पण त्याचे कपडेलत्ते आणि भटक्यासारखी राहणी पाहून तसं वाटत नाही. कितीतरी जमीन नुसती ओस पडून आहे. आणि तो तिकडे ढुंकूनही बघत नाही. तरीदेखील वस्तुस्थिती ही आहे की त्याचं उत्पन्न चांगलं आहे.

जीवनच्या मुलीचं नाव आहे - रई. पाच वर्षांची आहे. खूप देखणी आहे. इतकी देखणी की हेतीची आठवण व्हावी. लग्न होऊन सात वर्ष झाली. पाच वर्षांपासून जीवन स्वतःच भाकऱ्या बडवतोय. रई केव्हा मोठी होईल आणि केव्हा हे ओझं आपल्या खांद्यावर घेईल ? आणि मोठी झाली तरी बापाच्या घरी रई कुठवर राहणार ? जीवन या सर्वांचा विचार करीत नाही असं लोकांचं म्हणणं आहे.

जीवनचं डोकं फिरलंय असं गावकरी म्हणतात. कारण तो अतिशय विस्कळितपणे जगतोय. जगतोय म्हणजे काय आपलं असंच राहतोय. वरून जे काही दिसतंय ते पाहून एका पाठोपाठ एक अनेक जण असंच समजू लागले आहेत. कुठं हल्लीचा हा दीनवाणा जीवन आणि कुठं तो चार पाच वर्षांपूर्वीचा पितळेच्या

चकाकणाऱ्या मूर्तीसारखा जीवन ! या मागचं रहस्य काहींना उलगडलं आहे आणि जीवनचं डोकं फिरल्याचं जे समजतात त्यांचा ते विरोधही करीत नाहीत. स्वतः जीवनदेखील हे नाकबूल करीत नाही. कारण आपल्याला काय झालंय ते त्याला ठाऊक आहे. त्याला ठाऊक आहे.

बऱ्याच दिवसानंतर गेल्या गेल्या उन्हाळ्यात जीवनचा चढा, दमदार आणि कर्कश आवाज लोकांना ऐकू आला होता. अर्थात तो आवाज मधूनमधून कमजोरही झालेला होता. त्यात ओळख होती, कठोरपणा नव्हता. म्हणून त्या आवाजाला चढा म्हणणे अतिशयोक्तिपूर्ण वाटतं. पण गोळाबेरीज करून हेच तर सांगायचं आहे की पूर्वी दमदार असलेला हाच तो आवाज आहे. रास नृत्य करताना गरबी गीताच्या अंतऱ्याच्या वेळी जो आवाज साऱ्या मैदानात आणि मंदिराच्या शिखराप्रर्यंत फैलावत असे तो आवाज एकाएकी अस्पष्ट होणं कसं बरं शक्य आहे ? म्हणून तर तो आवाज ऐकून सर्वजण दचकले होते. साऱ्या गावाला वेडंवाकडं बोलणारे पंच त्या दिवशी गोड सल्ला द्यायला गेले होते, तरीसुद्धा त्यांना जीवनच्या डोळ्याला डोळा भिडवता येत नव्हता. त्याने सर्वांची छान हजेरी घेतली. काय सांगायला आलेत हे लोक ? हे सर्वजण काय समजतात मला ? आणि सर्व लोक माना खाली घालून निघून गेले होते. आपल्या घराच्या उंबरठ्यावर जीवन एकटाच उभा राहिला होता. आपल्या घरून चालतं व्हायला सांगायची ही घटना त्याच्या आयुष्यात पहिल्यांदाच घडली होती. पूर्वी त्याचं घर अभ्यागतांच्या स्वागतासाठी प्रसिद्ध होतं.

तो शेकोटी जवळून उठून उभा राहिला. गव्हाणीतून थोडा सुका कडबा घ्यायला निघून गेला. ढीगभर घेऊन आला. आग भडकली. आगीच्या ज्वाळा त्याच्या भुवयांपर्यंत उंचावल्या पण या ज्वाळांमध्येही उष्णता का नाही ? बर्फ पडेलसं त्याला वाटलं. आगीपासून थोडा वेळ जरी हात बाजूला केले तरी बोटं वळायला लागायची. बर्फ पडायची ही खूण आहे.

मग झोपता येणार नाही म्हणून आळस झटकून तो उभा राहिला. झोपायला गेला. त्याला पाहून बैलांनी गळ्यातील घुंगरं वाजविली. ज्वारीच्या दोन पेंढ्या त्याने गव्हाणीत टाकल्या आणि तो मचणावर चढला. उपरणं पायापासून डोक्यापर्यंत पांघरुन वरून गोधडी पांघरली. तंबाखू संपली होती. म्हणून चिलीम ओढायची इच्छा त्याने आवरली.

पांघरुणातून एकदा तोंड बाहेर काढून त्यानं पाहिलं. चंद्र पश्चिमेला खाली उतरत होता. आज पौषातली एकादशी आहे. आणि ती होती पौषाची द्वादशी.

झोप येत नव्हती. तो सारखा कूस पालटत होता. आज मुळीच झोप येणार नाहीसं त्याला वाटलं. तो उठून बसला. पण काय करावं ते समजेना म्हणून पुन्हा आडवा झाला. डोकं नीट झाकून घेऊन झोपायचा प्रयत्न करू लागला.

थोडा वेळ असाच झटपट निघून गेला. हळूहळू आपल्या पुऱ्या शरीरावर कसलंतरी ओझं घिरट्या घालीत असल्यासारखं जीवनला वाटू लागलं. परिस्थिती जाणून घ्यायचा प्रयत्न तो करू लागला आणि त्यात यश आलं नाही तेव्हा तो अधिकच व्याकुळ झाला. उजव्या बाजूला चांदीच्या बांगड्या किणकिणू लागल्या. त्याच्या कानांचे पडदे थरथरू लागले. एक धारदार आवाज त्याच्या डाव्या कानाला कुरतडू लागला. थोड्या वेळाने एक तिसरा आवाज सरसावला. गळ्यातला अलंकारांचा आवाज तिन्ही आवाज मिळून एक झाले तर एक हात जीवनच्या छातीवर येऊन विसावला. तो हात आक्रमक नव्हता, तर गळ्यातल्या हारासारखा आकर्षक होता. संकोचामुळे तर हा हात जड झालेला नाही ना असे जीवनला वाटले. आणि मोठ्या कौशल्याने त्याने तो हात धरून दाबला. त्या हातामागच्या देहाला त्याने कूस बदलून ताब्यात घेतलं. मचाण काही ओझ्यानं मोडलं नाही. रहस्य उलगडलं. दुसऱ्या हातात विळा पाहून त्याला शंका राहिली नाही. त्याने विळा त्या हातातून काढून घेऊन दूर भिरकावून दिला. विळा वर उडाला मग जवळच खाली पडला. थंडगार जमिनीत त्याची धार खुपसली गेली.

"लोकांचं म्हणणं खरंच होतं तर !"

"काय ?"

"की तू भूत झाली आहेस."

"तुम्हाला खरंच असं वाटतं ? मी भूत होणं शक्य तरी आहे काय ?"

"हो आहे. मरणाऱ्याच्या व्यथा अशाच छायारूपात भटकत राहतात."

"छे छे, हा तुमचा भ्रम आहे. मी भूत झाले नाही. मी काहीसुद्धा झाले नाही."

"बघ. उगाच बडबडू नकोस. नाहीतर चिरडून टाकीन. आता बोल."

"अयाई, तुम्ही तर पुरे कसाई आहात."

"कसाई ? तुलाही असंच वाटत होतं ? सारा गाव काय वाटेल ते बोलू देत पण तूदेखील असंच बोलणार का ? विळ्याचा जरासा घाव तुझा घास घेईल आणि मी निराधार होईन हे काय मला ठाऊक होतं ?"

"चूक माझीच होती. पण आता काय करणार ? रागात मी दूध-साखर पिऊन टाकली आणि गोष्ट लपवायला पडून राहिले. त्यात तुमची काहीच चूक नव्हती."

"पण सारा गाव मला खुनी समजतोय."

"चूक आहे. लोक सारं काही विसरले असतील. किती वर्षं झाली ?"

"नाही, काल रई विचारत होती."

"काय ?"

"की लोक म्हणतात मी हेतीला मारून टाकलं."

"तुम्ही काय उत्तर दिलं ?"

"मी म्हटलं खरं आहे बाळ. मीच तुझ्या आईला मारून टाकलं."

"असं नका हो बोलू. देवा रे. मी आता कशी परत येऊ ? कशी पहिल्यासारखी रईला जवळ बोलवू ? तुमचे पाय कसे धरू ? काय करू ? आता मी करू तरी काय ?"

हेती उठून बसली आणि जीवनच्या पायांवर डोकं ठेवून रडू लागली. "माझ्याकडून चूक झाली. मला माफ करा. आता दुसरं लग्न करून घ्या. दुःखी राहू नका."

"काय म्हटलंस ? हे कधीही होणार नाही."

"आज तुमच्याकडून वचन घेतल्याशिवाय मी जाणार नाही."

"नाही. हे शक्य नाही. सर्वथा अशक्य आहे. अशक्य, साफ अशक्य."

– आपलाच आवाज ऐकून जीवन जागा झाला. दूर कुठूनतरी कोल्ह्याच्या रडण्याचा आवाज येत होता. तो मध्येच थांबला. स्मशानापलीकडे तिकडे कुत्रं भुकलं.

तो उठून उभा राहिला. पहाट उजाडत होती. जीवनचे डोळे चुरचुरत होते. उपरणं डोक्याला गुंडाळून तो शेकोटीपाशी जाऊन बसला. आग फुलवली. समोरच्या ओस जमिनीचा काळिमा प्रकाशाने उजळू लागला. ज्वाळा उंच उठेस्तोवर जमिनीवर रिज़का (गुरांना खाऊ घालण्याचे मेथीसारखे गवत) उगवला. रिजकाला स्पर्श होऊ नये अशा बेतानं अलगदपणे एक युवती त्यावरुन चालू लागली. रिजकाची छोटी छोटी पांढरी फुलं माना उंचावून मुलायमपणे तिच्या तळपायांना स्पर्श करू लागली. तरुणीला मोह झाला. पदर खांद्यावर टाकून ती खाली बसली आणि रिजका कापू लागली.

"कुणी सांगितलं तुला हे काम करायला ?"

"माझी मर्जी !"

"ऊठ, ऊठ मोठी आलीस मर्जीवाली ! नेहमी उलटंच काम करीत असतेस."

"सरळ काम करणारे खूप पाहिलेत."

"ऊठ म्हणतो ना. नाहीतर चेचून टाकीन."

"अरे जा-जा, नामर्दा !"

हातातून हिसकावलेला विळा वर झाला आणि ओय ! जणू जीवनच्या स्वतःच्या डोक्यालाच लागलं. त्यानं डोळे मिटून घेतले. मग पाहिलं तर रक्ताचे दोन-तीन डाग वेगवेगळ्या आकारात गोलाकार फिरू लागले. त्याची गती वाढू लागली. एक वर्तुळ दिसू लागलं. वर्तुळ लहान होत गेलं आणि त्यात चंद्र सामावून गेला. चंद्रावर एक डाग दिसू लागला.

पूर्वेला लाली दिसू लागली. ते चित्र अस्पष्ट होत गेलं. दूर, आणखी दूर होत गेलं आणि पश्चिमेकडे जाऊन दिसेनासं झालं. लाल प्रकाश वाढू लागला. आणि सूर्योदयाची वेळ झाली.

गोवऱ्यांपाशी जाऊन जीवनने एक वाळलेली गोवरी उचलली आणि आणून शेकोटीत टाकली. मचाणाखाली वेडेवाकडे पडलेले आपले जोडे पायात घालून तो घरी निघाला.

नाल्याजवळच्या शेताच्या बांधावरून तो चालला होता. गावाजवळच्या एका शेतात मोहाच्या झाडाखाली त्याला एक शेकोटी दिसली. भरथऱ्यांच्या (भजन गात फिरणाऱ्या जातीचे लोक) एका कुटुंबानं तिथं मुक्काम ठोकला होता. दोन मुलं आणि त्यांचा बाप ... बापच असावा ! लहान मुलाच्या हाती सारंगी होती. त्याचा बाप त्याला शिकवीत असल्यासारखा तो गात होता –

पे'ला पे'ला जुग मां साणी !
अमे रे पोपट राय, राजा राम ना !
ओतरा ते खंडमां जांबलो पाक्यो त्यारे,
सूडले मारी मने चांच ..."

– हे गाणं जीवननं लहानपणी खूप ऐकलं होतं. शाळेत भेंड्या लावताना कितीदा हे गाणं त्याच्या उपयोगी पडलं होतं. त्याच्या काही ओळी आजसुद्धा त्याला आठवताहेत. बालपणापासून ते थेट पौषातल्या शुक्ल पक्षाच्या त्या द्वादशीपर्यंतचा सारा काळ त्याच्या नजरेसमोर आला. एव्हाना तो घराशी पोचला होता. तो चहूकडे पहात अंगणात उभा राहिला.

जीवनचा आवाज ऐकून रई जागी झाली. काकूच्या घरून आपल्या घरी आली. जीवन म्हशीचं दूध काढू लागला. रईने चूल पेटविली. जीवनने चहा केला. दोघांनी चहा घेतला.

"तुम्ही... तुम्ही रडताय ... तुम्ही रडताय बापू ?" "नाही बाळ .. हा धूर होतोय ना !" भिजल्या स्वराला शुष्क करण्याचा प्रयत्न करीत जीवनने उत्तर दिलं – शेतावर मला एक काम आहे बाळ. हा खड्डा भरेस्तोवर, आग पेटवीत रहा आणि शेकत बस.

"मी आता जाऊन येतो."

तो शेताकडे चालू लागला.

सूर्य उगवला होता.

स्मशान थंडावले होते. शांत चितेकडे पुन्हा एकदा पाहून त्याने आपल्या शेतात पाऊल ठेवलं आणि पुन्हा एकदा वळून पाहिलं. दुपारपर्यंत तो शेतावरच राहील. त्याचं शेत खूप मोठं आहे.

# सरल आणि शंपा

□ मधु राय

सरल आणि शंपाचं प्रेम होतं. ते दोघेही जवळ जवळ रोजच संध्याकाळी बागेत भेटायचे. अख्खा शनिवार रविवार बरोबर घालवायचे आणि बोलायचे.

एके दिवशी संध्याकाळी सरल आणि शंपा बागेत बसल्या बसल्या बोलत होते. शंपा सरलला म्हणाली होती की जगाच्या अंतापर्यंत असंच बोलत बसायला मिळालं तर किती छान होईल. सरल शंपाला खूप मनोरंजक, ऐकाव्याशा वाटतील अशा मजेदार गोष्टी सांगत होता. एकाएकी बागेतल्या दिव्याच्या उजेडात त्यानं पाहिलं की शंपाचा उजवा हात दिसत नाही. शंपाचा हात नुकताच तर इथं होता, एवढ्यात कुठं नाहीसा झाला ते सरलच्या अगोदर लक्षातच येईना. सरलला काही समजायच्या आत शंपाचा उजवा हात वस्त्रासह अदृश्य झाला होता. त्याच्या आरपार दिसू लागलं होतं. सरल खूप घाबरला आणि त्याने बोलायचं तसंच नेटाने पुढे चालू ठेवलं. बघता बघता शंपाचा हात अदृश्य करणाऱ्या रेखांनी शंपाचा गळा, डोकं आणि साऱ्या शरीरावर फेरा फिरवला आणि शंपा पार दिसेनाशी झाली. भीतीने सरल बोलतच राहिला.

बाग होती, बाक होता, दिवा होता. पण शंपा एकाएकी अदृश्य झाली होती. सरल अवाक् झाला. त्याची जीभ टाळ्याला चिकटली. गप्पा कशा रंगात आल्या होत्या, सरल बोलताना कधीच दमायचा नाही असं वाटत होतं. पण कशी कुणास ठाऊक शंपा अदृश्य झाली होती. शंपा अदृश्य झाल्याने बसून राहावं, शोध करायला जावं की निघून जावं ते सरलच्या लक्षात येईना.

सरलने हळूच विचारलं,"शंपा, शंपा, कुठं आहेस तू ?" पण उत्तर आलं नाही. सरलचं भय दूर झालं होतं. आश्चर्य ओसरलं होतं. हळूहळू स्वतःशीच बोलत राहिल्याने लाजून त्यानं जीभ चावली. वाटलं भ्रम झाला असेल. सरल उभा राहिला. कुणी भित्रा म्हणू नये या भीतीने थोडा वेळ तसाच बाकापाशी उभा राहिला. मग जणू बाकाकडे लक्षच नसल्यासारखं सरकून, चालू लागला, पुढे झाला, मग भराभर पावलं टाकू लागला, आणि अखेरीस चक्क धावत सुटला. बाहेर रस्त्यावर आला.

सरलला आठवलं की शंपा दिसेनाशी झाली आहे. त्याने शंपाच्या घरी तपास करायचं ठरवलं. चालता चालता तो हॉटेलपाशी आला. त्या हॉटेलात सरल आणि शंपा रोज चहा घ्यायचे. सरलला किटलीतला चहा आवडायचा. किटलीतल्या चहाच्या पानांचा भरभरून वास घ्यायची त्याला सवय होती. हॉटेलात फोन होता. तो तिथे गेला तेव्हा काही तरुण मुलं त्या पब्लिक फोनवर गोंधळ घालीत होती. ऐकायच्या कर्ण्यातूनच बोलत होती. ऐकत होती. सरल अवघडून उभा राहिला. त्या मुलांनी त्याला बरेच वेळा शंपाबरोबर पाहिलं होतं. त्यांची टिंगल केली होती. परिचय नव्हता. पण चेहऱ्यावरून तो त्यांना ओळखत होता. त्याला फोन करायला आलेलं पाहून पोरं त्याची चेष्टा करतील अशी धास्ती सरलला वाटली. पण का कुणास ठाऊक, त्याच्याकडे लक्ष जाताच, पोरं थट्टामस्करी सोडून शालीनपणे तिथून दूर झाली. आणि सरलने फोन लावला. पलीकडून उत्तर आलं, ''हॅलो !'' सरलने विचारलं,''शंपा आहे ?''

फोनवर काहीच कसं ऐकू येत नाही ते सरलला समजेना. त्याने फोन उलटापालटा केला. पैसे टाकायचा डबा खडकावला. फोनला धक्का मारून ऐकायचा प्रयत्न केला. पण काहीसुद्धा ऐकायला आलं नाही ते नाहीच. हॉटेलचा व्यवस्थापक त्याच्या ओळखीचा होता. त्याने आणि त्या मुलांनीदेखील प्रयत्न केला. फोन ठीक होता. सरलने पुन्हा प्रयत्न केला. पलीकडून उत्तर येत होतं,''हॅलो,'' सरल विचारीत होता, ''शंपा आहे ?'' पलीकडून आवाज येत होता. ''शंपा'' आणि मग सारं शांत ... सरलने फोन आदळला. विचारात गढून, गोंधळून जाऊन दाट निराशेने हलके हलके दात ओठ खात तो बाहेर पडला. हॉटेलच्या बाहेर पानाचं दुकान होतं. तिथं उभ्या उभ्या त्याला कुणीतरी दोन माणसं रिक्षात बसून कुठेतरी जाताना दिसली. त्याच्या लक्षात आलं रिक्षात बसून शंपाच्या घरी जाता येईल. तो रिक्षातून शंपाच्या घरी गेला. रिक्षा बाहेर उभी ठेवली. कदाचित शंपा घरी असली तर तिला बरोबर घेऊन बाहेर जाता यावं म्हणून. सरलने खिशात हात घातला. पैसे कमी होते. त्याने रिक्षा सोडून दिली. घरात गेला.

''शंपा ?''

शंपाच्या घरात आश्चर्य पसरलं.

''शंपा कोण ?''

अरेच्या, हे काय ? सरलच्या मनात आलं. शंपाच्या घरात तिला कुणीही ओळखत नाही ? मग त्याला आठवलं शंपाच्या घरात तिला ''बेबी'' म्हणतात. त्याला विचारावंसं वाटलं, ''बेबी कुठाय ?'' त्याच वेळी छापील पातळ नेसलेली एक प्रौढ

वयाची बाई कणिक भिजवता भिजवता तशीच बाहेर आली. ती शंपाची आत्या होती. तिचं नाव होतं चंपा. सरलने घाबरून म्हटलं, ''छे, छे, शंपा, शंपा, तुमची पुतणी ... बेबी ... बेबी !'' तो भलतंच काही बोलत असल्यासारख्या दृष्टीने ते दोघे त्याच्याकडे पहात होते.

सरलचं तर शंपापाशी काम होतं – चंपाशी काम असतं तर त्याने चंपाताई किंवा चंपाकाकू म्हटलं असतं. त्याने चक्क शंपा म्हटलं होतं. ''बेबी, बेबी !'' शंपाची धाकटी बहीण हातात इंद्रजाल कॉमिक घेऊन आतल्या खोलीतून बाहेर आली. थंडीने तिचे गाल फुटले होते. तिने चष्मा लावला होता. वयाच्या मानाने शंपाची ही धाकटी बहीण कठोरच वाटत होती. तिने अविश्वासाने सरलकडे बघितले, ''काय काम आहे ?''

''छे.छे. माझं शंपाशी काम आहे. हिच्या मोठ्या बहिणीशी.'' हताशपणे सरल म्हणाला. घागरा चोळी नेसलेली मोठी बहीण बाहेर आली. तिच्या भिवईवर चामखीळ होती. केसांची एक बट चंद्रासारखी कपाळावर आली होती. ती शंपा नव्हती. सरलने गोंधळून म्हटलं, ''ही नव्हे. ही नव्हे." त्याने त्या मुलीला कधी पाहिलंसुद्धा नव्हतं. ती शंपाच्याच वयाची होती. शंपाच्याच घरात होती. पण शंपा नव्हती. तो शंपाच्या वडिलांना म्हणाला, ''शंपा तुमची मधली मुलगी ...'' पण बोलणं तिथंच खुंटलं. का कुणास ठाऊक घरात शंपा मुळी नव्हतीच. तो भलत्याच घरी आला असावा अशा अपरिचित नजरेनं सर्वजण त्याच्याकडे बघत होते.

सरल बोलू लागला, ''हे पहा –'' आणि आपल्यापाशी शंपाचा एक फोटो असल्याच त्याला आठवलं. तो म्हणाला, ''हे पहा, मी फोटो दाखवतो.'' पाकीट काढून फोटो दाखवीत. त्याने म्हटलं, ''ही मुलगी.'' बापूजी हसले. फोटो सरलचा स्वतःचा होता. सरलने फोटो पाहिला. आणि त्याचं तोंड रडकं झालं. त्याने सर्व खिसे चाचपडले. शंपाचा फोटो नव्हताच.

सरल तिथून उठला. शंपाची एक मैत्रीण तिथून जवळच रहात होती. तो चालत तिथवर गेला.

''या, या, सरलभाई'', मैत्रिणीने स्वागत केले. ''आई, सरलभाई आलेत.'' आई बाहेर आली. ''कसं काय सरल ? तब्येत वगैरे बरी आहे ना ?''

''शंपा आहे ?''

''शंपा ? म्हणजे ?''

''शंपा, शंपा, तुझी मैत्रीण इथं आहे ? विजयभाईची मुलगी ...'' सरलने व्याकुळ

होऊन हात जोडले. मैत्रिणीनेदेखील लगेच नमस्कार केला. शंपाची मैत्रीण शंपा नावाच्या कुणाही मुलीला ओळखत नव्हती. "शंपा ? मुलीचं नाव आहे ? आता काय करावं ते सरलला समजेना. उद्या कॉलेजमध्ये शंपाला नक्की गाठायचं, त्यानं मनाशी ठरवून टाकलं. ती कॉलेजमध्ये येईल आणि भेट होईल. तो निघाला. शंपाची मैत्रीण नमस्कार करीत उभीच होती.

संपूर्ण पहिला तास सरलने शंपाची वाट पाहण्यात घालवला. मग बाहेर उभा राहून राहून तो दमला. तेव्हा दुसऱ्या तासाला वर्गात जाऊन बसला. "रोल नंबर एकशे दोन", "प्रेझेंट सर ... " आणि एकशे वीस नंबर शंपाचा होता. "रोल एकशे वीस." प्राध्यापकांनी पुकारलं. उत्तर आलं नाही. "रोल एकशे वीस." पुन्हा निस्तब्धता. आपणच तिची हजेरी लावावी असं सरलच्या मनात आलं. पण मुलीच्या नावासमोर मुलाच्या आवाजाने हजेरी दिल्यास पकडलं जाण्याची भीती होती. त्याचवेळी आवाज आला. "प्रेझेंट सर !" कुणातरी मुलाचा आवाज होता. सरल मान उंचावून बघू लागला. एक लठ्ठसा मुलगा हजेरी लावत होता. प्राध्यापकांनी लक्ष दिलं नाही. "रोल एकशे एकवीस...."

तास संपल्यावर सरल त्या लठ्ठ मुलापाशी गेला. त्याला काही विचारायच्या अगोदरच त्याच्या वहीकडे त्याचं लक्ष गेलं. लिहिलेलं होतं कोठारी के. टी. रोल नंबर 120. सरलने प्राध्यापकांना विचारलं, "सर, एकशे वीस रोल नंबर कुणाचा आहे ?" प्राध्यापकांनी ऑफिसात चौकशी करायला रुक्षपणे सांगितले. ऑफिसात माहिती मिळाली 120 नंबर के. टी. कोठारीचा आहे. आणि "शंपा शुक्लचा नंबर ?" - ऑफिसात पंधरा मिनिटं तपास केल्यावर उत्तर मिळालं, "शंपा शुक्ल नावाचं कुणीही रोलवर नाही." "शंपा विजयराय शुक्ल." सरलने पुन्हा बघायचा आग्रह केला. रोल तपासण्याचा चार आणे चार्ज होता. कारकुनाने सरलकडे बघून एकाच वेळचे पैसे घेतले आणि विचारले, "तब्येत तर बरी आहे ना ?"

सरलने कॉलेजात जवळजवळ सगळ्यांनाच विचारलं. पण शंपा कुठं आहे ते सांगायचं दूरच राहिलं. शंपाला कुणी ओळखतही नव्हतं.

सरल आपल्या एका मित्रापाशी शंपाविषयी नेहमी बोलायचा. आज तो बोलू लागला तर मित्र विस्मयाने बघू लागला. "शंपा ?" हे नाव आज पहिल्यांदाच ऐकत असल्याचं मित्रानं सांगितलं. सरल म्हणाला, "रोज तर मी तिच्याविषयी बोलत असतो." मित्राने उत्तर दिले, "कुणास ठाऊक. मला तरी काही आठवत नाही." वसतिगृहात जाऊन शंपाची पत्रं वाचायचा विचार सरलने केला. पण बॅगेत पत्रंच

नव्हती. शंपाने त्याला एक फाउंटन पेन भेट म्हणून दिलेलं होतं. त्यावर सरल आणि शंपाची नावं कोरलेली होती. सरलने पाहिलं, काहीच कोरलेलं नाही. फक्त पेन बनविणाऱ्या कंपनीचं नाव आहे.

संध्याकाळी बागेत जायचं सरलने ठरविलं. बागेत जाण्यापूर्वी त्याने हॉटेलात जायचा विचार केला. हॉटेलात जाऊन त्या ओळखीच्या व्यवस्थापकाशी 'माझ्या सोबत जी मुलगी येते ना ?' तिच्याविषयी बोलायला त्याने सुरुवात केली. व्यवस्थापकांनी नम्रपणे म्हटले, "मुलगी ? तुम्ही तर नेहमी एकटेच येता." वेटरने पण हेच सांगितलं. सरल पुन्हा म्हणाला, "असं कसं ? ती मुलगी कितीदा तरी इथून फोन नाही का करायची की उशीर झालाय जेवूनच येईन म्हणून. नुकता परवाच नाही का फोन केला होता ? कालच मी तिच्या घरी फोन नव्हता केला ?"

व्यवस्थापक गोंधळून म्हणाले, "पण इथं फोनच कुठं आहे ? आपको कुछ धोखा हुआ है." भ्रम ? सरल मनाशी म्हणाला. मला भ्रम झालाय ? त्याने उठून टेलिफोनच्या जागेकडे पाहिलं. तिथे काहीसुद्धा नव्हतं. फोनच नव्हता.

सरल पायी चालत चालत बागेत आला. काल बसला होता त्याच बाकापाशी येऊन थबकला. आणि बघता बघता त्याच्या डोळ्यांसमोर तो बाक अदृश्य होऊ लागला. क्षणात तो बाक दिसेनासा झाला. आणि सरलने आश्चर्याने पाहिलं तेव्हा त्याला तो स्वतः मेंदीच्या कुंपणापाशी उभा असल्याचं दिसलं.

फळ्यावरची अक्षरं पुसली जावीत तद्वत ती बाग सरलच्या नजरेसमोरून पुसट होऊ लागली. आणि हा हा म्हणता कुठेतरी हरवली. सरल धावत धावत दाराबाहेर पडला. आणि त्याने मागं वळून पाहिलं. दार अदृश्य झालं होतं. बाग होती त्या जागी डांबरी रस्ता तयार झाला होता. हॉटेल होतं त्या जागी आधुनिक धर्तीचं घर उभं राहिलं होतं. भिऊन सरलने रिक्षा पकडली आणि शंपाच्या घरी पोचला. शंपाच्या घरी आज तिचे बापूजी फक्त होते. विजयरायनी त्याला विचारलं, "या, कुठून आलात ?" थक्क होऊन सरलने स्वतःची ओळख करून दिली, "मी काल नव्हतो का आलो ?" विजयराय म्हणाले, "आपला काहीतरी घोटाळा झालाय. काल तर घर बंद होतं. सर्वजण मुंबईला गेलेत. मीदेखील आजच आलोय." विजयरायनी सांगितलं की त्यांनी सरलला यापूर्वी कधीच पाहिलेलं नाही. एव्हाना तिथं चारपाचजण जमले होते, "तुम्ही घर चुकला असाल." असं म्हणत वाट दाखवू लागले होते. मैत्रिणीने म्हटले, "पलीकडच्या आळीत माझी मावस बहीण रहाते. ती माझ्यासारखीच दिसते. तुमची ... चेहरा ओळखण्यास कदाचित काही चूक झाली असेल."

सरल दुसऱ्या दिवशी कॉलेजात गेला त्यावेळी रोल नंबर एकशे दोनच्या उत्तरात एक शीख मुलगा हजेरी देत होता. ऑफिसात चार आणे देऊन तपास करायला लावला तर कळले की एकशे दोन नंबर जे. सी. ग्रेवालचा आहे. आणि सरल पी. पटेल नावाचा कुणीही मुलगा कॉलेजात नाही. सरलने स्वतःची पुस्तकं, वह्या दाखविली.

ती सर्व कशी कुणास ठाऊक जे. सी. ग्रेवालच्या नावाची होती. आणि परत द्यावी लागली होती. सरलने वसतिगृहात जाऊन चौकशी केली. त्याच्या खोलीत कुणी परदेशी माणूस रहात होता. त्यानं सरलला मोठ्या तत्परतेने नीट समजावून सांगितलं की, सरल रात्री इथे झोपला होता, आणि दोन वर्षांपासून तो इथे झोपतोय ही सरलची समजूत चुकीची आहे. काही गैरसमज आहे. परदेशीचं नाव होतं, टी. ब्राऊन टी. फॉर टेड म्हणजे थिओडोर ... '' परदेशीनं समजावलं. सरलने दोरीवर वाळत घातलेले आपले कपडे दाखवले. पण त्यातला एकही सरलच्या मापाचा नव्हता. कपाटात त्याची पुस्तकं होती. पण त्यावर थिओडोर ब्राऊनचं नाव होतं. वसतिगृहाच्या रजिस्टरमध्ये त्याचं नाव नव्हतं. सरलने युनिव्हर्सिटीत स्वतःच्या नावाविषयी चौकशी केली. गेल्या पाच वर्षांच्या तिथल्या रेकॉर्डमध्ये त्याचं नाव नव्हतं. नगरपालिकेच्या मतदारांच्या यादीत तो नव्हता. तो स्वतः एकदोन मासिके मागवायचा. पण वर्गणीदारांच्या यादीतही तो नव्हता. दिवा न लावता सायकल चालवल्याच्या गुन्ह्यावरून एकदा त्याला अटक झाली होती. पण कोर्टात त्याचं नाव वा गुन्हा नोंदलेला नव्हता. क्रिकेट खेळताना त्याच्या डोक्याला खूप मार बसला होता. त्यावेळी त्याला हॉस्पिटलमध्ये दाखल करण्यात आलं होतं. तिथल्या नोंदवहीत तो नव्हता. वसतिगृहाच्या भोजनालयात त्याचं कुपन बुक नव्हतं. नगरपालिकेच्या तलावावरील क्रमांक 42221 कुणा पांढऱ्या केसांच्या व्यापाऱ्याचा होता. कॉलेजच्या आयडेंटीटी कार्डवर त्याचा फोटो नव्हता. वाचनालयात त्याने सही केलेल्या वह्यांमधून त्याच्या शेकडो सह्या अदृश्य झाल्या होत्या. पोस्ट ऑफिसातून दर महिन्याला येणाऱ्या मनिऑर्डरच्या पावत्या तपासून बघता सरलच्या नावाचं कुठलंही गाव नव्हतं. तिकिट घेण्यासाठी त्याने पैसे दिले. पण सर्टिफिकेट ऑफ पोस्टिंगचा शिक्का मारणाऱ्या कारकुनाने ते परत दिले. कारण त्या जिल्ह्यात त्या नावाचं एकही पोस्ट ऑफिस नव्हतं.

सरलनं स्वतःचं घड्याळ आणि पेन विकून टाकायचा विचार केला. आपल्या एका मित्राला या दोन्ही वस्तू दाखवायचं त्यानं ठरवलं. अर्थात तो मित्र आपल्याला

ओळखणार नाही याची त्याला खात्री होती. अतिशय कृतज्ञतेने तो मित्र म्हणाला, "थँक्स कुठं सापडल्या या वस्तू ?" सरलनं उत्तर द्यायच्या आत मित्राने आपल्या बायकोला हाक मारून म्हटले, "बघितलंस ? मी म्हटलं नव्हतं की आपण आगगाडीतच विसरलो म्हणून. हे विचार घेऊन आले. का हो, हे घड्याळ माझंच असल्याचं तुम्हाला कसं समजलं ?"

"का, तुमचं नाव आहे की वर." बायकोनं पेन आणि घड्याळ मित्राच्या हातून हिसकावून घेत म्हटलं. जणू पुन्हा त्या वस्तू हरवतील. मित्राच्या बायकोनं मोठ्यानं वाचलं - "अशोक त्रिवेदी", दोन्ही वस्तूंवर नाव कोरलेलं होतं. अशोक त्रिवेदीने आभारपूर्वक सरलला सरबत पाजलं आणि वर थट्टा केली.

"थंडीच्या दिवसांत सरबत, पण माफ करा हं, घरात दूध संपलंय. माझी बायको जरा गरम स्वभावाची आहे ना ... ह्यॅ ह्यॅ ... म्हणून सरबत अधिक चांगलं ... ह्यॅ ह्यॅ, ह्यॅ ..."

चालता चालता आपल्या पायातले जोडे खूप घट्ट झाल्याचं सरलला जाणवलं. त्यानं जोडे काढून तपासले. आणि बघितलं तर काय दहा वर्षांच्या मुलाला येतील इतके लहान होते. जोडे तसेच तिथे टाकून तो अनवाणी पायांनीच चालू लागला. चालता चालता त्याने डोक्यावरून हात फिरवला आणि पाहिलं तर डोक्याला टक्कल पडलेलं होतं. एकही केस नव्हता. शर्टात हात घालायला गेला तर दिसलं की तो फक्त चड्डी नेसून रस्त्यावरून चाललाय. आणि का कुणास ठाऊक कुणालाही त्याविषयी कुतूहल वाटत नव्हतं. सरल धावू लागला. धावता धावता त्याच्या शरीरावरील लव हवेत उडून जाऊ लागली. आणि शरीरावरून अदृश्य होऊन गेली. विवस्त्र अवस्थेत धावता धावता तो एका झऱ्यापाशी पोचला. पाण्यात पाय बुचकळून त्याने ते बाहेर काढले. पण पाय बाहेर आलेच नाहीत. त्याचे पायही अदृश्य झाले होते. सरलने रेतीवर आपलं नाव लिहायचा प्रयत्न केला. तो नाव विसरला होता. भाषा विसरला होता. आडव्या तिडव्या रेघोट्या काय त्या त्यानं ओढल्या. झऱ्याच्या पाण्यात स्वतःचं प्रतिबिंब पहाण्यासाठी त्यानं मस्तक वाकवलं. पाण्यात काहीसुद्धा दिसत नव्हतं. पाणी वाहात होतं. आणि पाण्याखालची रेती, दगडधोंडे, सारं काही स्वच्छ दिसत होतं. पण सरलचं प्रतिबिंब मात्र दिसत नव्हतं. तो हातात हात गुंफायला गेला तर ते फक्त हवेत झुलले. इतका वेळ ऐकू येणारा झऱ्याचा, कोकिळेचा आवाज स्तब्ध झाला होता. त्याला काही ऐकू येत नव्हतं, दिसत नव्हतं, जाणवत नव्हतं. सरल संपूर्ण अदृश्य झाला होता.

पृथ्वीवरून इतक्या सफाईनं सरलचं नावनिशाण नाहीसं झालं होतं जणू सरल

स्वतःच एक भ्रम होता. "आपको कोई धोखा हुआ है," "समजुतीचा घोटाळा झालाय"; "चेहरा ओळखण्यात काही चूक झालीय", पण सरलला ठाऊक होतं, जोवर तो स्वतःच्या अस्तित्वाविषयी आत्मविश्वासपूर्वक बोलू शकतो तोवरच तो अस्तित्वात आहे. आणि आपलं अस्तित्व तेथेच स्थगित करून टाकलं. कारण त्याचा आत्मविश्वासदेखील कदाचित त्याच्या नात्यांसारखाच त्याला आश्चर्याने विचारील, "कोण तुम्ही ? तुम्हाला कुठं पाहिल्याचं काही आठवत नाही."

# गज

□ राधेश्याम शर्मा

चहूबाजूंना उभ्या असलेल्या उंच उंच डेरेदार वटवृक्षांच्या आणि हिरव्यागार दिसण्याच्या नादातच सुकलेल्या बाभळीच्या झाडाच्या मध्ये वसलेले एक गाव.

धुळीनं भरलेला एक मोहल्ला. पण धूळ फारशी उडत नाही. लग्नसराईत म्हाताऱ्या बायका जेव्हा वरात पाहण्याच्या नादात घाईगर्दीनं चौकाकडे निघतात तेव्हाच काय ती धूळ खूप उडते. बाकीच्या दिवसात मंदगतीनं चाला नाहीतर द्रुत गतीनं चाला. का कुणास ठाऊक ही धूळ काही उडत नाही. वारादेखील तिला उडवीत नाही. आजूबाजूच्या घरांच्या चौकातील मोऱ्यांमधून पाणी वाहात असतं, ओघळत असतं किंवा ठिबकत असतं म्हणूनच कदाचित धुळीचे पंख भिजलेले राहात असतील. पण या अख्ख्या मोहल्ल्यात पोरंही नाहीत की काय ? खोडकर पोरं ?

पोरं तर आहेत. आम्ही ज्या घरी निघालो आहोत तिथं तर तीन तीन पोरं आहेत. लहान लहान कुरळ्या केसांचा, पाचव्या इयत्तेत शिकणारा सुमारे दहा वर्षांचा एक मुलगा आणि त्याच्या दोन बहिणी. एक बहीण तेरा वर्षाची आहे – घागरा पोलका नेसते आणि अभ्यासाच्या वहीत दुधाचा हिशेब लिहून आईला देत असते. दुसरी बहीण सात वर्षांची आहे. ती दिवसभर शेंबूड नाकात वर ओढत असते आणि फ्रॉक व अंडरवेअर घालून हिंडत असते. रात्रीच्या जेवणाच्या आतच ती झोपी जाते आणि रात्री झोपेत सारखी दचकते.

पण ही पोरं गल्लीत काही फारशी दिसत नाहीत. बाहेरचा वारा तर त्यांच्यापेक्षा त्यांच्या आईने कठड्यावर वाळत घातलेल्या साडी झंपरांना आणि मुलांच्या कपड्यांनाच जास्त लागत असेल. वारा ? इथल्या वाऱ्याला थंडीची लाट म्हणता येईल, पण संध्याकाळच्या पारदर्शी अंधारात ओट्यावर उभ्याउभ्या वाती वळताना या पोरांची आई जेव्हा शेजारणीशी बोलत असते तेव्हा बहुधा हेच म्हणते की हा वारा श्वासाबरोबर आत जाताच जणू शिसासारखा जड होऊन जातो. ज्या घरी हे बोलणं होतं तिथं कुठल्याशा देवीचं स्थान आहे. कोनाड्यात वाडवडिलांच्या काळापासून कोणत्या तरी दैवीशक्तीचा वास आहे असं म्हणतात. रोज संध्याकाळी

कोनाड्यात दिवा लावणाऱ्या आणि नवरात्रीत उपवास करणाऱ्यानांच या घराचा मालक हे घर भाड्यानं देतो. या घरात पूर्वी एक डॉक्टर रहायचा. मग एक स्वैपाकी राहिला आणि आता परिवार नियोजनात काम करणारी ही बाई आपल्या तीन मुलांसह रहातेय. तीन महिन्यांपूर्वीच ती या गावी नोकरी करायला आलीय.

हे कौलारू घर जास्त उंच नाही. तसं पाहिलं तर घर दुमजली आहे पण वरच्या मजल्याला माडी म्हणणं जास्त योग्य होईल. पावसाळ्यात कौलांवरून पाण्याच्या धारा वाहात असल्या आणि त्यावेळी खालून एखादी बाई पाण्याला जात असली तर तिच्या डोक्यावरील तीन घागरींपैकी वरची घागर तरी नक्कीच पाण्यानं खाली पडेल. गेल्या कित्येक वर्षात या बाबतीत कुणालाच काही सुचत नाही. कौलांची शाकारणी करायला कधी कुणाला वर चढवलं तर सुचेल ना ? पण आश्चर्याची गोष्ट आहे, शाकारणी न करताच कौलं सहीसलामत आहेत. माकडांच्या उड्यामुळे थोडी फार मोडतोड झाल्यासारखं वाटतं इतकंच ! घरमालक आणि म्हाताऱ्या बाया म्हणतात "आई जगदंबेची कृपा आहे," आणि मग तपकीर ओढू लागतात.

कौलांवर काटेकुटे पडलेले असतात आणि थंडीची लाट आली म्हणजे ते जणू एखाद्या स्वप्नात लीन होऊन जातात. आकाशात घिरट्या घालणाऱ्या घारी या घराला विशेष करून प्रदक्षिणा घालतात. मुलं गल्लीत असली तर त्यांना हे बघायला मिळतं.

कुरळ्या केसांच्या मुलाने आजही अशा घिरट्या घालणाऱ्या घारींना बघितलं. घारी जणू एकमेकांशी भांडत होत्या. पण हळूहळू सर्वजणी पांगू लागल्या. डोळे विस्फारून मुलगा हे बघत राहिला आणि दोन घारी वगळता सर्व विमानासारख्या दृष्टिआड झाल्या. दोघी उरल्या होत्या आणि विहरत होत्या. आनंदाने मुलाने आपल्या दोघी बहिणींना हाक मारली - "नीना .... वासली !" एका घारीच्या चोचीत काहीतरी होतं आणि ते हिसकावून घेण्यासाठी दुसरी घार झडप घालत होती. पण पहिली घार ती वस्तू सोडायला तयार नव्हती. एकदा तर गावात नव्यानेच आलेल्या विजेच्या तारांमध्ये ती अडकणारच होती. पण थोडक्यात बचावली. दुसरी जास्त ताकदवान होती. पहिल्या घारीने चोचीत धरलेली वस्तू कौलांवर टाकून दिली आणि निळ्या नभात ती पुन्हा घिरट्या घालू लागली. मुलाचं कुतूहल वाढलं. एका घराच्या पाइपावार थोडं चढून घारीनं वर काय टाकलं आहे ते पाहिल्याखेरीज त्याला राहवलं नाही. तो एक घायाळ उंदीर होता. तेवढ्यात दुसरी घार सुसाट आली आणि तो उंदीर घेऊन उडून गेली. पहिली घार नुसती घिरट्याच घालत राहिली. तेवढ्यात आईची हाक ऐकून मुलगा घरात गेला. आत जाताच त्याने गजांची खिडकी उघडली. पण

उघडताना नकळत त्याचा हात गजांमध्ये अडकला. त्याने हात खूप ओढला. पण तो काही निघाला नाही. तेव्हा तो ''जीजी !'' म्हणून ओरडला, ''माझा हात पुन्हा गजांमध्ये अडकलाय.'' आई शेजारच्या खोलीतून आली. मुळीसुद्धा न घाबरता तिनं त्याचं कोपर आणि मनगट धरून अशा काही युक्तीने त्याचा हात सोडवला की मुलगा आणि आईच्या मागे वेड्यासारख्या उभ्या असलेल्या त्याच्या दोन्ही बहिणी थक्क झाल्या.

एक उंट गल्लीतून सावकाश चालत गेला. उंटाच्या पाठीवर सांगड तर होतीच पण वरातीत येणाऱ्या रथामध्ये असतं तसलं एक लहान बाजलंदेखील होतं आणि मागच्या बाजूला एक पाळणा लटकत होता. तो चांगलाच हलत होता. पांढऱ्या रंगाचे घोडे आणि ध्वज असलेले भाले घेऊन बसलेले घोडेस्वार त्यावर चितारलेले होते.

आईने म्हटलं, ''चला आता जेवून घ्या.''

आणि मग जणू स्वतःलाच विचारीत असल्यासारखी ती पुटपुटली, ''पोस्टमन आला होता ?'' पण उत्तर देणारं तिथं कुणी नव्हतं. आतल्या खोलीतून ताटवाट्यांचा आवाज ऐकू आला. एकाकीपणा घालवण्यासाठी तिने खोलीभर नजर फिरवून सारं काही व्यवस्थित आहे ना, कुठं काही अस्ताव्यस्त तर नाही ना ते पाहिलं. खिडकीची दोन्ही कवाडं तिने एकत्र जुळवून जोरात ओढली. खिडकी एकदम खच्चदिशी फिट होऊन बंद झाली. एक चिमणी भुर्रदिशी उडाली आणि प्रौढ दिसणाऱ्या एका माणसाच्या तसबिरीमागे जाऊन लपली. आता खिडकीला कडी घालायची होती. कडी घातली नाही तर कित्येकदा वाऱ्याच्या धडकीने खिडकी उघडते आणि ही गोष्ट या स्त्रीला मुळीच पसंत नाही. उंदीर नासाडी करतील म्हणून ती शिंक्यावरदेखील खायचे पदार्थ कधी उघडे ठेवीत नाही. हीच गोष्ट दारं खिडक्या बंद करण्याच्या बाबतीत आहे. खिडकी उघडी राहिली तर उंदीर आणि मांजरच नव्हे तर कुत्रीदेखील आत येतील.

कडी घालण्यासाठी ती साखळी धरून जोरात ओढू लागली. आणि जुन्या झोपाळ्याच्या तेल न घातलेल्या कड्यांमधून येतो तसा कर्र कर्र चा आवाज होऊन कडी घातली गेली. गजांच्या खिडकीच्या घट्ट बसलेल्या बिजागऱ्यांनी जणू सुटकेचा श्वास सोडला.

याच खोलीत झोपाळा होता. घरमालकाच्या कृपेचं प्रतीक म्हणून तो झोपाळा प्रत्येक भाडेकरूला मिळायचा. या घराच्या बाबतीत तऱ्हेतऱ्हेचे गैरसमज असलेल्या घरमालकाच्या नव्या सुनेला हा झोपाळा अनुकूल ठरला नव्हता. झोपळा जरासा

हलताच तिला चक्कर येऊ लागायची आणि त्यावर झोपल्यास विळखा घालणाऱ्या अजगरांची स्वप्ने पडायची.

उन्हाच्या हिशोबाने बंद खिडकीच्या गजांच्या सावल्या झोपाळ्याच्या चिरा पडलेल्या पाटावर पडल्या तशी ती घाबरली. झोपाळा तिला एका विशाल मंचासारखा का वाटला ते तिला उमजले नाही. ती लगेच दुसऱ्या खोलीत निघून गेली. तिथे तेरा वर्षाची नीना, सुरेश आणि वासलीला जेवायला वाढत होती. ही खोली बर्फासारखी थंडगार होती. "उठ नीना, मी वाढते," असे म्हणून ती पाटावर बसली आणि जेवण वाढू लागली. वाढता वाढता तिच्या लक्षात आलं की आपले कपडे गुडघ्यांच्या वर चढले आहेत. आणि मांड्यांच्या दाबामुळे पायांची लव जणू ताठरली आहे. हे बघताच तिला संकोच वाटला आणि तिने झटपट साडी खाली ओढली. नीनाचं आणि आपलंही जेवण ताटात वाढून घेताना ती मनातल्या मनात म्हणाली - "माझे पाय असे दिसलेले त्यांना मुळीच आवडत नसे."

आणि तिच्या मनात जणू कुणी एक रंगीत चित्र उभं केलं - कानातले लांबलचक डूल हलवणाऱ्या एका स्त्रीचा चेहरा तिच्यासमोर तरळून गेला. स्त्रीच्या आजूबाजूला छापील अक्षरांच्या आगगाड्या छुकछुक करीत विपरीत दिशेने धावू लागल्या. क्षणभर ती त्या नाल्यांच्या, तलावांच्या स्थिर द्युतीसारखी बनली जे धडधडणाऱ्या चाकांच्या मधल्या रिकाम्या जागेतून दिसत असतात !" आई, भाजी !" मुलाने हळूच म्हटलं. आईनं ऐकलं नाही तेव्हा त्यानं वर पाहिलं. आईचं लक्ष कुठंय ? तो पुन्हा म्हणाला, "भाजी." हात यंत्रवत वर झाला आणि कढईत उरलेली थोडीशी भाजी गोळा करू लागला. ताटात धप्पदिशी भाजी वाढल्याचा आवाज झाला. सुरेशनं पाहिलं वांग्याची भाजी आहे. त्या मेलेल्या उंदरासारखी दिसणारी. त्याला मग जेवण गेलं नाही.

वासली हातातल्या घासाशी खेळत होती. आईनं धमकावलं, "नीट जेव." नीनाने आज अभ्यास संपवला होता. आणि स्वैपाक करायला आईला मदत केली होती. म्हणून ती स्वस्थपणे जेवत राहिली. आणि आई आज धड जेवली नाहीय इकडे तिचं लक्षच गेलं नाही. झटपट हात धुवून पदराने हात पुसत आई आणि नीना खरकटी भांडी गोळा करू लागल्या.

सुरेश आणि वासलीनं आपापली दप्तरं लावायला सुरूवात केली. वासलीचं लक्ष तिच्या दप्तराच्या पांढऱ्या कापडावर निळ्या दोऱ्यानं भरलेल्या मोराकडं गेलं. हा मोर असून मोरासारखा का नाही दिसत ते तिच्या लक्षात येईना. मोराला जणू पंखच नव्हते ! तिला वेडपट समजणाऱ्या सुरेशनं म्हटलं, – "वासली, लवकर आटप.

नाहीतर उशीर होईल आणि मार्क जातील."

स्वैपाकघरात भांडी घासणाऱ्या नीनानं राख आणि भांड्याच्या खसखस आवाजातच आईसमोर आपली मागणी मांडली, "आई, मला कंपास हवाय."

भांडी घासण्याचा आवाज थोडा वेळ येत राहिला. मग आईने उत्तर दिलं. "पगार झाल्यावर आणून देईन."

"पण बाई वर्गातून हाकलून देईन म्हणत होत्या, तू एक चिठ्ठी लिहून दे ना !"

"देईन लिहून. चल लवकर आटप. नाहीतर मलाही हॉस्पिटलवर जायला उशीर होईल. दुसरी कामंही खोळंबली आहेत."

शाळेत जाण्यासाठी तिन्ही मुलं जसजशी तयार होत गेली तसतसं खिडकीतून येणारं ऊन गजाचा छाप झोपाळ्यावर आणखी दाट उठवत गेलं. सुरेश दारामागे ठेवलेल्या चपला हुडकायला गेला तशी झोपाळ्याला छताशी लटकावून ठेवणाऱ्या कड्याची त्याच्या टेनिसची रॅकेट असलेल्या हाताशी टक्कर झाली. पण तिथून निघून तो पेन मागायला आतल्या खोलीत गेला तेव्हा झोपाळ्याच्या हलणाऱ्या कड्यादेखील स्थिर होऊन खिडकीच्या गजाच्या सावल्यांशी एकरुप होऊन गेल्या.

कडी काढली तर पुन्हा करकरण्याचा आवाज झाला. झोपाळा स्थिर होता. कडी पुनः पुन्हा झोपाळ्याच्या अस्तित्वाची जाणीव करून देते. पण त्याचा प्रतिध्वनी मात्र कुठेच घुमताना ऐकू येत नाही.

खिडकी उघडताच गज अदृश्य ! गजांच्या जागी दाराची लांबरुंद चौकट. चौकटीत गायीचा शकुन पाहण्यासाठी उभ्या असलेल्या तीन मुलांच्या सावल्या. झोपाळ्यावर तिन्ही मुलांच्या मस्तकांच्या सावल्या पडत होत्या. त्यांना उंच उंच शिखरं समजून एक कोळी त्यांच्यावर एका पाठोपाठ एक चढउतार करीत होता. "अरे, खिडकी लावून जा. नाहीतर मला उठावं लागेल." आतून आईचा आवाज आणि मग खिडकी बंद करणाऱ्या सुरेशचा आवाज – "सूर्याने एकदा आपल्या भावाला रिक्षेच्या खाली येण्यापासून वाचवलं होतं. त्याने जर त्याला धरलं नसतं तर तो नक्कीच त्याच्याखाली चेंगरला असता. तरीदेखील ..."

प्रसतूतिगृहाचे डॉक्टर म्हणतात – "तरीदेखील त्यांना तुरुंगाची शिक्षा होईलच. तुम्ही खटला भरला नाही तर काय ते सुटतील ?"

अरे, आज तर मला लवकर जायचंय. नवा रोगी आहे. खूप घाबरतो. 'केस' बिघडली तर ... या परकराची नाडी बदलायचं केव्हापासून म्हणतेय पण वेळच होत नाही ... डाक पण आली नाही. ते भाई तर म्हणत होते की वर्तमानपत्रात प्रसिद्ध

करवून लगेच पाठवीन ...

त्याचवेळी खिडकीच्या पलीकडून आगंतुकाचा खाकी आवाज आला – "बाई, तुमची डाक."

डाकेत दैनिक वर्तमानपत्र होतं. झटपट वरचं वेष्टण फाडून वर्तमानपत्राची पानं उलटू लागली. नाटक सिनेमाच्या जाहिराती असतात त्या सहाव्या पानावर एका ठळक चौकटीत एक जाहिरात छापलेली होती. एक चित्र होतं. त्यात एका बाजूला एक नटवी दिसणारी तरुणी होती. तिने आपल्या दोन वेण्यापैकी एक आपल्या उन्नत वक्षःस्थळावर पुढे ओढली होती. चित्रात दुसऱ्या बाजूला सरळ भांग पाडलेल्या, आणि छोट्या छोट्या मिशा असलेल्या एका माणसाचा चेहरा होता.

तरुणीच्या फोटोखाली लिहिलं होतं –

"श्रीमती चंद्रिका, वय : 30 वर्षे, थलतेजाचे नागरिक चंदूलाल परमानंद दवे यांची पत्नी, सोबतच्या फोटोतील आर्. एम्. पी. डॉक्टराना पळवून घेऊन गेली आहे."

पुरुषाच्या फोटोखाली माहिती होती – "मधुकांत उर्फ माधवलाल प्रल्हाद व्यास. वय 40 वर्षे, मूळ गाव रुपापर, उपरोक्त स्त्रीसह तीन महिन्यांपूर्वी पळून गेला आहे." अखेरीस लिहिलं होतं – "एखाद्या लहानशा गावी ही दोघं डॉक्टरकी करीत आणि पति-पत्नी म्हणून राहात असण्याची शक्यता आहे. श्रीमती चंद्रिका, पौरोहित्य करणाऱ्या आपल्या पतीच्या घरून पंचवीस तोळ्यांचे दागिने आणि सुमारे नऊ वर्षांच्या विनोद नावाच्या मुलाला बरोबर घेऊन गेली आहे. मुलाचे समोरचे दोन तीन दात पडलेले आहेत आणि त्याला कधीकधी तोंडातून जीभ बाहेर काढून ठेवायची सवय आहे. स्त्रीच्या उजव्या हातावर, "रामनाम सत्य आहे" गोंदलेले आहे. पत्ता सांगणाऱ्यास योग्य ते पारितोषिक देण्यात येईल."

आणि 'पुनश्च' मध्ये "व्याससाहेब, आपल्या वर्तणुकीविरुद्ध आमची कसलीही तक्रार नाही. आपण परत आलात तर आपणास कुणी काही बोलणार नाही. आई आणि वडील आजारी आहेत. वासली सारखी रडत असते – यशोदा माधवलाल."

थोडा वेळ ती पुरुषाच्या फोटोकडे बघत राहिली. मग थंड निःश्वास सोडून झोपाळ्यावर उमटलेल्या तप्त सळयांवर बसत म्हणाली, "आणि या लुच्चा बाईसाठी तुम्ही जानव्याचा फास लावून घ्यायला लिहिलं आहे ? हीच का नाही हिच्या शेपट्याचा फास लावून घेत ?"

पण मग तिला आठवलं की त्या बाईने कुठल्या तरी स्टेशनवरून लिहिलं होतं

– "डॉक्टसाहेबांनी मला पळवलेलं नाही, मीच त्यांना पळवून नेलं आहे." ते आठवून ती विमनस्क झाली. स्वतःच वर्तमानपत्रात छापून आणलं आणि स्वतःच तक्रार करायची म्हणतेय, उलट त्या बाईने तर ... झोपाळा हलू लागला. खिडकीचे गज कधी झोपाळ्याच्या पाटावर तर कधी खाली फरशीवर उमटू लागले. ती खिडकीच्या गजांबरोबर बघू लागली. प्लॅस्टर निघाल्याने कुरूप झालेल्या या इमारतीला, कालाच्या आघातांनी मोडतोड झालेल्या विटांना - आज जणू पहिल्यांदाच तिने डोळे भरून नीट पाहिलं. यावेळी तिच्या कानात फक्त एकच आवाज घुमत होता झोपाळ्याची कर्र ... कर्र ...

कुणीतरी खिडकीसमोर येऊन उभं राहिलं. त्या सावलीनं दचकून तिने वर पाहिलं तर प्रसूतिगृहाचा चपराशी म्हणाला – "बाई, लवकर चला, नव्या केसला वेळेआधीच मूल झालंय. साहेबांनी तुम्हाला लगेच बोलावलंय."

झोपाळ्यावर उमटलेल्या गजांवर थोड्या वेळातच कुलुपबंद दार बंद झालं. देवीच्या कोनाड्यात अखंड तेवणारा दिवा लुकलुकत होता.

# चोरटी

❑ ईवा डेव

मला किनई माझ्या बापाशी ऱ्हायला लई आवडतं. मला अशी ... ! अरे, कुनीतरी दार उघडलं. अरं देवा रं ? बापा कनच्या तरी मानसा संगं आत आले. मला तर इतकं भ्या वाटलं की मी बा ... बा ... बा ... करत सैपाकघरातच पळालो. तो मानूस किनई मला मारायला आला व्हता. खरंच तो मला मारायला आला व्हता. मला तर लईच भ्या वाटत होतं. आणि असं भ्या वाटलं ना की मला रडायलाच येतं. कधीकधी तर लघवीसुद्धा व्हते. स्वैपाकघरात जाऊन मी मायला घट्ट चिकटतो. अधून मधून पळून जावंसं खूप वाटलं पण पळणार कसा ? भायेर खोलीत बापा नव्हं का बसले व्हते अन् तो मानूस बी बसला होता ज्याचं मला भ्या वाटत होतं. बा पाशी किनई लई गरम होत व्हतं. दादा, मला तर ऱ्हावलंच नाय. अंगठा चोखता चोखता मी लघवी करून टाकली. आणि किनई आता तर असं केल्यावर बा मला रागावते. पण तवा तर ती साकर खान्यात अश्शी काय गुंतली व्हती की मला रागवायचं विसरूनच गेली बापा आल्याचं ऐकताच ती साकरेचा डबा झटपट कपाटात लपवायला धावली. बापा त्याच खोलीत व्हते म्हून बरं झालं. नाहीतर मारल्याशिवाय नसते हो ऱ्हायले. बापा मला मारू लागले ना म्हंजे इतकं मुतायला व्हतं की विसरु नका. आणि बापा तर बस हेच म्हनत असतात की, "एवढा मोठा घोडा झालास तरी काडीची अक्कल नाही." आणि ते जवा म्हंतात ना की माय तसा लेक तवा किनई मला लई ब्येस वाटतं. म्हून तर म्हंतो की बा पाशी मला इतकी मज्जा वाटते, इतकी मज्जा वाटते की त्याहून जास्ती मज्जा तिच्या छातीला चिकटून लुच लुच करण्यातच काय ती येते. इतकी मज्जा आनखी कुनापाशी कध्धी कध्धी येत ऱ्हायी. मी आनि माझी लाडकी बा. बापा घरी नसले ना म्हंजे आमी गूळ साकरेचे डबे उघडून अश्शी काही मज्जा करतो की यंव ! पण तशी जमाडी जंमत आमाला कमी वेळा करायला मिळते. पण रात्री किनई सगळ्या मज्जेचं उट्टं निघतं. कसं काय जणं बाप्पाला समदं समजतं. बापा बा ला विचारतात. आणि बा बिचारी पकडली जाते. मग ते आमाला इतकं मारतात की आमची सारी गंमत खलास होऊन जाते

आणि मला तर सारखं मुतायलाच व्हतं. कधी कधी तर नालीवर पोचायच्या आतच शी शी पण होऊन जाते. माझी बा किंचाळून किंचाळून लई रडते. न्हाई तर आनखी काय करणार ! अरे-अरे, बापांच्या पायांचा आवाज ! बापा, बापा, बा-पा, बा-पा, आत आले. बा बिगीबिगी उंडे करू लागली. मी भिऊन तिच्या पायाशी बसलो. बापा आत येऊन म्हनले की आज मी लई शाणा दिसतोय. आणि म्हंतात कसे की मी असा शाणा झालो तर ते मला लगनाला घेऊन जातील. 'व्हय, व्हय शाणा राहील,' बा मधेच बोलली. लगीन, लगीन म्हंजे छान, छान, गोड गोड खानं, वा-वा ! कि-ती कि-तीकि-ती मज्जा येईल !

झुक झुक गाडीत बसून आमी लग्नाच्या गावी आलो. मेल्या इतक्या समद्या जणांना बघून मला तर अश्शी धडकी धडकी भरली की मोठ्या मुष्किलीनं मी मुतायचं आवरलं. आमी कुनाच्या तरी घरी आलो आनि घर किनई खूप मोठं आनि छान व्हतं. दोनचार मोठमोठाल्या खोल्या, आंघोळीची मोट्टी खोली आणि त्यात लई छानसा चौरंग. बाने एका लहान खोलीत पेटी ठेवलीन अन् पथरी घालून घर तयार केलं. मी बा पाशी लपून बसलो. मला तिथं लईच गंमत वाटू लागली. ताशेवाले तडम् तडम् तुम, तडम् तुम बडवत व्हते, ब्यांडवाले भ्याँ भ्याँ वरडत व्हते आनि माझ्या वयाची पोरं नाचत व्हती. तिथली पोरं पण लई चांगली व्हती. मला मुळीच चिडवत नव्हती. बस्. बापाच काय ते सारा दिवस वरडायचे. म्हनायचे, "अग ए, तू नीट ऱ्हा बरं. न्हायीतर घरी जाऊन इंगा दाखवीन. आनि ए दादा, सैपाकघरापासून दूरच रहा. या पोराला तू तुझ्यापाशीच ठेव. जरा पण एकटं सोडू नकोस." पण माझी बा किनई लई हुशार हाये. आजूबाजूला कुनी नाहीसं बघितलं की चटदिशी सैपाकघरात घुसून कधी गुळाचा खडा, कधी चिमूटभर साकर तर कधी देशी-विलायती मिळल ती मिठाई खाया घेऊन यायची. सोता पण खायची नि मला पन खाऊ घालायची. काय मज्जा यायची आमा दोगांना ! कि-ती कि-ती मज्जा ! खाऊन खाऊन माझं तर पोटच फुटाया लागलं. एकदा काय झालं, कुनी बघत नवतं. तशी बा पटकन् सैपाकघरात शिरली. तितक्यात मी बगितलं येक म्हातारी येतेय. मी लई ऊं ऊं केलं. पण बा नं ऐकलंच न्हायी. मी तर खोलीच्या कोपऱ्यात लपलो. आने ती म्हातारी लागली वरडायला - "अग ए, ए बाय ! कसली शोधाशोध चालवलीय ?" बा म्हनाली, "काय नाय काकी, काय नाय. बघत व्हते की घासायची भांडी तर आत न्हायी ना पडलीत ?" म्हातारी बडबडत निगून गेली. मला वाटलं आता बापा येतील नि मंग हानतील जोडे. जोड्यांच्या माराची मला लई भीती वाटली नि मला मुतायलाच

यायला लागलं. ते तर बरं झालं. बा बिगीबिगी आत आली आन तिनं मला छातीशी, धरलं म्हून मी मुतलो नाही. बा बडबडू लागली, "काय मेली मानसं आहेत ! ही म्हातारी मेली माझ्या पाठीच लागली असते. जनू आमी हिचा गडच लुटून नेणार हौत !" जरा वेळानं बा पुना भाईर निगून गेली. इकडं तिकडं नजर टाकून आली आनि आत येऊन खोलीत ठेवलेल्या पेट्या उगडून बगू लागली. एका पेटीतून तिला चमचम करणारी एक छानशी पिवळी आंगठी मिळाली. बा तर ती बघतच -हायली. तिला खूप मज्जा वाटली. ती आंगठी बा बोटात घालणार व्हती. तेव्हड्यात तीच म्हातारी धावत धावत आत आली आन बाप रे ! काय गोंधळ घातला तिनं. जणू वाघानंच पकडल व्हतं. ते सारं बघून मला मुतायला यायला लागलं. आन ती म्हातारी म्हंते कशी – "अग, ए, काय करतेयस ! थांब तिथंच उभी -हा. काय घेतलंस तू ? दाखीव बगू, काय काय चोरलं हायेस ?" बा उभी -हाऊन म्हंते, "काय नाय काकी काय नाय घेतलं. मी तर वाईच बसले व्हते इथं." आंगठी मुठीत धरून बानं दोनी हात मागं लपवलं. मी त खूप भ्यालो. लघ्वी आवरत धावत धावत गेलो आन बा च्या मागं जाऊन लपलो. बा रडत रडत (खोटं खोटं हा'!) सांगत -हायली. "काय नाय घेतलं. खरं सांगत्ये. मी काय बी नाय घेतलं." आनि म्हातारी वरडत -हायली, "न्हायी कसं ? या पेट्या मागं अशा उलट्या पालट्या कशा झाल्या ? मी समदं काढून घेईन. ए रांडे, तुझ्या त्या हातात काय आहे दाखीव बगू." आतापोतर लई मानसं जमली व्हती. ती छान छान पोरं पन तिथं आली व्हती. मला लई गंमत वाटली. मला वाटलं ती पोरं आता माझ्याशी खेळतील. तवा काय झालं, बानं माझं तोंड उगडून ती आंगठी गुळाच्या खड्यासारखी माझ्या तोंडात ठिऊन दिली. बानं आंगठी लपवायला मला दिल्याचं मी ओळीखलं. बापा अचानक आले म्हंजे ती अशाच रीतीनं कितीतरी वस्तू लपवायला माज्यापाशी देते. मी आज सुदी कधी कोनतीबी वस्तू गिळली नाहीये. बगा, ती आंगठी मी जिभेखाली अश्शी दाबून ठिवली. आनि ती म्हातारी आहे ना ती बाचा हात धरून वढू लागली. बा म्हनालीसुद्दा असा हात धरून वढू नका म्हून. पन म्हतारी म्हंते कशी, " हातच काय जीभ वढून टाकीन. दाखव रांडे, तुज्या हातात काय आहे ?" बरं झालं बापा कुठं फिरायला गेले व्हते. नाहीतर आमा दोगांना जोड्यांनी इतकं मारलं असतं, इतकं मारलं असतं की मला मुतायलाच झालं असतं. तितक्यात काय झालं, सारी पोरं हात वर करून करून ही ही कराया लागली. मला लई गंमत वाटली. मला सुद्धा हो, हो करायचं व्हतं. मला तर ते तसे पन कधी चिडवायचे न्हायीत. आनि आज तर माज्याशी खेळाया आले व्हते. मी

त्यांच्याशी खेळणार नाही हे कसं हुणार हुतं ? त्या पोरांचं बगून मी पन हात उंच करून उड्या मारु लागलो हो, हो करायला लागताच 'हो-ऊ-प' झालं आन फटदिशी ती अंगठी तोंडातून बाहेर पडून त्याच म्हातारीच्या पायापाशी पडली. म्हातारीनं झटकन ती आंगठी उचलून घेतली. आणि वरडली, "रांड ! खोटारडी ! चोरटी !" बाप रे ! तिने बाला किती धमकावलं किती धमकावलं. तसं तर मला रडाया येतं आनि मुताया होतं पन ती पोरं इतकी चांगली व्हती की त्यानच्या बरुबर मी पन खेळाया लागलो, नाचाया लागलो. ती सारी "अग ए चोरटे ग चोरटे," म्हणून नाचत व्हती. मला ते ऐकून इतकी गंमत वाटली, इतकी गंमत वाटली की मी पन, "अग ए चोरटे, चोरटे ग चोरटे" म्हनत हो हो कराया लागलो. अशा रीतीनं मी पहिल्यांदा त्या मुलांबरुबर खेळलो. खरं सांगतो, मला लई मज्जा आली. ती पोरं किती चांगली व्हती.

# लेखक-परिचय

## मलयानिल

कंचलाल वासुदेव मेहता (इ. स. 1892-1919) जन्मस्थान - अहमदाबाद. काही प्रीतिकाव्ये, विनोदी लेख आणि कथांचे रचनाकार. 'गोवाळणी अने बीजी वातो' हा कथासंग्रह प्रकाशित झालेला. 'गोवाळणी' ही कथा कीर्तिदायक.

## धूमकेतू

गौरीशंकर गोवर्धनराम जोशी (इ. स. 1892-1965) जन्मस्थान - उछेर. संगोपन आणि शिक्षण सौराष्ट्रात. नंतर अहमदाबादेत व्यवसाय म्हणून लेखनकार्याकडे वळले. कादंबरी, आत्मकथा, निबंध वगैरे विविध वाङ्मयप्रकार हाताळले. पण लघुकथा लेखनाची विशेष आवड. कथासंग्रहात विशेष उल्लेखनीय आहे - 'तणखा' (भाग 1 ते 4) 'चौलादेवी' वगैरे कादंबऱ्यांनी पण कीर्ती मिळवून दिली.

## द्विरेफ

रामनारायण विश्वनाथ पाठक (इ. स. 1887-1955) जन्मस्थान गाणोल. मुंबईत पदवी घेतल्यावर उत्तर गुजरातच्या सादरात वकिली केली. मग गुजरात विद्यापीठात प्राध्यापक म्हणून काम पत्करले. 'प्रस्थान' नावाच्या मासिकाचे संपादक पद सांभाळले. 'शेष' या टोपण नावाने कविता, 'द्विरेफ' नावाने कथा आणि - 'स्वैरविहारी' नावाने हलके फुलके लेख लिहिले. 'द्विरेफनी वातो' भाग 1, 2, 3 हे उल्लेखनीय कथासंग्रह. 'काव्यनी शक्ती', 'साहित्य विमर्श', 'साहित्यालोक', 'आलोचना' वगैरे टीकाग्रंथ. 'बृहता पिंगल' या ग्रंथासाठी श्रेष्ठ गुजराती पुस्तकाचे 1955 सालचे अकादमी ॲवॉर्ड मिळाले. 'अर्वाचीन काव्य साहित्यना वहेणो' हा त्यांचा गाजलेल्या व्याख्यानांचा संग्रह.

**झवेरचंद मेघाणी**

(इ. स. 1897-1947) जन्मस्थान – चोटीला. कलकत्त्याला व्यवसाय सुरू केला. तेथून परत येऊन 'सौराष्ट्रा'चे पत्रकार म्हणून कीर्ती मिळविली. लोकसाहित्याचे संशोधन आणि संपादन हे महत्त्वाचे कार्य. 'सोरठ तारा बहेता पाणी' 'तुलसीक्यारी', 'वेविशाल' या विशेष गाजलेल्या कादंबऱ्या. 'युगवंदना' हा लोकप्रिय काव्यसंग्रह. 'विलोपन' आणि 'मेघाणीनी नवलिकाओ' भाग २, २ हे मुख्य कथासंग्रह.

**सुन्दरम**

त्रिभुवनदास पुरुषोत्तमदास लुहार (इ. स. 1908-1991) भडोच जिल्ह्यातील आमोदचे मूळ निवासी. अहमदाबादला येऊन गुजरात विद्यापीठाची पदवी मिळवली. सध्या अरविंदाश्रम, पांडिचरी येथे वास्तव्य. 'काव्यमंगला', 'वसुधा' आणि 'यात्रा'. हे विख्यात काव्यसंग्रह. 'अर्वाचीन कविता' हा आधुनिक गुजराती काव्याचा विवेचनात्मक इतिहाससंग्रह. 'अवलोकना' हा साहित्यविषयक लेखांचा संग्रह. 'हीराकणी' 'उन्नयन' आणि 'पियासी' हे कथासंग्रह.

**उमाशंकर जोशी**

(इ. स. 1911-1989) गुजरातमधील बामणा गावचे. शिक्षण अहमदाबाद आणि मुंबई येथे. गुजरात विद्यापीठात गुजरातचे प्राध्यापक आणि नंतर कुलपती म्हणून केलेली कामगिरी गुजरातच्या सांस्कृतिक जीवनात महत्त्वाची. काव्य, एकांकी, कथा, निबंध, अनुवाद, विवेचन, संशोधन, कादंबरी इत्यादी साहित्याच्या सर्वच क्षेत्रात त्यांच्या लेखणीने यशस्वी संचार केला आहे. 'श्रावणी मेळो' आणि 'विसामो' हे त्यांचे कथासंग्रह. 'गंगोत्री', 'निशीथ', 'आतिथ्य', 'प्राचीना', 'वसंतवर्षा', 'अभिज्ञा', 'महाप्रस्थान' हे त्यांचे विख्यात काव्यसंग्रह. 'निशीथ' काव्यसंग्रहाला भारतीय ज्ञानपीठाचे पारितोषिक (श्री. पुटप्पा यांच्यासह) मिळाले. 'श्री अने सौरभ' हा संस्कृत साहित्यावरील अध्ययन ग्रंथ. 'संस्कृती' मासिकाचे संपादक म्हणून कार्यभार सांभाळला. राज्यसभेचे सदस्य होते.

**जयंती दलाल**

(इ. स. 1909-1970) जन्मस्थान - अहमदाबाद. नाट्य, राजकारण, पत्रकारिता, साहित्य हे मुख्य कार्यक्षेत्र. 'प्रवेश पहेलो', 'जवनिका' इत्यादी एकांकीसंग्रह. 'आ घेर, पेले घेर', 'अडखे पडखे', 'युधिष्ठिर?', 'ईषत', इत्यादी कथासंग्रह. 'शहेरनी शेरी' हा विलक्षण घटना-चित्रांचा संग्रह. 'काया लाकडानी ने माया लूगडानी' हा नाट्यविषयक लेखांचा संग्रह. 'गति' या साप्ताहिकाचे आणि 'रेखा या मासिकाचे संपादकपद सांभाळले. विश्व साहित्यातील कित्येक विख्यात कलाकृतीचा अनुवाद केला. त्यात 'युद्ध अने शांति', 'भूंडी भूख', 'मेघपथ' इत्यादी उल्लेखनीय.

**जयंत खत्री**

(इ. स. 1909-1968) जन्म कच्छ येथे. मुंबईत शिक्षण घेऊन डॉक्टरेट मिळवली. चित्रकलेची आवड. 'फोरां', 'वहेतां झरणां' आणि 'खरा बपोर' हे त्यांचे कथासंग्रह.

**स्नेहरश्मी**

झीणाभाई रतनजी देसाई (इ. स. 1903-1991) जन्मस्थान – चिखली. प्राथमिक शिक्षण गावी. नंतर राष्ट्रप्रेमाने प्रेरित होऊन गुजरात विद्यापीठाची पदवी घेतली. व्यवसाय-अध्यापन. विख्यात शिक्षणतज्ज्ञ. सत्याग्रहाच्या काळात पत्रकारितेचाही अनुभव घेतला. 'अर्घ्य', 'पनघट', 'सोनेरी चांद', 'रुपेरी सूरज' हे काव्यसंग्रह. 'तूटेला तार', 'गाता आसोपालव', 'स्वर्ग अने पृथ्वी', 'हीराना लटकणिया' हे कथासंग्रह. 'अंतरपट' कादंबरी. 'मारी दुनिया' हा आत्मचरित्राचा पहिला भाग प्रसिद्ध.

**गुलाबदास ब्रोकर**

(इ. स. 1909) पोरबंदरचे राहणारे. तेथे माध्यमिक शिक्षण घेऊन मुंबईला

प्रस्थान. राष्ट्रसेवेत काही काळ घालवला. मग शेअर-दलालीचा व्यवसाय केला. गेल्या कित्येक वर्षांपासून निवृत्त होऊन साहित्यसेवा करीत आहेत. 'ऊभी वाटे', 'सुर्या', 'वसुंधरा अने बीजी वातो', 'मानवीनां मन' इत्यादी कथासंग्रह. 'नवा गगन नीचे' हा युरोपातील प्रवासावरील ग्रंथ. 'ज्वलंत अग्नि' हा एकांकिका संग्रह.

**पन्नालाल पटेल**

(इ. स. 1912-1988) मूळ गाव डुंगरपुर जिल्ह्यातील मांडली. हे हल्ली राजस्थानात समाविष्ट झालेले आहे. पन्नालाल पटेल यांनी नाटकं लिहिली आहेत, आणि 'अलप झलप' नावाचं चरित्रही प्रसिद्ध केलं आहे. तरी पण कथा आणि कादंबरी हीच त्यांची मुख्य क्षेत्रं होत. 'वात्रकना कांठे', 'सुखदुःखना साथी' इत्यादी कथासंग्रह आणि 'मळेला जीव', 'वळामणां', 'मानवीनी भवाई' इत्यादी कादंबऱ्यांनी त्यांना कथालेखकांच्या पुढच्या पंक्तीत नेऊन बसवले आहे.

**ईश्वर पेटलीकर**

(इ. स. 1916-1989) स्थान-खेडा जिल्ह्यातील पेटली गाव. माध्यमिक शिक्षणक्रम संपवून शिक्षक झाले. नंतर समाजसुधारक आणि पत्रकार म्हणून कीर्ती मिळवली. 'ग्रामचित्रो' मध्ये ग्रामीण जीवनाचे अपूर्व रेखांकन. 'जनमटीप' कादंबरीने कीर्ती मिळवून दिली. 'लोहोनो सगाई', 'पेटलीकरनी श्रेष्ठ वार्ताओ', 'पेटलीकर वार्तावैभव' इत्यादी त्यांचे कथासंग्रह सुप्रसिद्ध आहेत.

**चुनीलाल मडिया**

(इ. स. 1922-1968) मूळ सौराष्ट्रातील धोराजी गावचे. अहमदाबादमध्ये कॉमर्सचा अभ्यास असतानाच पत्रकारितेकडे वळले. 'धूधवतां पूर' या पहिल्याच कथासंग्रहाला अमाप प्रसिद्धी मिळाली. 'व्याजनो वारस', 'लीलुडी धरती', 'वेळोवेळानी छांयडी' वगैरे त्यांच्या नावाजलेल्या कादंबऱ्या. 'धूधवतां पूर', 'अंत स्त्रोता', 'चंपो अने केळ', 'क्षणार्ध' इत्यादी कथासंग्रह सुप्रसिद्ध. 'रंगदा' हा त्यांचा एकांकी संग्रह विशेष उल्लेखनीय. 'शून्य शेष', 'रामलो रोबिनहूड' इत्यादी सफळ

तीन अंकी नाटके. 'शाहमृग-सुवर्णमृग', 'कशलोक', 'वार्ताविमर्श' वगैरे साहित्यिक लेखांचे संग्रह. 'रुचि' नावाच्या वाङ्मयीन मासिकाचे संपादक म्हणूनही काम केले.

### सुरेश जोशी

(इ. स. 1921-1986) दक्षिण गुजरातच्या खेड्यातून बाहेर पडून मुंबईला जाऊन अध्ययन केले. व्यवसाय अध्यापन. 'गृहप्रवेश', 'बीजी थोडीक', 'अपि च', 'न तत्र सूर्यो भाति' हे कथासंग्रह. 'छिन्नपत्र', 'किंचित', 'कथोपकथन', 'काव्यचर्चा' इत्यादी टीकाग्रंथ, 'जनान्तिके' आणि 'इदम् सर्वम्' हे रचनात्मक निबंधांचे संग्रह. 'प्रत्यंचा' हा काव्यसंग्रह. 'मनीषा' आणि 'क्षितिज' या वाङ्मयीन मासिकांच्या संपादक मंडळावर होते.

### चन्द्रकान्त बक्षी

(इ. स. 1932) मूळ उत्तर गुजरातमधील पालनपुरचे. अनेक वर्षे कलकत्त्यात वास्तव्य. तेथे व्यापार केला. हल्ली मुंबईच्या एका कॉलेजात इतिहास शिकवतात. कथा आणि कादंबरी हे मुख्य लेखन क्षेत्र. 'एक सांजनी मुलाकात', 'मीरा', 'मशाल' इत्यादी कथासंग्रह. कादंबऱ्यांमध्ये 'आकार', आणि 'पेरेलिसिस' उल्लेखनीय.

### सरोज पाठक

(इ. स. 1929) जन्मस्थान - जखऊ (कच्छ) व्यवसाय - शिक्षिका - रंगभूमी हा संशोधनाचा विषय. 'विराट टपकुं, 'तथास्तु', 'प्रेमघटा झुक आई' इत्यादी कथासंग्रह. 'नाईटमेयर', ही उल्लेखनीय कादंबरी.

### रघुवीर चौधरी

(इ. स. 1938) जन्मस्थान - उत्तर गुजरातमधील बापुपुरा. उच्च शिक्षण अहमदाबादेत. व्यवसाय-अध्यापन. 'आकस्मिक स्पर्श', 'गेरसमज', 'बहार कोई छे' हे कथासंग्रह. 'अमृता' कादंबरीने कीर्ती वृद्धिंगत केली. 'तमसा काव्यसंग्रह.

**मधु राय**

(जन्म इ. स. 1942) सौराष्ट्रातील जामखंभाळिया गावचे. सध्या अहमदाबादेत एका व्यापारी कंपनीत काम करताहेत. पूर्वी कलकत्त्याला होते. 'बांशी नामनी एक छोकरी', 'रूपकथा' आणि 'कालसर्प' हे कथासंग्रह. 'चहेरा', 'कामिनी', 'सभा' वगैरे कादंबऱ्या. 'अश्वत्थामा' हा एकांकी संग्रह. 'कुमारनी अगाशी' आणि 'कोई एक फूलनु नाम बोलो तो' ही नाटके विशेष गाजली.

**राधेश्याम शर्मा**

(जन्म इ. स. 1936) स्थान - उत्तर गुजरातमधील वावील. व्यवसाय - पत्रकार. 'बिचारा' कथासंग्रह. 'फेरो' ही प्रयोगात्मक लघुकादंबरी. 'आसु अने चांदरणु' छंदमुक्त रचनांचा संग्रह. चित्रपट समीक्षणही लिहीत असतात.

**ईवा डेव**

प्रफुल्ल दवे (जन्म इ. स. 1931), मूळ नडियादचे. शिक्षण – बडोद्यात. 1957 ते 1963 च्या दरम्यान वॉशिंग्टन युनिव्हर्सिटी, सेंट लुईस, मिसुरी येथे राहून शैक्षणिक मानसशास्त्रात डॉक्टरेट मिळवली. सध्या म्हैसूर येथे अध्यापक. 'आगांतुक' आणि 'तरंगिणीनां स्वप्न' हे दोन कथासंग्रह प्रसिद्ध. काही लघुकादंबऱ्याही लिहिल्या आहेत.

Printed at Shivam Offset Press, A-12/1 Naraina Indl. Area, Phase-I, New Delhi-110 028